प्रचलित राजकारणावर कादंबरी

# महात्मा गांधी—
# सैतान कीं साधु?


लेखक

श्री० एकनाथ यादव निफाडकर



प्रकाशक

अधिकारी आणि मंडळी

[illegible]गाँ नं. २.

किंमत २ रुपये

## मनोरमा ग्रंथमाला

एक रुपया प्रवेश फी भरल्यावर या मालेचीं पुस्तकें पाऊणपट किंमतींत मिळतील.

पुष्प पहिलें.

# ' हाच कां धर्म '

लेखिका

## सौ. शांताबाई नाशिककर, बी. ए.

पुष्प दुसरें.

# " बंधमुक्ता "

लेखिका

## सौ. कमलाबाई बम्बेवाले बी. ए.

या मालेचे एक १ रुपया प्रवेश फी भरून ग्राहक व्हावें.

अधिकारी आणि मंडळी पुणें नं. २

# आमच्याकडे मिळणारीं पुस्तकें

| | |
|---|---|
| बळगामा ब्राह्मणेतर ( कादंबरी ) | रु. १ |
| वेणीसंहार नाटक | ,, २ |
| वेणीसंहार चर्चा ( निबंध ) | ८४ |
| बालक ( काव्य ) | ८६ |
| अबलाविजय ( काव्य ) | ८४ |
| सतीचाशाप ( काव्य ) | ८४ |
| सुनीतावलि ( काव्य ) | ८८ |
| बाजेची कोर ( काव्य ) | ८१२ |
| लेंभे यांची कविता | ,, १ |
| बालकविंची कविता | ,, १ |
| मनोरंजक गोष्टी | ,, १ |
| राजा शिवाजी ( काव्य ) | १८४ |
| थोर पुरुषांचीं चरित्रें | ८८ |
| रसवन्ती ( काव्य ) | ८१२ |
| गडकऱ्यांच्या आठवणी | १८४ |
| प्रेमयोग नाटक | ,, १ |
| पंताची सून ( नाटक ) | ,, १ |
| हाच कां धर्म ( कादंबरी ) | ,, २ |

इत्यादि पुस्तकें आमचेकडे मिळतात.

अधिकारी आणि मंडळी पुणें, नं. २

# प्रस्तावना



§ १ या ग्रंथाचें नाव " महात्मा गांधी–सैतान की साधु ? " असें आहे. पण तें माझें नाहीं. तें माझे स्नेही व या पुस्तकाचे प्रकाशक, श्री. गोपाळ गोविंद अधिकारी, संपादक मनोरमा मासिक यांचें आहे. पण तें मला आवडलें. चटकदार म्हणून तें त्यांना सुचलें असेल, पण अत्यंत सार्थ असेंच तें मला वाटलें म्हणून तें मी मान्य केलें. गांधी महात्मा आहेत, याविषयीं कोठेंही मतभिन्नता नाहीं. कारण मेकॉलेसारखा सामान्य मनुष्यसुद्धा जर महाराष्ट्रांत महात्मा पद सहज मिळवितो, तर **ज्यांच्या नांवाचा आज जगांत सर्वांपेक्षां जास्त उच्चार होतो, अशा गांधींजींना महात्मा न म्हणणारा दुरात्माच असला पाहिजे.** पण हा बनिया महात्मा असला, तरी त्याच्या तऱ्हेवाईक रहाणीनें, व मासलेवाईक मतांनीं हा जगाला चुकवीत आहे, कीं तारीत आहे, म्हणजे हा सैतान आहे किंवा साधु आहे अशी मोठमोठ्यानासुद्धां शंका येत आहे, व तीं बोलून दाखवीत आहेत. अशा वस्तुस्थितींत वरील नावापेक्षा दुसरें कोणतेंहि नाव, कादंबरीला सार्थ नाहीं अशी माझी खात्री पटली, व चटक्दारपणात सार्थताही आल्यामुळें मी तें नाव पत्करिलें.

शिवाय गांधी ही व्यक्तीच अशी आहे कीं तिजसंबंधीं वरील प्रश्नास उत्तर देणें सोपें नाहीं, आणि म्हणूनच माझ्यासारख्या अल्पमतीला त्या विषयाला कागदावर आणण्याचें धाष्टर्याचें काम करता येण्यासारें होतें. त्या प्रश्नाला जर कांहीं निर्णायक उत्तर देता आलें असतें तर ( तो कादबरीला विषयच झाला नसता, हें वेगळें, पण ) निदान मी तरी माझा कमकुवतपणा खात्रीनें कबूल केला असता. आज गांधींसंबंधीं, गांधींच्या तोडीच्या महात्म्याची कसकशी मनोरचना आहे, ब्रिटिश सरकारची ( ब्रिटिश सरकारांतर्गत हिंदुस्थान सरकारचीही ) त्याजकडे पाहण्याची कोणती व कसकशी दृष्टी आहे, जगातले थोरथोर महात्मे गांधींना कसे लेखतात, आणि सामान्य लोकांत गांधींजीची कोणती जादु आहे, हें मांडणें, शक्य तितक्या मनोरंजक पण पद्धतशीर रीतीनें मांडणें, एवढेंच माझें काम होतें, निदान मीं तरी तसें आखून घेतलें होतें. माझें स्वत चें मत, माझी स्वत ची दृष्टी, व माझी स्वत ची

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

भावना मला सांगावयाची नव्हतीच,-कारण मी मत तयार करण्याइतका ज्ञाता नाहीं, तितकी माहिती मिळण्याची संधि प्राप्त होण्याइतका मी भाग्यवान् नाहीं; म्हणून माझी स्वतंत्र अशी त्यांच्याविषयीं दृष्टीच नाहीं; आणि भावना जी आहे, ती अक्षरशः कबूल करितों कीं, आधुनिक कादंबरी लेखकाचीच फक्त आहे. म्हणजे गांधी कादंबरी नायक होण्याला अत्यंत लायक असा मानवी प्रवृत्तीचा राष्ट्रहितकर्ता आहे अशी ती भावना आहे. या भावनेला कोणी सामान्याची समजो अथवा कोणी विक्षिप्तपणाची समजो. मला एक माहीत आहे कीं, माझें व्यक्तीत्व जर या कादंबरींत काहीं असेल तर तें एवढेंच होय.

§ २ पण इतकें करूनही कादंबरीचा शेवट "गांधी साधु आहेत! साधु आहेत!! साधु आहेत!!!" अशा त्रिवार जयघोषानेंच केला आहे; हें कसें? असा आक्षेप करण्यांत आला तर, मी आक्षेपकांना हें उत्तर देईन कीं, गांधी मला साधु वाटतात असें नव्हें तर, ते सर्व जगाला साधु वाटतात. सर्व जगांतला मी एक या नात्यानें ते मलाही साधु वाटतात; पण त्याचबरोबर हेंही खरें कीं, या कादंबरींतल्या ज्या ज्या पात्रांना गांधी सैतान वाटले, त्या त्या पात्राच्या स्थितींत मी असतों, तर मलाही ते सैतानच भासले असते; आणि ज्यांना ज्यांना म्हणून गांधी महात्मा वाटतात, त्याच्या त्याच्या मनोरचनेशीं तादात्म्य पावण्याची मला संधी आली म्हणून मला ते महात्मेच वाटतात! मला गांधी सैतान वाटत नाहीत हा दोष माझा नाहीं; तो माझ्या परिस्थितीचा दोष आहे. तरी सुद्धा मी सैतान दृष्टिवाल्यांशीं कल्पनेनें समरस होऊन, नव्हे तद्रूपता पावून या कादंबरींत, त्यांच्याच मुखानें "सैतान! सैतान!!," अशी बायकी भाषा वापरलीच ना? त्याबद्दल त्यांनी माझे खरोखरच आभार मानले पाहिजेत. ते जर माझे तसे आभार न मानतील तर त्यांनीं शिष्टाचार सोडला म्हणून मी त्यांना "सैतान," म्हटलें तर त्यांना राग येऊं नये हें ओघानेंच आलें.

महात्मा गांधी हिंदुस्थानच्या राजकारणांत पडले नसते, तर ही सैतानगिरी त्याच्या अंगीं चिकटती कां? अशी माझी सैतानभक्तांना आपली ल्हानशी पृच्छा आहे. गांधी दक्षिण आफ्रिकेंत सत्याग्रह करीत असतांना, त्यांच्याविषयीं, सैतान-विषयक भावना उत्पन्न झाली नाहीं; आणि ती हिंदुस्थानचेंच राजकारणांत त्यांना; चिकटलें असें कां? एक तर हिंदुस्थानच्या राजकारणांत दोष असावेत

किंवा गांधींत दोष असावेत, अथवा दोन्ही हातानीं ती टाळी वाजत असावी, मला वाटतें कीं, माझ्या या कादंबरींत हे तिन्हीं प्रकार उमटले आहेत असें, सरळ विचार करणाऱ्या वाचकांना दिसून येईल. मी प्रथमच कबूल केलें आहे कीं, ब्याचेशः मला या प्रश्नाचा व उपप्रश्नाचाही विचार करण्याइतकी माहिती नाहीं; व संधीही पण नाहीं. हिंदुस्थानचें राजकारण बिघडलें आहे असें लॉर्ड सिडेनहॅम् पासून गांधींपर्यंत जे जे म्हणतात, त्यांच्या त्यांच्या म्हणण्याचें प्रतिबिंब, या कादंबरींत पडावें अशी माझी इच्छा व त्या इच्छेप्रमाणें मी यथामति केलें आहे. आतां राजकारण म्हटलें कीं तें मूळचेंच गढूळ, त्यात हिंदुस्थानचें गेल्या दोन तीन वर्षांतील राजकारण जास्तच गढूळ, (ही सर्वांचीच कबूली आहे) तेव्हां त्याचें प्रतिबिंबही गढूळ झाल्यास तो माझा दोष, कीं त्या राजकारणाचा दोष ? गढूळ प्रतिबिंब देखील स्वच्छ करुन दाखवण्याचा राजद्रोह मी कसा करूं ? शिवाय कला-दृष्टीनेंही तें चुकलें असतें.

तथापि मी एक गोष्ट सचीत कबूल करतों कीं, गढूळ राजकारण देखील निर्मळ करण्याचे प्रयत्न होत आहेत; व ( विरोधाभास होईल, पण खरेंच आहे कीं, ते प्रयत्न गांधी तर करतातच, पण सरकारही करतें आहे, जेथें स्वराज्य, स्वातंत्र्य बहिष्कार, वंदेमातरम्, युगांतर असे शब्द उच्चारताच अंदमानची अथवा मंडालेची यात्रा घडत असे, तेथें तेंच सरकार आतां अनत्याचारी चळवळ सहन करतें, व पुष्कळच वाक्स्वातंत्र्य घेऊं देतें. ( अर्थात्‌च प्रेसॲक्टचा नवा अवतार वर्ज करुन, ) वाकीचें वाक्स्वातंत्र्य घेऊं देण्यांत हिंदुस्थान सरकार प्रशंसेस पात्र आहे, असें मृगेंद्रासारख्या ज्या " युरोपकल्चर्ड " म्हणांना वाटतें, त्यांचीही मनोरचना मी या कादंबरींत प्रामाणिकपणें व्यक्त केली आहे. उलट एकादी सुप्रश पण जहांबाज बायको जशी पतीच्या प्रेमानेंच आपला जहांबाजपणा सोडील, ( Taming of the shrew या नाटकांतलें तत्व खोटें आहे, ) तसें आमचें हें सुपुणी सरकार, आपला सत्तालोभ व धनलोभही आमच्या सत्प्रेमानेंच सोडील, असा खात्रीनें गांधीही पण अनत्याचारी अहिंसात्मक सत्प्रेमाचा सत्याग्रह करीत आहेत, हें देखील मी प्रामाणिकपणें दाखविलें आहे. एकूण १९०८ पेक्षां १९२८ पासूनचें राजकारण पुष्कळ निर्मळ आहे यांत संशय नाहीं. तसें तें नसेल तरी, जो मिल्टनचा सैतान ख्रिश्चनांना आवडतो, निदान

आदरणीय वाटलो, टाकून दिलें तरी, अभ्यासनीय वाटतो, ह्याच सैतानाची ती ;प्रेमाची, आदराची अथवा विचारार्हत्वाची पदवी, ते अथवा त्यांचे चहाते गांधींना देत असल्यास, त्यात वाईट कशाला वाटूं द्यावें ? मला तरी निदान, वाईट वाटत नाहीं, मी वाईट वाटूं दिलेंच नाहीं, म्हणून तर मला त्या त्या पात्राची ती ती भावना ओळखता येऊन या कादंबरींत चित्रित करता आली. बरनर्ड शॉ यांनासुद्धां गांधींप्रमाणें सैतानच म्हणतात, निव्वळ त्याच भावनेनें गांधींना जरी ती पदवी मिळत नसली तरी कदाचित् त्याहून उत्कृष्ट भावनाही गांधींच्या वाट्याला आली नसेल कशावरून ? शॉ नाटककार, तत्त्वज्ञानी, तरी Supermanship चे शोक्ते आहेत गांधी तत्त्वज्ञानी, धर्मश्रद्धावान् आणि perfect manhood चे भक्त आहेत, ( म्हणूनच ते आपलों स्वर्ग वेळाशक जाहीर करितात, ) तेव्हा सर्व म्हणावयाचें तर शॉपेक्षां गांधीच ब्रिटिश सरकारला जास्त आवडत असावेत हिंदुस्थान सरकारप्रमाणें ब्रिटिश सरकारचेंही प्रतिबिंब या कादंबरींत मला पाडता येऊं नये, याचें मला फार दुःख होतें, पण जी सहृदय दृष्टि मी, हिंदुस्थान सरकारविषयाची मला आढळून आलेली, या शब्दचित्रात व्यक्त केली आहे तीच ब्रिटिश सरकाराविषयींही व्यक्त केली असती हें खचीत गांधीदेखील सरकारला Satanic government म्हणतातचना ? अशा रीतीनें महात्माजी आणि सरकार ह्या दोन शक्ति जरी हिंदुस्थानच्या राजकारणाचा झरा, सपासप उपसून, निर्मळ करण्याचा प्रयत्न करीत आहेत, तरी देखील अजूनही तो झरा गढूळच पाणी वाहेर आणतो खरा. त्यालाही असेंच विरोधाभासाचें उत्तर आलें हा गढूळ भाव एकीकडे सरकारी अधिकाऱ्याचा आहे, व दुसरीकडे काहीं दुय्यम पुढाऱ्याचाही आहे दोघेही आपापलीं कामें हुकुमापेक्षां भलतेंच पुढें जाऊन करतात. ज्या जालियनवाला बाग प्रकरणानें महात्माजींच्या सात्विक हृदयाला करुणेचे पाट फुटले, तेंच प्रकरण या विधानाचें एक मोठें ढळढळीत उदाहरण होय उलट गांधीजींच्या जीवाला चटका बसेल हें माहीत असूनही चौरीचौरा, मालेगाव, मुंबई, मद्रास, कराची, सोलापूर, पेशावरसारखे अत्याचार वारंवार होतात. आणि मग मवाळलोक गांधींना, सकृपा होऊन, सैतान म्हणतात, आणि दुय्यम पुढारी, चिडून सरकारला सैतान म्हणतात ही मनोवृत्तिही मी या कादंबरींत रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे मला एक गोष्ट कबूल करा-

वयास एक मिनिटसुद्धां लागणार नाहीं, कीं, या कादंबरीप्रमाणेंच, "**सरकार सैतान कीं साधु ?**" अशा मथळ्याची कादंबरी जर मला लिहावीशी वाटली, तर माझी धृत्ति याच कादंबरीच्या लेखनमनोवृत्तिसारखी कलाप्रिय राहील.

§ ३ परंतु या कादंबरींत मला गांधींच्या राजकारणापेक्षा, त्याचें तत्त्वज्ञान, व त्याचें साधुत्व याविषयींच लिहिणें, कला या दृष्टीनें कठीण गेलें. इतराना कदाचित् गेलें नसतें, पण राजकारणात जसा मी अभागी व अनभ्यस्त, तसाच नव्हे, त्याहून जास्त, तत्त्वज्ञान व साधुत्व यात मी बिनआवडीचा व अश्रद्धाळू आहे. "सैतान" प्रकरण सोपें, पण "महात्मा !" व "साधु" हीं प्रकरणें मला जड गेलींत. कारण, आजकाल कोणताही धडाडीचा युवक प्लॅटफॉर्मवर बोलूं लागला कीं लागलाच मोठा होतो; व तुरुगात गेला कीं महात्मा होतो. तेवढ्या गुणावरच गांधीजी महात्मे आहेत असें मला देखील म्हणता येईना. पण रवींद्रनाथ ठाकूर, अरविंदबाबू घोष, लोकमान्य टिळक, त्याचप्रमाणें रोमॅरोलाँ, बर्नर्ड शॉ किंबहुना प्राचीन गौतमबुद्ध, जीजस ख्राइस्ट् अशासारखे अवतारी पुरुष, अथवा त्याच्याही पलीकडे वेदकालीन ऋषि, अशा थोरथोराचें तत्त्वज्ञान जेव्हा गांधींजीच्या तत्त्वज्ञानाशीं, कागदांवर व व्यासपीठावर खेळू लागलें, तेव्हा मात्र, माझें बोरुचें गाडें लटपटलें, आणि सॉक्रेटिस, तुकाराम, रामदास, गौतमबुद्ध, लो. टिळक अशा भक्तयोग्यांची जेव्हा गांधींच्या नावाला योग्यता आली, तेव्हा मात्र, आपल्या टिटवीला, या रा. अधिकारांच्या विनंतीवरून, काय हें भक्तीचें समुद्र आटवून टाकण्याचें काम सांगितलें, असें मला वाटलें.

तथापि जी प्रवृत्ती राजकारणात ठेवण्याचें मी ठरविलें होतें, तीच मधुकरवृत्ति या दोन्ही प्रकरणांत अवलंबावी असें मी ठरवून टाकलें, आणि त्या दोन्ही प्रकरणांतही मी थोरामोठ्यांच्या आश्रयानें चाललों. मात्र राजकारणात काय, किंवा इतरत्र काय, एका महात्माजीशिवाय, अन्य एकही पात्र खरें नाहीं; किंवा एकाही पात्रांत, एका विशिष्ट नामांकित व्यक्तीचें मानसिक चित्र नाहीं हें वाचकांच्या लक्षात आलें असेलच. स्वभावलहरींचें मिश्रण मात्र यांत सर्वांत आहे. पण कोणती स्वभावलहरी कोठें संपते, व कोठें सुरू होते, हें सांगणें

मलाही शक्य नाहीं. एक मात्र खरें कीं माझी ग्रंथकर्ता म्हणून स्वभावलहरी कोठेंच नाहीं, असल्यास ती भृंगाची आहे हें तिसऱ्यादा सांगतों.

§ ४ एथपर्यंत प्रस्तुत कादंबरीविषयीं माझी ग्रंथकार या नात्यानें जी बैठक आहे, तिजविषयीं सांगितलें. आता कला या दृष्टीनें थोडेसें स्पष्टीकरण करणें इष्ट आहे. कादंबरीचा नायक जे गांधीजी, त्यांच्याविषयीं प्रामुख्यानें जे तीन, ' महात्मा ! ' ' सैतान, ' व ' साधु ! ' असे भाग पाडले आहेत, ते तदंतर्गत गुण जेणेंकरून स्पष्ट होतील, अशा रीतीची मी मुद्दाम योजना केली आहे. तेवढ्याकरता, क्वचित्स्थळीं, प्रत्यक्षाला विरोधी अशी, कालसंगति, स्थल संगती व प्रसंगसंगतिही झाली असेल, आणि गांधींना पकडण्याच्या अगोदर कॅप्टन माधवराव मोघे यांच्यावरील पठाणाचा हल्ला, व त्यातील चुर्गामुळें घडलेला प्रकार तर निव्वळ काल्पनिक आहे. पण त्याचा हेतु सरकाराविषयीं गैरसमज करण्याचा मुळींच नसून, गांधींचें साधुत्व त्या थाल मोहनच्याहि अंर्गात किती उतरलें होतें हें दाखविण्याचा, त्यात माझा हेतु आहे. सुरेंद्रासारखा कलेक्टर, व कॅप्टन मोघेसारखा लष्करी अधिकारी राजीनामे देतात हें सांगताना, एकाही कलेक्टरानें किंवा लष्करी अधिकाऱ्यानें अजून राजीनामा दिला नाहीं, हें मी विसरलों नाहीं. तथापि तें सांगण्यात गांधीजींचें महात्म्य व साधुत्व यामुळें त्यांच्या राजकारणालाही कसें रूप लोकदृष्टीनें मिळतें, हें दाखविण्याचाच माझा हेतु आहे. सर हॉलकेन् यांच्या The white prophet मधल्या गांधींचें पात्र रेखाटतांना जी सवलत, त्या ग्रंथकर्त्यानें घेतली, तीच सवलत, कलेकरितां गांधींचें पात्र रंगवतांना मी घेतली आहे. माझ्या मनोरचनेविषयीं मी वरती विस्तृत विवेचन केलेंच आहे. प्रसंग, पात्रें, कथानक, भाषा, वगैरे. मिळून गेल्या तीन वर्षांपासूनच्या हिंदी राष्ट्रीय भावनांच्या मूर्तीची प्रभावळ तयार होते.

महात्मा गांधींचें पात्र overdrawn (प्रत्याशातीत) झालें आहे असें जर कांहींजणाना वाटलें तर, त्यांना मी एवढें सांगतों कीं, कित्येकांना तें Low Pitch चें वाटतें. पण मी दोघांनाही एक सत्य सांगतों कीं, महात्माजीकडे, तें सर्वांत उंच शिखर आहेत, या एकाग्रतेनेंच जे त्यांच्याकडे पाहतात, त्यांना तें कसें आहे हें सांगण्याचा अधिकारच नाहीं. कारण ते तुलनात्मक दृष्टिच नाकारतात. पण तौलनिक दृष्टीनें पाहणाऱ्यांतही एकवाक्यता क्वचितच होते, म्हणून ' सर तौंचे

परिसा ' कीं, मी गार्धांच्याबरोबर जगांतील विभूतींशीं, मुत्सद्यांशीं, साधूंशीं, संतांशीं, तत्त्ववेत्याशीं, व कवींशींही मी प्रामाणिक राहिलों आहें व माझें असें मत कोठेंच दिलें नाहीं.

§ ५ या कादंबरींत, चर्चा व व्याख्यानें सुद्धा आहेत; व तीं बरींच मोठीं आहेत. परंतु हा विषयच तसा आहे. कलादृष्टीनेंसुद्धा विषयाशीं मला बेईमान होतां आलें नाहीं; तर कादंबरींतलि व्यक्तींशीं मी कसा होऊं शकलों असतों ? ही कादंबरी कांहीं प्राचीन कालच्या राजकारणाची नाहीं; तर अगदीं आजमितीसही होत असलेल्या, अगदीं अर्वाचीनातल्या अर्वाचीन कालातील राष्ट्रीय आकांक्षाची आहे. मेरी कॉरेलीच्या Temporal Power सारखें हिचें कांहींसें स्वरूप आहे. इतक्या ताज्या विषयावर लिहिणें एकाप्रकारें कठीणच असतें. वाङ्मयात जर आपल्या कृतीला चिरकालीन, निदान पाच पन्नास वर्षे तरी, वाढतें महत्त्व यावें अशी इच्छा असेल तर, चालू काळातील सटरफटर ( महत्त्वाच्या खऱ्या पण तात्कालीन परिणामाच्या )कचरा देखील योग्य ठिकाणीं ठेवून, चिरकालीन रूपाचे प्रश्न आधुनिक पद्धतीनें रंगविलें पाहिजेत. अशी दृष्टि ठेवून मी या कादंबरींतल्या प्रसंगाची व प्रश्नाची निवड केली आहे आणि वस्तुस्थितीलाही ( Facts ) कलेच्या वेष्टनात ( Act of vision ) मोहक करण्याचा प्रयत्न केला आहे. इतिहासप्रसिद्ध पुरुषाना असल्या वेष्टनाची मुळींच जरूर नसते. उलट, हें वेष्टन जितकें जास्त, तितकी ती व्यक्ति हिनक्सपणा पावते. पण ज्या थोर व्यक्तींना इतिहासात अजून स्थान मिळावयाचें असतें, त्या आपणाला इतक्याजवळ असतात कीं, त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनापेक्षा त्यांचें हृदयाविष्करण आपणास करावें लागतें; व तेंही कलावेष्टनानें; मात्र कलावेष्टन म्हणजे कांहीं भूल नव्हे. उलट भूल पडत असेल तर ती दूर करण्याचें काम कलेचें आहे आणि हें अतीव कठिण काम करण्यास जो एकच उपाय मला आढळला तो मी उचलला. तो असा कीं, थोर थोर व्यक्तींना गांधीजवळ उभें करावयाचें, सत्य पारखावयाला जी तेजस्वी बुद्धि लागते; व प्रेम ओळखावयाला, स्वहृदयीं जो प्रेमसागर लागतो, त्या दोन्ही गोष्टींत, मी अगदींच प्राकृत मनुष्य ! सबब मी जर थोर महात्म्यानाच या महात्म्याकडे मजकरतां पहावयास लाविलें तर ती देखील एक कलाच होय. माझी एकच इच्छा आहे कीं, माझ्यापेक्षा अनंत पटींनीं ज्या कादंबरीलेखकाचा दर्जा आहे, त्यानीं जर हा विषय

रंगविला तर, माझ्यासारख्या सामान्यांना तो नमुना दाखल होणार आहे माझ्या
मनातून आणखीही प्रसंग उत्पन्न करून त्यातून राजनीतीची खूप मोठ्या प्रमाणात
मीमांसा करावयाची होती. परंतु या पुस्तकाला कालमर्यादा असल्यामुळें, मला तें
कार्य पुढील आवृत्तीवर टाकणें भाग आहे. तरी पण मी कांहीं तत्त्वें तूर्त पेरलीं
असल्याचें वाचकांना आढळून आलें असेलच.

§ ६ या कादंबरींत ग्रंथकर्त्याची लो. टिळक यांच्याबद्दल अनन्यभक्ति दिसून
येईल. पण ती गोष्ट अक्षरशः खरी आहे. माझी ती भावना चुकीची आहे असें
पाहिजे असल्यास कोणी म्हणावें, मी तें शांतचित्तानें ऐकून घेईन. पण आतां
मला वाटत नाहीं कीं ती भक्ति चुकीची ठरेल शिवाय महात्माजींनीसुद्धां लोक
मान्याइतकी थोरवी कोणाचीच गाइली नाहीं. त्याचप्रमाणें महाराष्ट्राविषयींही
विशेष प्रेमा प्रस्तुत कादंबरींत दिसून येईल, व त्यालाही उत्तर तेंच आहे. महा-
राष्ट्रप्रान्त हा फ्रान्ससारखा हर्ली आहे. यांत व्यक्तिद्वेष व मत्सर हे दोन राक्षस
थैमान करणार नाहींत तर, जसें युरोपांत फ्रान्स, तसा हिंदुस्थानांत महाराष्ट्राला
फ्रान्स, असा दाखला न घेतां, जगांत महाराष्ट्राला तुलनाच नाहीं, असें साधार
म्हणतां येईल तें म्हणण्याचें सुख निदान माझ्या मुलाला तरी लाभो !

§ ७ यावरून एक मुद्दा आठवला. तो स्वतःच्याच कादंबरींत स्वतःच्याच
नांवाचा अनेकदां उल्लेख करण्याचा होय. त्यासंबंधीं मला एकदाच सांगून टाका-
वयाचें आहे कीं, आपणास आपणाहून आजिबात वेगळें गणून आपली आपणच जाहीर-
रीत्या परीक्षा घेणें यासारखें धैर्याचें कृत्य दुसरें क्वचितच असेल. आपल्या कार्याची दुस-
ऱ्याकडून परीक्षा करविणें हा सामान्य प्रकार झाला. आपणास आपली जितकी ओळख
असते तितकी दुसऱ्यास असणें सर्वथैव अशक्य आहे. मात्र आपणाकडे आपणच पाहा-
ण्यास विलक्षण मनोधैर्य लागतें, व तें जाहीर करण्यास तर सेंट्‌ऑगस्टिन्, रूसो, तुका-
राम गांधी व टॉल्स्टॉय् यांचीच छाती होईल. अर्थात्‌च त्या महात्म्यांच्या पासंगाला
देखील मी लागणार नाहीं, आणि म्हणूनच माझें उल्लेखही कमीच आहेत. मी
भाग्यवान् नाहीं. मला संधि नाहीं, मला असामान्य बुद्धि नाहीं, व मी परतंत्र
देशांतला एक सामान्य लेखक, पण माझी बुद्धि कशी का असेना, ती आहे तशी
महाराष्ट्रीय जगतापुढें उभी करणें मला माझें एक कर्तव्य वाटतें. माझे दोष, मला

दिसतात ते व मित्राना दिसतात, तेही मी सांगेन. "एकाच्या रोजनिशींत" सांगितलें आहेत. पण तिकडे कोणाचें फारसें लक्ष गेलें नाहीं. कारण मी सामान्य मनुष्य आहे. आणि असामान्यांनीं, तुकाराममहाराजानंतर त्या प्रकारचें लिखाण सोडूनच दिलें आहे; म्हणून आमच्या वाचकांनाही तशा प्रकाराची संवय राहिली नाहीं. जनताजनार्दनापुढें माझ्यासारख्या कीटकानेंही आहे त्याच रूपात उभें रहावें अशी माझी मनोरचनाच आहे.

या असल्या लिखाणाचा तसा दुसरा फायदाही आहे; आणि तो फायदा होत असेल तरच असलें लिखाण छापावें असें मला वाटतें. तो फायदा असा कीं, आपण मनोभावानें कार्य करीत असता, त्याजसंबंधानें, कित्येक लोक केवळ त्या कार्यविध्वंसनासाठींच आपणासंबंधीं नसती, ( पण खासगी, कारण जाहीर रीतीनें करण्यास ते घाबरतात ) टवाळी करतात; अगर कित्येक भलतीच स्तुति करतात; आणि ती मात्र जाहीरही होते. कारण त्यात धोका नसून स्तुतिपाठकालाही थोडासा फायदा मिळतो. पण दोन्हीं प्रकारानीं जेव्हा आपलें कार्य नसतें, तेव्हा कार्याच्या दृष्टीनें, आपण व आपलें कार्य अशा दोघाना बेलाशक जनतेपुढें उभें करावें, " जगात असें एकच शहाणपण आहे कीं, जें मुळाशीं कधींच बिघडत नाहीं; व तें म्हणजे Commonsense ! " असें थॅकरेनें New Comes मध्यें म्हटलें आहे. त्याचाच एका शब्दात अनुवाद " जनताजनार्दन " या शब्दात आम्ही हिंदूंनीं केलेला आहे. जनता बिघडेल, पण जनतेचा जनार्दन म्हणजेच विश्वातला परमात्मा ! त्याच्या पुढें आहात तसें उभें रहा ! तो चकणें संभाव्य नाहीं. त्याला चकविण्याचा प्रयत्नही मूर्खपणाचाच होतो. हा अनुभव जोंपर्यंत मला नव्हता, तोंपर्यंत माझें कार्य अनेकदां व्यर्थ नासलें, हा अनुभव जेव्हां मला आला, व मी माझ्या हृदयस्थ जनार्दनाला जनताजनार्दनात पाहूं लागलों, तेव्हां कार्य होऊं लागलें. व मी कार्याकरतां आहें, कार्य मजकरता वाट पाहत नाहीं हें मला पटलें.

मी माझ्या स्नेह्यांची जशी स्तुति करतों, तशी त्यांच्यावर टिकाही करतों; याचप्रमाणें मी महाराष्ट्रावर अनन्य प्रेम करतों म्हणूनच मला माझ्या ब्राह्मण बंधूंचे व अस्पृश्य बंधूंचे गुणाबरोबर दोषही दाखवावेसें वाटतात.

## महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

§ ८ शेवटीं एकच विनंति करावयाची आहे. ही कादंबरी आहे, हा निबंध नव्हे. त्यामुळें कलेचा परिपोष होण्याकरतां कांहीं मनोवृत्तींचीं चित्रें, वाजवीपेक्षा जास्त भडकदार रंगांत चितारलीं गेलीं असें वाटेल. पण माझी एवढीच विनंति आहे कीं, सत्य हें कोणत्याही उच्च प्रकारच्या कल्पकतेपेक्षां कठोर व भडकदार असतें. मी सत्यावलंब व तीही थोर व्यक्तींच्या सहाय्यानें करण्याचा प्रयत्न केलेला आहे. हा जर लोकप्रिय, विद्वान्प्रिय, व सरकारप्रिय झाला तर पुढें " **सरकार सैतान कीं साधु ?** " ही कादंबरी लिहीन म्हणतों.

# महात्मा गांधी----सैतान कीं साधु ?

## पुस्तक पहिलें

## महात्मा !

### भाग पहिला

## गुलाबांतली कीड !

—व्यसनांत गुरफटलेली शक्ति, तें व्यसन नाहींसें होतांच त्याहून उच्चतम शक्तींत विलीन होते.

(अमृत-तुषार)

के. म. सोनाळकर

§ १ " कस्तुरी ! तूं असा हट्ट कशाला करतेस ? मला असं एखादवेळी होतं."

" कबूल ! पण त्याला काहीं तरी कारण असेल ना ? "

" एखादवेळीं निष्कारणच नाहीं का हुरहूर लागत जीवाला ? "

" लागते. मी कुठं नाहीं म्हणतें ? तरी पण, अगदीं नक्की तेंच कारण अशावेळीं समजत नसलं, तरी प्रिय जनाशीं मन मोकळं करून बोललं, म्हणजे स्वताला नाहीं, तरी त्या प्रिय जनाला तरी तें कारण उमगत नाहीं का, मी आपणाला आवडत नाहीं ! "

" असं या जन्मात तरी होणार नाहीं." मृगेंद्रनाथ अवसानानें म्हणाला. परंतु त्याच्या त्या अवसानातही हृदयविदारणाची दुःखलहर स्पष्ट उमटली. तो आपल्या प्रिय गुजराथी मंत्रिणीला म्हणाला, " कस्तूर ! तुझ्यावर माझं किती व कसं प्रेम आहे हें सांगितलं, तर तें जगात कोणत्या ना कोणत्या तरी भाषेंत खाचित वर्णिलेलं असेल; वर्णनात कधींही पुरेपणा नसतो. हृदयाची हृदयाला ओळख पटली कीं; त्या दोन हृदयातल्या साऱ्या भावना त्याना प्रतिक्षणीं नव्याच असतात."

" मन दुःख ही भावना नव्हे का ? आपणास आपलं दुःख मजपासून लपवून ठेवता येत नाहीं हें तर दिसतंच आहे; पण आपली मात्र, दुःख लपविण्याची खटपट चालली आहे. खरं ना ? "

" नाहीं; तसं मुळीच नाहीं. आपल्या वल्लभेपासून दुःखं लपवून ठेवण्यात, व तिला सुखाचाच वाटेकरी करण्यात पुरुषार्थ मानण्यात येतो. पण माझी भावना तशी नाहीं. आपल्याबरोबर आपल्या भावी पत्नीनेंही, दुःख देखील भोगण्यास तयार असावें अशीच माझी इच्छा आहे. "

" मग मला दुःखाचं कारण सागत का नाहीं ? " कस्तुरीला विनोद करावासा वाटला; व ती म्हणाली, " मी अजून प्रत्यक्ष पत्नी झालें नाहीं म्हणून ? कीं, माझी त्वचा लंडनच्या स्त्रियांप्रमाणें घर्षाङ्कली पांढरी नाहीं म्हणून ? कीं, मी माझी विनोदी वृत्ति स्वतःच्या दुःखातही सोडीत नाहीं म्हणून ? हें बघा; स्वभावो दुरतिक्रमः । त्याचप्रमाणें चामडीला काहीं आतां चुना फासून घ्यावयाचा नाहीं. आता राहिलें पत्नीपद–" तिचा आवाज जरासाच लडिवाळपणाचा झाला; " प्रिय नाथ ! आता आपलं लग्न होण्याला काय हरकत आहे ? कीं, गांधींच्या बारडोलीच्या सत्याग्रहात आपणाला जावयाचं आहे ? "

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

" सत्याग्रहांत मी काय, किंवा तूं काय, आपण जावं, अशी आमची मनो-रचना होण्याआधीच आम्हांला शिक्षण मिळाल आहे जसं ! तूं तर अठरापैकीं दहावर्षं इंग्लंडमध्यें घालवलीस; ऑक्सफर्डची ग्रॅज्युएट्, तुझे वडील कोट नारायण,—

" आणि आपले ? "

" गरीब बिचारे मुंबईचे रावबहादुर, जस्टिस् ऑफ् दि पीस् ! अग, आम्ही दक्षणी ब्राह्मणाची दशाच पुसूं नकोस,—

" नाहीं पुसत बरें ! हो ! पुसून तरी काय समजणार ? मृगेंद्रनाथ क्षेमकल्याणी हे काय म्हणे ऑक्सफर्डचे एम्. ए., एडिंबरोचे फेलो, बर्लिनचे पी. एच्. डी., नाशिकचे जहागिरदार.—

" दीड दमडी उत्पन्नाचे."

" पण गोऱ्यापान चमडीचे ! "

" तुझ्यापेक्षा कमीच पण कस्तूर ! ही रंगाची गोष्ट बोलण्यापेक्षा अंगकांती लक्षांत घेणं योग्य होईल. विलायतेंत अंगकांतीकरता किती पण बाह्योपचार करतात ? आणि ते करूनही सुंदर द्राक्षासारखी एकीची तरी कांती असते का ? तेजस्वी सावळ्या वर्णासारखं दुसरं सुंदर रूपच नाहीं "

" विलायतेंत इतकीं वर्षं श्रीमंताच्या मुलींच्या सहवासांत राहून आपल्या देशभगिनींना न विसरणारा तरुण आपण पहिलेच आहात ! "

" याला कारण केवळ तू ! "

कस्तुरी स्वाभाविकपणेंच लाजली ती कितीही धड्डेखोर स्वभावाची असली तरी, त्यामुळें तिच्या शालीनतेला कमीपणा आला नव्हता. तिला कितीही उच्च-तम शिक्षण मिळालें असले तरी, त्या शिक्षणातला ताठरपणा तिनें मुळींच उच-लला नव्हता आर्यस्त्रीला युगानुयुगाच्या संस्कृतीनें ज्या मर्यादशीलपणानें शोभविलें आहे तोच विनतेचा गुण कस्तुरीच्या रोमरोमांतून स्वाभाविकपणें उमटून पडत होता त्यावेळीं तिच्याकडे पाहून मृगेंद्राला आनंदाचें भरतें आलें पण तो देखील उच्छृंखल होणारा नव्हता, इंग्लंडमध्यें क्राइस्ट्‌चर्चमध्यें तिची प्रथम भेट झाल्यापासून त्याचें संतत सहावर्षें स्नेहवर्धन होऊन, आता पूर्ण प्रेमांतरही झालें होतें, तरी त्यानें एकांतांत ही योग्य मर्यादा चुकूनसुद्धा उल्लंघिली नव्हती. आता त्या शांत न रम्य स्थळीं, आणि सुखदायक सायंकाळप्रसंगीं, तो तिच्याकडे स्थलोवर ईश-

रात्री एक कला, या दर्शनेंच पाहत होता तापीच्या काठची ती रमणीय बाग, सर्व प्रकारची वर्मत श्री घेऊन प्रफुल्ल होतीच, पण तेथल्या कारंजाशा अंगकातीन स्वधर्म करणारी एकच चीज तेथें होती व ती म्हणजे माझी ही राणी कस्तुरी ! असें कलाप्रेमसुख त्यावेळीं तो अनुभवूं लागला - पश्चिमेकडच्या समुद्रपाटी-वरून मुरतेच्या सूर्यानें आपलीं कोंवळा किरणें जरी त्या बागेंत फेकिली होतीं, तरी त्याच्या प्रतिबिंबाचा खडासा जो त्या कारंजतरंगाना कस्तुरीच्या जाळीवर टाकावा, त्यामुळें ती वेल, का ही वेल अधिक शोभते, हें तो ठरवात होता. तो आपलें उत्तर ठरविणार व तें तिला कळविणार, तोंच त्या विशालनयनेनें वरतीं पाहिलें, व त्याला म्हटलें,

"आपण माझें अभिनंदन केलत, तें जास्तच सुरक्षारक कशानें वरें होईल ?"

"कशानें ! तूंच साग बरं ?"

"अर्थात विवाहानं आपण दोघानीही आता विवाहपूर्व शिक्षणाची सर्व तयारी केली नाही का ?"

"हो केली खरं सागूं का ? आपलं लग्न केव्हा होईल असं मला होऊन गेलं आहे !"

"हीच का हुरहूर लागली होती आपल्या जीवाला ? इश्श मेल ! त्यांत काय काळजी करण्यासारखी गोष्ट आहे ? आमचा जिथें वाङ्निश्चय होऊन दोन वर्षे झालीं, तिथं आता काळजी कशाला ?"

"तसं खरंच कोणतही कारण नाही" मृगेंद्र हलक्या आवाजात म्हणाला, व थोडा वेळ स्तब्ध बसला मग तो जरासा निवळून म्हणाला, "माझं नाव मृगेंद्र नसतं तर बरं झालं असतं"

"कां ?"

"किंवा तुझं नाव कस्तुरी नसतं तर अधिक चागलं झालं असत."

"हा बाई ? मृगेंद्राजवळच कस्तुरी असते."

"पण संकटकाळीं ती त्याला सोडते, व तिच्या सुगंधानें तिला जगभर हिंडावं लागतं."

"ती त्याला सोडते का, तो तिला घाबरून टाकून पळतो ? पण मी म्हणतें

की, हा भोळसटपणा आपणाला आजच कसा सुचला ? आम्हीं हिंदु कितीहि
शिकलों सवरलों; तरी आमचा भोळसटपणा आम्हाला सोडून जातच नाहीं का ?"
तिचें भाषण संपलें नसेल, इतक्यात तिची म्हातारी आत्या येथें आली. व तिनें
तिच्या गळ्यां पडून एकदम गळा पसरला. तिचें सांत्वन करून खरा प्रकार काय
आहे हें समजून घेण्याला त्यांना दोनचार मिनिटें लागलीं. शेवटीं म्हातारीनें
तिला एक पाकिट दिलें अर्थातच तें म्हातारीनें फोडून वाचलें होतें. हस्ताक्षरा-
वरून तर तें आपल्या वडिलांचें आहे असें कस्तुरीनें ओळखिलें व त्यातला मज-
कूर दिसायलासुद्धा तुटक असल्यामुळें ती दचकली. तें पत्र अगदीं असें—

प्रिय भगिनी चतुराबाई,

काय लिहूं तुला ? कपाळात सतरा हजार तिडका उठतात, व वाटतें कीं,
आता मात्र प्राण घ्यावे !—अरेरे ! कस्तुरी ! माझी प्यार कस्तुरी ! तुझं आता
कसं होईल !—आग ! आग होते साऱ्या अंगाची !—नराधमा नरोत्तमा !—
वंशातला नरोत्तम ! शंकातलासुद्धा कनिष्ठ होण्याची तुझी पात्रता नाहीं.
चतुराबाई ! तुझ्या या भावाला सृष्टिक्रमानें सणसणीत तडाखा मारला आहे !
त्याची भीति अखेर खरी ठरली आहे त्याला शारीरिक पापाची परिपूर्ण शिक्षा
मिळाली आहे. त्याला महारोग झाला आहे—

हरहर ! कस्तुरी झाबून पडली ! पण मृगेंद्रानें तिला सावरून धरलें.
कस्तूरला वगऱ्यात ताबडतोब नेण्यात आले, पण त्याच्या अगोदरच डॉक्ट-
रांना बोलावणें पाठविण्यास मृगेंद्र विसरला नाहीं. डॉक्टर येईपर्यंत त्यानें
आपल्या वहिनीला 'सॉल्ट्स्' हुंगायला देऊन थोडेंसें सावध केले होतेंच. डॉक्टर
वामनराव यांनां तें पाहिल्यावर मृगेंद्राचें कौतुक केलें. आमच्या पिढीपेक्षा तुमच्या
पिढीचें, हे दरेक विषयाचें सामान्य ज्ञान खचित राष्ट्रकल्याण करणारें आहे, असें
डॉक्टरांनीं त्याचें थोडक्यात अभिनंदन केलें. पण तें स्वीकारण्यासारखी त्याची
त्यावेळीं मन स्थिति नव्हती. कस्तूरची मूर्च्छा आता जरी गेली होती, तरी तिच्या
हृदयात खिन्नता फारच खोल गेली होती हें सर्वांनाच कळून चुकलें. डॉक्टरांनीं
तिला हुरूप वाटण्यासारख्या अनेक अवांतर गोष्टी सांगितल्या, परंतु व्यर्थ. शेवटीं
तिनेंच डॉक्टरांना म्हटलें, " डॉक्टर, माझ्या जन्मापासून तुम्ही आमच्या घरचे
डॉक्टर आहात. "

तें तरुण जोडपें एकटें राहिलें तेव्हां त्यापैकीं एकहीजण बराच वेळ बोलला नाहीं. मात्र कस्तुरीनें आतां आपल्या पलंगाचा आश्रय घेतला होता; व मृगेंद्रानें खिडकीजवळची आराम खुर्ची पत्करली होती. खोलींतला इलेक्ट्रिक फॅन फिरत होताच; व त्याच्या बारक्या बारक्या झोतांनीं खिडक्यांजवळच्या स्टँडवरच्या कुंड्यांतल्या रोपट्यांचीं सुकुमार पानें व फुलेंही मजेदार रीतीनें हालत होतीं, बाहेर बगीच्यांतही नित्याप्रमाणें विजेच्या सुंदर दिव्यांची नेत्रमनोहर रोषनाई होतीच; पण नेत्रमनोहर कोणाला ? निदान आज तरी, अथवा आजपासून तरी बाहेरच्या तमासगीरांनाच ! कस्तुरीचा आनंद आज सूर्यास्ताबरोबरच मावळला होता; व तो आतां कोणत्याही सूर्योदयामुळें तिला परत मिळेल अशी आशा—आशेचा एक किरणही तिच्यापुढें चमकत नव्हता. आणि तिच्या औदासिन्याचे काळे ढग, त्या विजेच्या लखलखाटांतही त्या तिच्या चेहऱ्याला देखील ग्रासून टाकीत होते. तो तिला म्हणाला.

पूर्वी नसलों तरी आता होणार. या डम् रॉट हेरिडिटीचा बागुलबुवा कस्तुरीला अपाय करीत नसतो, हे साऱ्या जगाला दाखवीन! पण या भविष्यकाळच्या गोष्टी आहेत. कस्तुरी! आता फुकट वेळ गमविण्यात हंशील नाहीं. एकेक क्षण फुकट दवडला तर पश्चात्तापाची पाळी येईल तेव्हा मी आता निघतों."

" कुठं जाणार ? "

" प्रथम डी. एस्. पीकडे जाणार. "

" मला वाटलंच. चावडीवरची गोष्ट गुप्त राहूं शकेल काय ? "

महारोगाची गाठ, गुप्त ठेवण्याची कल्पना सुद्धा मृगेंद्राला शिवली नाहीं; हें पाहून त्या कन्येला अतोनात वाईट वाटलें. स्वार्थत्यागाच्या मोहक कल्पनेला भुलून पुरुष न कळत किती कोमल भावना चिरडून टाकतो हे तिला पहावयास मिळालें. पण काय करील बिचारी! प्रेमामुळें लाचार झाली होती. तथापि तिनेंही त्या प्रश्नाचा खूप खोल विचार केला होता. ती त्याला म्हणाली;

" आपण माझ्या म्हणण्याप्रमाणे कराल काय ? "

" काय करूं सांग ग. "

" आपण आपल्या वडिलांकडून मोठ्या प्रवासाची परवानगी घ्या. उत्तर हिंदुस्थानची सारी मोठमोठी शहरं आम्हीं दोघे पाहून येतों असं त्यांना सांगा. म्हणजे आपण दोघें भाईच्या शोधार्थ निघूं वाजागाजा करण्याचें कारण नाहीं."

" मोठ्या आनंदानं मी परवानगी मागेन. तूं बरोबर असलीस तर फारच चांगलं, माझा जीव सुतेला टांगता राहण्याचं मग कारणच काय ? "

" आपले आईबाप नाहींत काय ? आणि सुरेंद्रबाबूंची नाहीं का आपणाला आठवण होणार ? आणि आपल्या वहिनींना जर खरी गोष्ट कळली तर त्या काय म्हणतील ? "

ती गुजराथ्याची पोर पुन्हा रडूं लागली. मृगेंद्र म्हणाला;

" आपल्या कर्मपरता तरुणानं स्वकीयांना देखील विसरावं, हें पूर्वीपासूनच चालत आलं आहे "

" मग मी देखील तसं करावं म्हणता ? "

" नाहीं. स्त्रिया व पुरुष यांत भेद असतो. ' बायकोसरता बापालाही सोड '

अस मिल्टनचा परमेश्वर ॲडमला सांगतो ना ? ' नवऱ्याकरता बापालाही सोड ' अशी त्याची काहीं आज्ञा नाहा."

" अगोदर दहा आज्ञांपैकी ही कोणतीही आज्ञा नाहीं. आणि असती तरी आम्हां आर्यांना बायबलप्रमाणें चालावयाचं नाहा. मिल्टनचें पॅरॅडाइझ् लॉस्ट् हें आम्ही फक्त काव्यदृष्टीनें वाचतों; धर्मदृष्टीनें वाचीत नाहीं."

" ठीक आहे. पण आमचा हिंदुधर्मही असं सांगत नाहीं कीं, नसत्या शंकाकुशंका उपस्थित करून कर्तव्यपराङ्मुख हो म्हणून. माझ्या बहिणीना काय वाटेल, माझ्या मेहुण्याला कसं वाटेल, याचा आज विचारकर्तव्य, कीं माझ्या प्रिय कस्तुरीच्या वडिलांच्या शोध लावणें हें आचार कर्तव्य ?"

" ठीक आहे. मग या विचारून बदलाना. केव्हा येता ?"

" जातच नाहीं. चिठ्ठीच पाठविनों म्हणजे झालं."

" तसं नको. शिवाय निदान आपले कपडे तरीं लागतील ना ? आपण अकराच्या मेलनं निघूं या."

" ठीक आहे."

§ २ मृगेंद्र व कस्तुरी यांनीं प्रथम काशीचा पंचक्रोशी धुंडून काढिली. अशा दुर्निवार रोगानें पछाडिलेला असला रोगी बहुतकरून तीर्थक्षेत्रीं जाऊन राहतो, असा त्याचा कयास होता. पण तो खोटा ठरला. बनारस, गया, प्रयाग, हरिद्वार, मथुरा, वृंदावन, उज्जनी, ओंकारेश्वर, अबू, गिरनार, द्वारका वगैरे सगळीं उत्तरेकडचीं पवित्र क्षेत्रें त्यांनीं बारकाईनें शोधिलीं. नाना ठिकाणचे, नाना वेषांचे, नाना आचाराचे वैराग्याचे मठ देखील त्यांनीं स्वनेत्रांनीं पाहून सोडले; पण नरोत्तमभाईचा काहीं केल्या त्यांना शोध लागेना. शेवटीं उत्तर सोडून दक्षिणेकडचीं तीर्थें शोधण्याचें त्यांनीं ठरविलें. पण यापुढें आगगाडीनें प्रवास न करता पायींच प्रवास करण्याचें कस्तूरबाईनें ठरविलें. आणि मृगेंद्रास आपल्या घरीं जाण्यास विनविलें. अर्थातच कार्यफल प्राप्तीविना परत फिरणारा तो नव्हता. तीं दोघें फिरत फिरत वडोदऱ्याच्या सरहद्दीवर गायकवाड सरकारच्या संस्थानातून पश्चिम खानदेशात उतरण्याकरिता, एका खेडेगांवीं रात्रीच्या मुक्कामाकरतां एका धर्मशाळेंत उतरलीं होतीं.

वेळ रात्रींचीच होती. मध्यरात्र उलटून गेली असेल. त्या सुमाराम पाच सहा पठाण त्या धर्मशाळेंत गेले; व त्याच्या डोळ्याना तें दर्शन मोठें मोहक वाटलें. त्यानीं कस्तुरीला पळवून नेण्याचें ठरविलें. चौघे तिच्या आसपास उभे राहिले; एकानें मूर्धेद्रावर चालविण्याकरता सुरा सज्ज केला; व एकानें तिच्या तोंडात कोंबण्याकरता एक बोळा तयार केला ते आपल्या अलौकिक शौर्याला–चौर्याला–लागणार, इतक्यात रस्त्याच्या वळणावरून सपरन् येणाऱ्या एका मोटारीचा प्रकाश धर्मशाळेंत पडला, व लगेच Stop please ! अशी महात्माजींची स्पष्ट वाणी त्या पठाणाच्या कानीं आली ! ते खरोखरच गर्भगळित झाले. सुरेवाल्याचा सुरा गळून पडला; बोळेवाल्याचा बोळा त्याच्या मागें लपला; व बाकीचें पळून जाण्याचा विचार करूं लागले. परंतु त्याना पुरेसा वेळच मिळाला नाहीं. कारण मोटार एकदम धर्मशाळेच्या ओटीशींच थांबली; व तींतून महात्माजी प्रथम उतरले, व मोटारींतल्या कलेक्टरला म्हणाले.

" बघितलंत ? प्रत्यक्ष बार्डोली तालुक्यात तर पठाणाचा धुमाकूळ आहेच; पण सरहद्दीवरल्या खेड्यातसुद्धा हीच स्थिति ! ही स्थिति ब्रिटिश राजनीतीला शोभते का ? "

कलेक्टरनें गांधीजींना कांहीच उत्तर दिले नाहीं, परंतु एका पोलिपाकडून त्या पठाणाना पकडलें खरे. त्याचें पुढें काय झाले हें काहीं कळलें नाहा. परंतु बार्डोलीतले पठाण त्यानंतर लवकरच निघाले खरे. पण इकडे त्या रात्रीं मात्र, व त्या धर्मशाळेंतच, कलेक्टरनें मोटार देण्याबद्दल महात्माजींचे आभार मानिले, व आपण स्वतः पाटला-कडून एक छोटा तंबू उभारून तेथेच मुक्काम केला. सरकारी अधिकाऱ्यावर असा बहिष्कार घालणें योग्य नाहीं; अशाने Law and order बिघडतात असें ठराविक शब्द गांधीजींना सागण्याम कलेक्टर विसरला नाहीं. गांधी परत मोटारनें जाण्या-करता निघाले; पण इतक्यात त्याना धर्मशाळेच्या मागल्या पडक्या देवळातून कोणाचा तरी आर्तस्वर ऐकूं आला ! गांधीनीं मोटार थांबवली व देवळाचा रस्ता धरला; कलेक्टरनेंही गांधींची सोबत केली. व त्या सगळ्या गडबडींनें जागें झाले. तें जोडपेंही हळू हळू त्या दोघाच्या मागून जाऊं लागले. ' अर्थात्‌च पोलिसपाटिल व त्याचे कांहीं लोकही बरोबर होतेच तीं सर्व मंडळी देवळाजवळ जाताच त्याना एक वृद्ध महारोगी दिसला. त्यासरशी कलेक्टर मागें सरला; पाटिल थबकला, त्याचे

लोकही धावले, फार कशाला, मृगेंद्राला नरोत्तमदासाची कल्पना असूनही तो देखील चरकला! आणि कस्तुरी? तिनें क्षणमात्र आपल्या वडिलांकडे पाहिले आणि एकच किंकाळी फोडून ती जमिनदोस्त झाली! महात्माजींनी मात्र यत्किंचित् देखील विचार न करतां त्या रोग्याची शुश्रूषा करण्यास एकदम आरंभ केला! त्याच्या जखमा धुवून काढल्या, मोटारीतून मलमपट्ट्या आणवून त्या जखमांवर स्वहस्तानीं बांधिल्या, त्या रोग्याशी प्रेमळ वाणीनें बोलून त्याची पूसतपास केली. अर्थातच त्यानें आपली हकीकत सांगितली नाहीं, पण त्यानें महात्माजींचे आभार, नव्हे, उपकार मानले, तरी पण त्याच्या विनंतीप्रमाणें दवाखान्यात जाण्याचें साफ नाकारलें. इतक्यात कस्तुरीही, मृगेंद्राच्याच इतराच्या सहाय्यानें शुद्धीवर आली होती शुद्धि मिळताच तिनें धावत जाऊन "भाई! माझे भाई!!" म्हणून आपल्या वडिलाच्या गळ्यास मिठी मारली. तेव्हा सारें पितृप्रेम एका बाजूस सारून त्यानें गांधीजींना म्हटलें,

"महात्माजी!—

"कोण? नरोत्तमजी?"

"हो! तोच मी! या माझ्या कस्तुरीचा आता आपणच सांभाळ करा, अशी माझी आपणास हात जोडून प्रार्थना आहे" असें म्हणून त्या वृद्धानें आपली कन्या गांधीजींच्या ओंटीत घातली.

"हॅलो! मिस्टर नरोत्तमजी!" कलेक्टर म्हणाला, "तुमची ही दशा कशानें झाली? आम्हास फार वाईट वाटतं आहे! तुमची इस्टेट आमच्याकडे द्या, आम्ही चांगली संभाळूं. आम्ही तुम्हास चांगलं औषध देऊं; बरं बरं, या मुलीला तुम्ही शिवूं नका! हा रोग ससर्गजन्य आहे!!"

"आग लागो तुझ्या जिभेला!" नरोत्तमभाई चिडून म्हणाले. पण त्यांना गांधींनी शांतविलें, व अत्याग्रहानें मोटारींत बसवून कन्येसह साबरमती आश्रमाकडे पाठविलें काही तासपर्यंत ते स्वत त्याच्या बरोबर होते. मृगेंद्रालाही नरोत्तमभाईंनी बरोबर घेतलें होतें रस्त्यानें आपण बरें होऊं का? असा प्रश्न त्या रुग्णानें महात्माजींना विचारला, पण महात्माजींनी त्याला सांगितलं कीं, रोग हे पापक्षालनार्थ असतात. पापक्षालन प्रसंगीं देखील रोग्यानीं पुण्यें करावीं म्हणजे आत्मबल सर्वांत वाढेल. व्यसनात देखील एक प्रकारची शांति

असने तिला व्यसनातीत करावें एवढेंच मानवाचें कर्तव्य. निदान मानसिक आराम तरी वाटला. त्यांनीं साबरमतीच्या आश्रमापासून दोन मैल लांब एक पर्णकुटी बांधून, हरिभजनीं काळ घालविण्याची व्यवस्था केली. कस्तुरी मात्र महात्माजींच्याच आश्रमात राहिली. मधूनमधून ती महात्माजींच्या एखाद्या शिष्याबरोबर, वडिलांकडे जात असे. आणि मृगेंद्र ? मृगेंद्र अनेक व्यायांच्या जाळ्यात सापडून रेशमी धाग्यांनीं जखडला गेला होता.

हें सगळें खरें. पण त्या विशिष्ट खेड्यातून महात्माजींची मोटार निघून जाताच, तिच्या तांबड्या दिव्याकडे पाहत कलेक्टर उद्गारला —गांधी महात्मा खरा ? पण सैतान कीं साधु ?

Now the awful ban was lifted, the barriers were down; what had been hidden was revealed, what had been forbidden was permitted. So all the chained desire of a lifetime drove him on; it was almost more than he could bear............A blinding whirl of emotion seized him; he was like a leaf sweft away in a gale; his words came now in wild sobs, "I love you! I love you!"

UPTON SINCLAIR.
Love's Pilgrimage.

महाराष्ट्रात, असा एक सुशिक्षिताचा वर्ग आहे का, ज्याच्यावर गांधींजींची विश्वमोहिनी लागूं पडत नाहीं. अमेरिकेतले मोठमोठे मुत्सद्दी व ग्रंथकार, महात्माजींच्या शातरसानें, पुंगीनें नाग, तसें गुंगून डोलत असतील, परंतु त्यांच्या हृदयभावनांचीहि 'लॉजिकली' चिकित्सा करण्याची महाराष्ट्रीयांना खोड्च लागली आहे. भर उन्हात, चार गड्या फिरून, मधुकरीवर उपजीविका करणारे इंग्रजी चवथींतलें चौदा वर्षांचें पोर देखील, आपल्या परीनें गांधी गारुडी कीं मारवाडी, असले प्रश्न कोठेंतरी ऐकतों; व त्याचाच मनाशी खल करीत असतो. बाहेर सभातून "गांधी महाराज की जय!" ही घोषणा करावयास तो चुकणार नाहीं, पण केव्हां ? गुजराथेंत अगर बंगाल्यात एकाद्या, गांधाच्या चळवळीचा पारा ५० पर्यंत चढून तेथले लोक कैदेंत जाऊं लागले म्हणजे, लाजेकाजेनें, हा विद्यार्थी, इतर श्रोते ओरडल्यानंतर, आपला एकादा शाळामास्तर सभेला आला नाहींना, असें नीट खात्री करुन घेऊन, मग ओरडतो. स्वयंप्रेरणेनेंची विषयघोषणा त्याची नाहीं. ही जर एकाद्या पोराची स्थिति, तर मृगेंद्रासारख्या "इंग्लंडरिटर्न" दरूनी ब्राह्मणाची गोष्टच नको. कोणत्याहि प्रश्नाची विचक्षणा करणें हें महाराष्ट्रीयांचें बाळकडूंच, त्याचे गुणधर्म त्याच्या अंगी उतरणारच. त्यातून मृगेंद्र विचक्षणानिपुण अशा इंग्लंडमध्येंच जास्त शिकलेला व राहिलेला अविवाहित तरुण, चटान् बेबद होण्याच्या वयाचा, त्याला गांधींजींच्या मुद्रेकडे पाहून पाहिजे होतें तें समाधान मिळालें नाहीं एवढें खरें. त्यानें खिन्नपणानें मोटारीच्या बाहेर पाहिलें, कस्तुरी अर्थातच आपल्या वडिलाच्या संस्कृतात चूर होती मृगेंद्राची दृष्टि तिच्या दृष्टीशीं भिडे, तेव्हा तिच्याहि मनात समान भावना उठत परंतु त्या भावनांनीं जसें मृगेंद्राचें हृदय भाजून निघे, तसें, निदान, तितकें तिचें हृदय भाजत नव्हतें. तिला तद्विषयक विचार मुद्दाम करावयास अवसरच नव्हता. तिचेंही हृदय विदीर्ण होई, परंतु तें आपल्या वडिलाच्या काळजीमुळें, स्वत च्या काळजामुळें नव्हे. अर्थातच बार्डोलीमधले सत्याग्रहाचें केंद्र गांठीपर्यंत मोटारींतलीं माणसें, अत्यंत महत्त्वाच्या कामाखेरीज बोलत नव्हतीं.

सत्याग्रहाश्रमात मोटार जाताच महात्माजी व त्याचे पट्टशिष्य देसाई हे उतरले. त्यांना एक स्वध दिवस विश्रांति घेण्याची नरोत्तमभाईंना विनंति केली. गांधी

म्हणजे प्रत्यक्ष देव, अशीच त्याच्याविषयीं त्या कोटनारायणाची आता भावना झाली होती, व तें अत्यंत स्वाभाविकच होतें. ' आता आपणास भेटावयासदेखील मला फुरसत सापडणार नाहीं; तेव्हा आपण माझ्या साबरमतीच्या आश्रमातच यापुढें रहावें, ईश्वर आपणावर कृपा करील, ' अशी आशीर्वाद मिश्र सल्ला गांधींनीं त्याना दिली. आशिर्वादानें नरोत्तमभाईंना नवजीवन प्राप्त झाल्यासारखें वाटलें, परंतु आपणापासून आश्रमाला अणुभरही संसर्ग प्राप्त होता कामा नये, अशा जाणिवेनें भाईंनीं, साबरमती आश्रमापासून दोन मैलावर पर्णकुटी बांधून रहाण्याची, महात्माजींची परवानगी मिळविली. आपणही आपल्या पिताजींजवळच आजन्म रहाणार असा आपला कृतनिश्चय कस्तुरीनेंही कळविला, पण तो परभारें भाईंनींच मोडविला; पण तिनें मधूनमधून भेटण्याची व साबरमतीच्या गांधी-आश्रमात कायम राहण्याची गांधीजींची अनुज्ञा मिळविली. इतकें झाल्यावर मृगेंद्रालाही आपला विचार कळविणें भाग पडल्यासारखें झालें. कस्तुरी मुलगी, पण आपण धमधकट पुरुष असल्याकारणानें आपणास भाईंची शुश्रुषा करण्यास हरकत नसावी, अशी त्यानें विनंति केली त्याची थोडीशी ओळख गांधींजींना करून देणें भाग होते, तशी भाईंनीं करून दिली. तेव्हा गांधी म्हणाले, " मी याना ओळखतों. आपला व याचा घरोबाही मला माहीत आहे. यानीं आपणाजवळ राहून आपली शुश्रूषा करावी, हें त्याचें पवित्र कर्तव्यकर्म आहे तें करण्याची तयारी दाखविल्याचें पाहून मला आनंद वाटत आहे. असे तरुण (देसायाकडे बघून पाहून ) फक्त महाराष्ट्रातच निपजतात, क्षेमकल्याणीं, परमेश्वर आपणा सुयश देवो । "

असें म्हणून महात्माजी शिष्यासहवर्तमान तेथून निघून गेले. त्याच्या सामान्य हालचालीही इतक्या जल्द गतीच्या असतात कीं, त्याच्या शरीरयष्टीकडे व वयाकडे पाहून, त्याबद्दल साऱ्या जगाला आश्चर्यानंद वाटतो. लौंच मोटार प्रत्यक्ष आश्रमात गेली.

§ ७ तो सबंध दिवस तसाच गेला पण मृगेंद्राच्या मनातल्या विचाराचा हलकल्लोळ मात्र एकसारखा वाढत राहिला. शेवटीं सूर्यास्ताच्या वेळीं आपलें तापलेलें डोकें शांत करण्याकरता तो दोन मैलावरच्या एका लहानशा नदीच्या काठीं जाऊन बसला. सायंकाळच्या वायूलहरींनीं त्याला क्षणभर आराम वाटला.

परंतु असा बाह्योपचाराचा आराम उलट अंतःसंताप भडकून देण्यालाच कारणीभूत होतो, हें त्याच्याही अनुभवास लवकरच आलें. त्याला कस्तुरीच्या सहवासातल्या पूर्वीच्या सायंकाळच्या सर्व सहली भराभर आठवू लागल्या. तो मनाशींच विचार करीत होता; " शेंकडों सहलींचें सुख आणि हें एका अर्ध्या दिवसाचें दुःख, यात दुःखच तीव्र नाहीं का ? हा संकटाचा प्रकार किती पण अनपेक्षित रीतीनें येऊन कोसळला ! छे, छे, असं खोटं बोलणं परमेश्वराजवळ खपायचं नाहीं. कस्तुरीनं बागेत पत्र वाचलं त्यावेळीं, मला या संकटाची जाणीव होतीच ते असूनसुद्धा मी भाईची शुश्रूषा करीन व त्याच्या रोगमुक्ततेनंतर त्याच्या हातानीं ते तुला माझ्या पदरी देतील व मी तुझं किती तरी उल्हासानं पाणिग्रहण करीन, असं मी तिला सुरतेलाच वचन दिलं होतं. मग माझ्या या सुसंस्कृत मनानं आताच का बरं अशी प्रतारणा करावी ? अथवा का बरं प्रतारणा करूं नये ? महारोगाची जोंपर्यंत प्रत्यक्ष स्थिति मी पाहिली नव्हती; आणि जोंपर्यंत मी कस्तुरीच्या प्रेमाच्या नादात होतों—कस्तुरवरच माझं प्रेम कमी झालं आहे काय ? alas ! alas ! या प्रश्नाला, देवा, मी काय उत्तर देऊं ? नाहीं कसं म्हणूं ? व हो तरी कसं सांगूं ? तिच्या वडिलाना हा रोग जडताना, तर आमच्या प्रेमाला अशी उतरंडी लागली असती का ? हो लागली असती. खचित लागली असती आणि तेव्हा मात्र याच्याहून माझी दनादैना उडाली असती. भाई जरी रोग फुटण्याच्या अगोदर, केवळ म्हातारपणानं मरते, तरी कस्तुरीच्या लग्नानंतर, तिच्या अंगावर—

त्या कुमाराला पुढें विचारच करवेना. त्याच्या मनश्चक्षुपुढें कस्तुरीचें तें भीषण चित्र, नव्हे, त्या चित्राची नुसती सावली देखील उभी राहताच, त्याचा जीव गुदमरून जाई. आता तर तो पटापट अश्रू गाळूं लागला.

अश्रूंनो ! तुम्ही किती पवित्र असता ! तुमचा आम्हा मानवावर जेवढा उपकार होतो तेवढा फक्त आईच्या दुधाकडूनच होत असेल. बाकीचे सारे पदार्थ तुमच्यापुढें लटके ठरतात ! आम्ही मानव दुःखातिशयानें जेव्हा बेभान होतों, अथवा सुखमात्रानें जेव्हा वेडे होतों, तेव्हा आमच्याकडून प्रमाद घडूं नयेत, आमच्या माणुसकीला सदानंदाच्या मार्गाला लावावें, म्हणूनच तुमचा साठा परमेश्वरानें आमच्या नेत्रात ठेवलेला असतो. हृदयाच ताणलेला रबर तुटूं नये म्हणून नेत्रान त्या त्या

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

सुकुमार पिशव्या कशा पटापट सैल सुटतात, आणि मग तें रक्त आस्तें आस्तें पूर्वस्थितीवर येतें. अश्रूंनो ! तुमचें तेज तरी किती विलक्षण ! मेघजलबिंदु आणि तुम्ही यात काहीं तरी फरक आहे काय ? कोमल कुसुमावरचे दंवबिंदु आणि मानवी कोमल लोचनातले तुम्ही अश्रुबिंदु तुम्हा दोघातही मला तरी परमेश्वराचेंच दर्शन होतें ! तुमची जो टवाळी करील, तुमचें जो विडंबन करील, तुम्हाला जो हंसेल, त्याला मी नंदीसुद्धा म्हणणार नाहीं, कारण नंदीच्या नेत्रातही तुम्ही चमकता. त्याना शंखही म्हणता येत नाहीं; कारण शंखासुर मारला गेला तेव्हा लक्ष्मी रडली, व तिच्याकरता, तिच्यामुळें शंखासुराला पुन्हा जिवंत करावें लागलें, अशी दंतकथा आहे. तेव्हा अश्रूंच्या उपहासकाची जातच निराळी ! असो.

मृगेंद्राला अश्रूपातानंतर किंचित बरें वाटलें, आता चंद्रप्रकाशही पडूं लागला होता, त्यामुळें मृगेंद्राला स्वाभाविकपणच शांततेचे विचार सुचूं लागले. नाहीं तरी ज्वलज्जहाल भावनाचीं अशीच गोष्ट असते. एका विशिष्ट भावनाची परिसीमा गाठली कीं, तो जीव मग अश्रूपातानंतर बरोबर दुसरी विरुद्ध भावना गाठूं पाहतो, आणि त्या जीवाची विचारशक्ति जितकी तीव्र तितक्या लवकर त्याच्या भावनाचा लंबकही दुसरें टोंक गाठतो. रुक्तोची गोष्ट अशीच होती, असें त्याचे सारें चरित्रकार सागतात. मृगेंद्राला आता वाटूं लागलें कीं, 'आपण महारोगाचा व्यर्थ बाऊ तर करीत बसूं ? जगांत एकटे भाईच का तसे रोगग्रस्त आहेत ? त्याच्याच रोगपीडेचा आपण सारखा विचार करीत बसतों, म्हणून तर वाजवीपेक्षा जास्तच भीषण स्वरूप आपण चितारीत नसूं का ? बरें, आपणाला जर इतकं वाईट वाटतं तर वस्तुस्थला किती वरं वेदना होत असतील ? आपण आपल्या भावी सुखाच्या दृष्टिकोनानं विचार करूनच थावू; पण त्या मुलीला तसं थावतां येईल का ? आपण पुरुषामारखे पुरुष, आणि सुमन्या कुल्पनानीं मन भडकूं देतों; पण त्या दीन पोरीला हृदयाची जळजळ देखालहृदयातच जिरवली पाहिजे ना ? आजपर्यंत ज्या आपणाजवळ तिनं एकूणएक सुखंदुःखं सांगितलीं, त्या आपणाजवळही एवढ्या मोठ्या दुःखाचा एक ब्र देखील तिला काढतां येत नाहींना ? आज जगांत तिला असं एकही मायेचं माणूस नाहीं कीं, त्याच्याजवळ ती दीन हरिणी दोन दुःखाश्रु गाळून क्षणभर तरी दुःखभार हलका करून घेईल. हर हर !

भाईना देखील तिच्याशी याविषयी बोलता येऊं नयेना ! काय करायचं त्या अफाट संपत्तीला ?—

संपत्ती हा शद्ब डोक्यात येताच फिरून त्याच्या पूर्वीच्या सगळ्या सुखाभिलाषा उत्पन्न झाल्या. संपत्ती, सुशिक्षण आणि कुलीनता या इहलोकच्या सुखत्रयींवर आपला सारा भावी संसार कसा, खडकावर स्थित होता; पण आता काय ? ते सारे फुगेच ठरले ना ? अशी त्याची फिरून चित्तवृत्ति भावावूं लागली. आता त्याचें वस्तुस्थीं, या जन्मी तरी लग्न होणें शक्य नव्हतें. त्याला खरोखरच तिच्या संपत्तीची चाड नव्हती. तिच्या कुलीनपणात थोडासा दोष जरी असता तरी त्याला चाललें असतें; अत्यल्पस्वल्पआनुवंशिक दोषाला तो फारशी किंमत देत नव्हता; तशाच विचाराच्या देशात त्याची, स्वभावाची घडण घडविणारी वर्षे गेला होती. पण शरीरसुखावरहि पाणी सोडायला त्याचे हृदय धजेना. "प्लॅटोनिक लव्ह्"चा खरा अर्थ त्यानें ओळखला होता, आणि तें प्रेम अत्यंत घाणेरडें असतें, हें जगास वळत नाहीं, याचें कारण केवळ अज्ञान; हें त्याम माहीत होतें. प्लेटोच्या वेळीं तरुण कोवळीं गुलजार मुलें–मुली–बाळगून, त्याच्यावर प्रेम करण्याची, त्याना प्रेमपात्राचें स्थल ध्यावयाची चाल होती. त्या चालींतला अस्वाभाविक व सृष्टिक्रमाविरुद्ध भाग वजा करून, एक जातीय दोन जीवाची अशरीरी अशी जी प्रीति, तिला प्लेटोनें उचलून धरिलें होतें . परंतु तें प्रेम खुद्द प्लेटोलासुद्धा साधलें नाहीं; किंबहुना त्यापायीं देखील त्याचें स्त्रीजातिविषयक नैतिक आचरण पुष्कळच बिघडलें होतें हें तो जाणून होता. शरीर आणि मन, मन आणि हृदय, हृदय आणि जीवात्मा, जीवात्मा आणि परमात्मा, अशा पायऱ्या न घेता एकादी उलंघून जाणें महात्मा गांधींनासुद्धा—

महात्माजींचें नाव त्याच्या ओठावर येताच त्याला विद्युत्प्रवाहाचाच जणूं धक्का बसला ! महात्मा गांधी म्हणजे एक जागतिक कूट प्रश्नच त्याला होऊन बसले होते. त्यान त्यांचीं सर्व पुस्तकें, त्यांचीं सर्व चरित्रें, व त्यांचे सर्व मुख्य लेख वाचिले होते. पण त्याच्या कमालीच्या तीव्र बुद्धीलाहि त्या कूट प्रश्नाच

* झेलर या प्रसिद्ध जर्मन तत्त्ववेत्त्याचें "Plato and the older acedemy" हें पुस्तक वाचनीय आहे—नाथ निफाडकर.

आकलन करता येईना. जेथे तीव्रतम बुद्धि थाबते, तेथून श्रद्धेचा प्रान्त सुरू
होतो, हें त्याला मान्य नव्हतें. उलट तेथूनच नास्तिक्याची महति कळूं लागते
अशी त्याची मनोरचना होती. पाश्चात्य विद्येनें त्याला बरींच बेगळालीं ज्ञानद्वारें
उघडून दिलीं होतीं. त्यात तो यत्किंचितसुद्धा दंभ न बाळगता मनसोक्त संचार
करीत होता. आणि म्हणूनच गांधीसुद्धा शरीरसुखाची पायरी आक्रमूनच पुढें
गेलें आहेत असें त्याला वाटलें. आणि त मुळींच चुकीचें नव्हतें. तेवढ्याकरता
गांधींचें " आत्मचरित्र " साक्षीकरिता पुढें करण्याचें कारणच नव्हतें. गांधींना
मुलेबाळें आहेत, त्यांनींही आपल्या मुलांचीं लग्नें लावून दिलीं आहेत या गोष्टी
जगजाहीरच आहेत. परंतु शरीरसुख ही एक पायरी आहे, साधन आहे,
त साध्य नव्हे, ही उघडया अंतश्चक्षूंची जाणीव मृगेंद्राला नव्हती. आज
सायंकाळीं त्या नदीतिरीं तरी त्याची शरीरसुखाभिलाषा खूप फोफा-
वली खरी. पण त्याबद्दल त्यालाही दोष देता येणार नाहीं. आज नाहीं
उद्या, लवकरच आपले कस्तूरशीं लग्न होणार या भावी संसारसुखाच्या
आशेनें, त्यानें अनेक पाश्चात्य चवचाल तरुणींनाही धिःकारिलें होतें; आणि आता
जर नेमक्या त्याच सुखकुसुमावर परमेश्वरानें, कधींही न विझणारा, नव्हें, प्रत्यहीं
फुलणारा निखाराच ठेवून दिला, तर त्या तरुणानें तरी विरक्त नये तर काय
करावें ?जावें त्याच्या वशा, तेव्हाचीं ते कळें.

मृगेंद्राची अशी मानसिक जाळपोळ चालली असता त्याला नदीच्या पुलिनातून
एक गोड गाणें ऐकूं आलें. तें एका मुलीच्या कंठांतून येत होतें. हें त्यानें तात्क-
ताळ ओळखिलें ! कारण ती त्याकडेच येत होती. ती गात होती.

पद

सुधा-कलश प्रभु प्रेमरसाचा । प्रेमरसाचा । भूवरि साचा ॥ सुधा० ॥
लाभे मजसी न्यून नसे तरि
व्यर्थ असे हव्यास सुराचा ॥

या रसरंगीं रंगे कोणी
तो भाग्याचा भूवरि साचा
सुधाकलश प्रभु प्रेमरसाचा । प्रेमरसाचा । भूवरि साचा ॥

हें गोड गीत एकतारीवर सुस्वर आवाजानें गात गात मृगेंद्राजवळून ती कन्या-चालूं लागली. ती स्वत: आपल्या नादात इतकी गुंगली होती कीं, मृगेंद्र तेथें असल्याचें तिच्या लक्षात सुद्धा आलें नाहीं. पण आपल्या अस्तित्वाची तिला जाणीव करून देण्याकरता म्हणा, किंवा तिचें ते गाणें, अथवा तिचा तो गोड गळा ऐकल्यामुळें म्हणा, मृगेंद्रानें ' ओहो!' असा उद्गार काढला. तशीं ती बाला दचकली. मग मात्र तो ओशाळला, व म्हणाला,

"मला क्षमा करा. आपणास दचकून टाकावें अशी माझी इच्छा नव्हती."

"ममजलं" एवढेंच म्हणून ती पुढे चालूं लागली. तिला क्षणभर थांबवावें, आणि तिच्याशीं थोडेंसे बोलावें अशी त्याची इच्छा होती, पण संकोचवृत्तीनें त्याला तसें करता येईना. तथापि तिच्या गानानें लुब्ध होऊन, पण आपण मुद्दाम तिच्या मागे जात आहोत असें तिला तर वाटू नये अशा बेतानें तो हा तिच्या मागून दहाबारा पावलांच्या अंतरानें वाळवंटातून चालूं लागला. साधारणपणें फर्लांगभर तें तिच्याही लक्षात आलें नाहीं. परंतु तिनें आपलें पाठीवरचें एक विलक्षण आकारचें गाठोडें मोठ्या सावधगिरीनें वाळूवर ठेवलें, तशीच ती एकतारीही ठेविली; व आपल्या लांबच लांब पायघोळ कफनाचा गळबंद सैल करून ती कफनी काढणार तोंच मृगेंद्र तिला दिसला, तसा तिनें घाईनेंच कफनाचा बंद पुन्हां सावरून बांधला व गाठोडें, एकतारी उचलून घेऊन ती जाऊं लागणार, तेव्हा तिला मृगेंद्र म्हणाला,

" छे छे. आपणाला स्नान करायचं आहे असं दिसतं खुशाल करा. मी जातों. आपल्या गोड आवाजानें मी केवळ गीत ऐकण्याकरता आपणामागें चालत होतो. मग क्षमा करा हें पद कोणाचें एवढं कळेल का ? "

या प्रश्नाचें सरळ उत्तर न देता ती बाला त्याच्याकडे साश्चर्य मुद्रेनें पाहूं लागली. थोडया वेळानें तिनें त्याला विचारिलें,

" आपण तर महाराष्ट्रीय दिसता, आणि हें पद कोणाचं आहे, हें विचारता. आश्चर्य नव्हे कां ? "

" मी सुरतेला रहातों. "

" सुरतेला राहून इंग्रजी कविता व कवि देखील आपणाला माहीत असतीलच."

मृगेंद्र निरुत्तर झाला. पण त्याला तिजबद्दल आदरही वाटूं लागला, तो म्हणाला,

" इंग्रजी कविता वाचावी लागते. "

" कां ? "

" परीक्षेला नेमली असते म्हणून. "

" मग आपल्या मायभूमीच्या कविता तर आवडीनंच वाचल्या पाहिजेत. "

" कविता वाचणं सगळ्यानाच साधतं असं नाहीं. गायनाचा प्रसाद सर्वांनाच मिळालेला नसतो. " त्यानें निजबद्दलचा आपला आदर व्यक्त केला. "

" आपणांला इंग्रजी कविता त्याच्या सुरावर म्हणतां येतातच; " तिनें त्याला अडविलें. पण तेथें मात्र तिला यश आलें नाहीं. कारण तो म्हणाला,

" मला फिडल् द्या. मी म्हणतों. "

" हें घ्या. " तिनें गाठोडें सोडून फिडल्केसमधून फिडल् काढीत म्हटलें. नंतर मृगेंद्रानेंही फिडल् लावून गायनाची तयारी केली. पण शंका आल्यावरून तिला त्यानें विचारिलें,

" क्षमा करा हो. आपणांला इंग्रजी समजतं का ? "

" भावार्थ कळत नाहीं. पण स्वरज्ञान थोडंसं आहे. आपण म्हणा ? "

मृगेंद्रानें मग एक लहानशी कविता म्हटली.

Her dress was greener than the tenderest leaf
That trembled in the sunset glare aglow:
*Herself more delicate than is the brief*
Pink apple-blossom, that may showers lay low,
And more delicious than's the earliest streak
*The blushing rose shows of her crimson cheek.*

खरोखरच मृगेंद्रानें ही कविता फारच चांगली म्हटली. त्याचाही आवाज गोड
ता. गानलुब्ध होऊन आपल्या मागें हा तरुण उगाच आला नाहीं हें त्या
वेला पटलें. शिवाय त्याची मुद्राही सभ्यपणाचीच होती. तिला आनंद झाला
नें विचारिलें.

" ही कविता कोणाची ? "

" आपण म्हटलेलं पद कोणाचं हे सांगा अगोदर. "

" जळगावच्या सोनाळकराचं. "

" फारच गोड आहे. मला भारी आवडलं. मी म्हटलेली कविता इंग्लंडच्या राजकवीची आहे. त्याचं नाव Robart Bridges.

" आणि त्या कवितेचं नाव ? "

" कुमारीचं दिव्य भावदृश्य. पण कुमारी म्हणजे वसंत श्री त्यानं कल्पिली आहे. "

" मला अर्थ करून सांगता का ? "

" हो. " असें म्हणून त्यानें फिरून फिडल् लाविलें.

पद

हिरवा शालू तिचाच जादा वेलीहुनि कोंवळा;
तियेच्या अंगीं बहु शोभला !
सायंकाळीं कवळ्या किरणीं वेल जशी लपकते !
तशी ती कन्याही खेळते !
भुंग्याच्याही ओझ्यानें जे रेणु पडति भूवरी
तयाहूनि नाजुक ती सुंदरी !
चाल—ज्या वसंतात फुलतात गुलाबी कळ्या;
त्यातल्या गोजिऱ्या आतल्याच पाकळ्यों !
रंग तयाचा दो गालावर कन्येच्या शिंपला
कसा अन् कोणी हो पसरिला ?

" वाहवा ! फारच गोड ! ! हें भाषांतर कोणाचं ? "

" माझंच; अर्थातच फरक केले आहेत "

" करावे लागत असतीलच. पण कोवळी वेल हिरवी असते का ? निदान तिचीं कोंवळीं पानं तरी तांबडी असतात. अगदीं निव्वळ तांबडी नसतात. तांबूस रंगाचीं असतात; पण हिरवीं खचीत नसतात. "

" विलायतेंत—विलायतेंत कशाला आपणाकडे सुद्धा आयव्ही नावाची लता पानासह नेहमीं हिरवीच असते. पॅशन फ्लॉवरची लताही सुंदर, सुकुमार व

सदा हिरवी असते. तथापि ताबूस पानाची लता अधिक नाजुक, अधिक मोहक व अधिक साजुक दिसते खरी."

" पण मुंग्याची तर कोमल स्पर्शाची ख्याति आहे. " तिनें दुसरी शंका काढिली,

" प्रत्यक्ष अवलोकन करून आपण कविसंप्रदाय बदलले तर ते जास्तव मोहक दिसतात व असतातही. मुंग्याचे शरीर असे असतें कीं, त्याला कठीण अशा लांकडावरही हलकेंच चसावें लागतें. तो चिडून अंगावर आला तरी अंगावर बसला तर हलकेंच बसतो. शिवाय कांहीं कांहीं फुलें खालच्या तोंडाचीं असतात. तीं मुंग्याच्या सुकुमार स्पर्शानेंसुद्धा रेणु खालीं टाकतात. मला वाटतें कीं, मुंग्याच्या स्पर्शानें कुसुमांची सुकुमारता मोजण्यापेक्षा युवतींच्या सौंदर्यकणांनीच ती मोजावी.

"-अथवा युवकाच्या विनोदलहरींनीं मोजावी, असो आपण स्वतः कवि आहांत हे पाहून मला आनंद वाटतो. पण अशा कवीनें—" ती बोलतां बोलतां थांबली.

" कवीनें ? पुढें काय म्हणणार होता ? "

" काहीं नाहीं. एक कविता मी फिड्लवर म्हणूं का ! "

" वा ! वा ! जरूर ! जरूर ! "

ती गाऊं लागली—

गझल

| | |
|---|---|
| कवीनें काव्य कां गावें ? | मरोनी कां न हो जावें ? |
| कुणाला प्रेम ना देता | असें कां राहि हिंडावें ? |
| मृगानें ऐकलें नाहीं | कधींही गाइलें रान, |
| तन्ही वेलिविना हो | कुठें कां शोभला छान ? |
| नमे तो देव आकाशीं | कुणीही देवतेविना; |
| हरीसी शांतवायानी | धरी लक्ष्मीच ती वीणा ! |
| मुरारे ! राधिकेला या | उगा कां विधिशी ऐसें ? |
| तुझे हे खेळ ललिके | सहावे पामरें कैसें ? |
| शरानें विंधुनी जातो | मृगांते व्याध हा येथें, |

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

सदा हिरवी असते. तथापि तावूस पानाची लता अधिक नाजुक, अधिक मोहक व अधिक साजुक दिसते खरी."

"पण भुंग्याची तर कोमल स्पर्शाची ख्याति आहे." तिने दुसरी शंका काढिली,

"प्रत्यक्ष अवलोकन करून आपण कविसंप्रदाय बदलले तर ते जास्तव मोहक दिसतात व असतातही. भुंग्याचे शरीरच असे असतें कीं, त्याला कोणत्या अशा लाकडावरही हलकेंच बसावें लागतें. तो चिडून अंगावर आला तरी अंगावर बसला तर हलूंच बसतो. शिवाय काहा काहीं फुलें खाल्च्या तोंडाची असतात. तीं भुंग्याच्या सुकुमार स्पर्शानेसुद्धां रेणु खालीं टाकतात मला वाटतें की, भुंग्याच्या स्पर्शानें कुसुमाची सुकुमारता मोजण्यापेक्षां युवतीच्या सौंदर्यकिरणांनी ती मोजावी.

"अथवा युवकाच्या विनोदलहरींनी मोजावी, असो आपण स्वतः कवि आहांत हें पाहून मला आनंद वाटतो. पण अशा स्त्रीनें—" ती बोलता बोलतां थबकली.

"स्त्रीनें ? पुढें काय म्हणणार होता ?"

"काहीं नाहीं. एक कविता मी फिड्लवर म्हणूं का ?"

"वा ! वा ! जरूर ! जरूर !"

ती गाऊं लागली—

गझल

क्षीनें काव्य कां गावें ? मरोनी कां न हो जावें ?
कुणाला प्रेम ना देता अनें कां रानिं हिंडावें ?
स्मृगानें ऐकलें नाहीं कधींही गाइलें रान,
तव्ही बोलिशिना हो कुठें वा शोभता छान ?
नमे तो देव आकारीं कुणाहीं देवनेवीला,
हरीसी शांतवायासी धरी लक्ष्मीच ती वीणा !
मुरारे ! राधिकेला या उगा कां विधिनी ऐसें ?
तुझे हे खेळ लीलेचे सहावे पामरें कैसें !
शरानें विंधुनी जातो स्मृतीने व्याघ हा केवें,

त्या बालेनें हें पद एवढेंच म्हटलें, व म्हटलें तेंही इतकें साभिनयन इतकें सुन्दर आवाजीनें म्हटलें कीं, मृगेंद्राचीं अर्ध्यां तासापूर्वींचीं सुखभिलाषा उमळली यांत काहींच नवल नाहीं. Pe it up forces burst asunder या कथ्यूकीला [illegible] प्रत्येनाला आपल्या स्वनाच्या अंत करणात सापडेल तसा मृगेंद्राचा [illegible]!

× ×

' काय दिस[illegible] [illegible] त्या टेकडीवर? " मृगेंद्रानें त्या बालेला विचारलें. " महात्माजा कीं काय? "

मृगेंद्राचे प्रश्न निचाहून मंत्रमुग्धा नम्नलि. तोंच ती लावण्या टेकडीवरच्या [illegible] प्रतिमेशीं झाली.

' मला वाटतें कीं ते माझे वडील असावेत. महात्माजी इतके उंच नाहीत. " तिनें उत्तर दिलें.

' मग तुझे वडील राम वर्माक? "

' प्रेमापुढे अर्जुनापाशा राम काय किमतीचा? "

मृगेंद्रानें तिला [illegible] आलिंगून चुंबिलें, व आपली एक पाचूची [illegible] तिच्या गुलजार अनामिकेंत घातली व नंतर सहजगत्या तिला नांव विचारलें.

' माझें नाव गुलारजादी "

" गुलस्थान ! " मृगेंद्र चकित झाला. त्याची दृष्टि क्षणमात्र [illegible] वळली तों त्याला ती उंच मूर्ति फिरून तेथेंच दिसली, व फिरून [illegible] नाहींशी झाली. मग मात्र मृगेंद्राकडून रहावेना. तो तसाच त्या टेकडीवर [illegible] गेला. पण त्याला तेथें एक चिटपाखरूं देखील दिसलें नाहीं. मग [illegible] करून घराकडे वळला पण साऱ्या रस्त्याभर मनांत म्हणत होता, " [illegible] महात्मा खरा ! पण सैतान कीं साधु ! "

पुस्तक पहिलें

# महात्मा !

भाग २ रा

## शेरणावरचा हिरा !

हिऱ्यास लावा कानसीच; त्या ऐरण कां दावितां ?
दरिद्री होतां कां हो स्वतां ?
हिरे पारखा; राखां त्यांना हृदयाच्या कोंदणीं;
द्या ते फेकुनि नकली मणी !

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

§ १ मृगेंद्र बार्डोलीच्या सत्याग्रहाश्रमाकडे वळला खरा, पण त्याचे पाय तिकडे जाण्याला धजेनात. त्याच्या हातून नुकतेंच असें कर्म झालें होतें कीं, ज्याला वाईटहि म्हणता येईना कीं चांगलेंहि म्हणता येईना. तरी देखील त्याच्या मनाला तें खात होतें. मनाला खाणारें तें कुकर्मच, असा सरांस निकाल देणें खचित अन्यायाचें होईल. पण आपल्या कर्मांची न्यायान्यायता पाहण्याकडे मृगेंद्राचें तूर्त लक्षच नव्हतें. तो खरोखरच विचार करकरून थकून गेला होता, व त्याची जी प्रतिक्रियेची सुखाभिलाषेची मन स्थिति, तींत तो असतानाच दैवानें त्याच्यावरवीं तें कर्म करवून टाकलें होतें. त्याच्या विषयीं त्यानें खरोखरच विचार केला नसता; पण त्या टेकडीवरील ज्या माणसानें तें पाहिलें असेल, अथवा त्याला तें दिसलें असेल तो माणूस गांधी असावे, अशी त्याला जबरदस्त शंका आली आणि ती शंका होती म्हणूनच त्याला त्या कर्माचें शल्य बोंचत होतें. ती मूर्ति प्रत्यक्ष गांधींच होते अशी त्याची खात्री असती तर त्याचें थोडेंसुद्धा वाईट वाटलें नसतें. कारण तो तसा बराच स्वतंत्र होता. त्याचे वडील तर फारच फार सुधारक मताचे होते त्यांना आपल्या मुलानें एखाद्या मुसलमान कन्येशीं अशा प्रकारानंतरहि लग्न लाविलें असतें तरी चाललें असतें. फक्त संपत्तीचे पाट वधूनें आपल्या पितृगृहाहून आपल्या घरात वाहविले पाहिजेत एवढी एकच अट त्यांना अनुल्लंघनीय वाटे. त्यामुळें तो प्रकार मृगेंद्राला तसा फारसा भेडसावीत नव्हता. स्वतः त्याची हल्लींची मन स्थितिहि खरोखरच गुल्नारजादीला पुष्कळच अनुकूल होती. ती मुसल्मान कन्यका लावण्यवती होती, तरुण होती, कुमारिका होती, रसिक होती, हुशार दिमत होती; तिचा कंठ तर अत्यंत मधुर होता, तिला वायोंही वाजविता येत होता; तिनें सोनाळकराचें पद आळवून आळवून मोठ्या आवडीनें म्हटलें होतें, त्यावरून ती धार्मिक वृत्तीची असावी असा तर्क करण्यास जागाहि होती, आणि सर्वांत मुख्य गोष्ट जी पतिमन रिझविण्याची, तींत ती तर मृगेंद्राची आय देवताच होती, तेव्हा तिच्यावरचें आपलें प्रेम खरोखर हृदयानत्याहि हृदयातलें आहे–असें तो समजत असे. फक्त झालेल्या प्रकार तिच्या ज्याच्या कळला, व ती व्यक्ति महात्माजी, हें अत्यंत वाईट झालें असें त्याला वाटलें. अशा कांहीं सुखाच्या व कांहीं विषण्णतेच्या स्थितींत तो आश्रमाकडे जात होता. पण त्याची इच्छा गुल्नारकडे जाण्याची होती. तो तिला पाहण्याकरतां मधून मधून

आसपास न्याहाळी; पण ती त्याला दिसली नाहीं. पण एक गांधीभक्त मात्र त्याला दिसला. त्याला मृगेंद्रानें विचारिलें, "महात्माजी आश्रमात आहेत ना ?"

"महात्माजी आजच सुरतेला गेले."

"केव्हा ?"

"दुपारींच"

"अशक्य ! मी त्यांना आता पंधरा वीस मिनिटांपूर्वी त्या टेकडीवर पाहिलें"

"शक्य नाहीं. ते आता सुरतेला कमिशनरशीं बोलत असतील."

"मग माझाच दृष्टिभ्रम असेल अं."

"शक्य आहे. गांधीटोपीवाले सरकार पक्षीयांना गांधीच भासतात."

"आपण व आपले मित्र स्वतःला फार मोठें गणता."

"आम्ही गणीत नाहीं. सरकार गणतें. गांधींचा पोषाख त्यांच्या डोळ्यात सलतो. गांधीटोपी तर त्यांना फारच ताप देते."

"तें तुमचें तुम्ही पहा."

"का ! आपणाला स्वदेशाशीं काहीं कर्तव्य नाहीं की काय ?"

"आपण स्वतः त्या टेकडीवर गेला होता काय ?" मृगेंद्रानें वरून सहजगत्या पण अंतर्यामी मुद्दाम विषय बदलून विचारलें.

"नाहीं बुवा."

"आपल्या आश्रमात मुसलमान आहेत काय ?"

"हो. आपणाला कोण पाहिजे ?"

"मला कोणीच नको. सहज विचारिलें."

"आपली पर्णकुटी आली. मी आपलें काय काम नसं मागा."

"तुर्त एक काम करा. मी नदीकडून येत असतां, एक मुसलमान बन्धना नदीकाठीं गात बसली होती. ती अजूनही तेथेंच असेल. रात्रीं तिला एकटीलाच. रानांत राहूं देणें चांगलें. आपण तिला सोबत करा."

"करतों, पण आपण का तिला तसं सोडून आला ?"

"माझी ती मुळींच ओळखीची नाहीं. शिवाय मी एकटाही नाहीं."

" कोणती मुलगी म्हणता ? गुल्नारजादीच का ? "

–" तिचं नाव मला कसं कळणार ? पण ती फिडल फार चांगलं वाजविते. "

" मग तीच ती. गुल्नारच ती. तिची काळजी करण्याचं कारणच नको. ती महात्माजींची मानलेली कन्याच आहे. या आश्रमाची ती प्रत्यक्ष देवता आहे. इतका पवित्र जीवात्मा—

" आणि रसिक देखील. "

" महात्माजी तिचं लवकरच लग्न करून देणार आहेत. "

" तिला आईबाप नाहींत का ? "

" आहेत, पण ते फारच गरीब आहेत. सात्त्विक आहेत, पण मोठे धार्मिक-वृत्तीचे आहेत. अलीकडे त्यांनी आपला मूळ धंदा सोडून कोष्ट्याचा धंदा पत्करिला आहे. त्याचा अर्थातच आपल्या एकुलत्या एक मुलीवर जीव की प्राण लोभ आहे. "

" स्वाभाविक आहे. अन् ती तशी गोड स्वभावाची मुलगी दिसते. पण काय हो, ती मुसलमान असून तिला मराठी इतकं चांगलं कसं येतं ? तिनं तर जळगावच्या एका कवीचंच पद आरंभी म्हटलं. "

" ते मूळचे जळगावचेच रहाणारे, खुद्द जळगांवचे नाहीं, जळगावहून दोनच मैल असणाऱ्या खिराळ्याचे ते रहाणारे. तसेच मूळचे ते हिंदूच होते, परंतु औरंगजेबाच्या म्हणा कीं, नंतर कोणा मुसलमान राजाच्या जुलमी कारकीर्दीत ते बाटले; ते म्हणजे त्याचे पूर्वज. खानदेशात अशीं अनेक हिंदू बाटगीं घराणी आहेत. त्यांच्या घरीं अजूनही रामपंचायतन आहे. शिवाय गुल्नारजादी मराठीतली व्हर्नाक्यूलर फायनल परीक्षा पास झाली आहे. जळगांवचे कवि तिला माहीत असणं काहीं नवलाचं नाहीं. "

" जळगांवास किती कवि आहेत ? नामांकित अं ! "

" दोघेच. मोनाळकर व तिवारी. "

" ' गुलाबाला प्रभु प्रेम स्याचा, ' ही कविता कोणाची आहे ? "

" मोनाळकरांची. तें पद मग ती नेहमी म्हणत असे. तिवारींनी कविता लिहि

आवडत नाहीं. वास्तविक तिवारींचेंच नाव महाराष्ट्रात जास्त प्रसिद्ध आहे. पण प्रत्येकाच्या मनाची ठेवण वेगळी असते हेंच खरें."

"तिवारींची संग्रामगीतें माझ्या वाचण्यात आलीं आहेत. रस्त्यावर देशभक्तीचा प्रसार करायला तीं चांगलीं आहेत, पण कल्पनानाविन्य, भावना-दार्ढ्य, वृत्तवैचित्र्य, भाषासौष्ठव, स्फूर्तिस्वातंत्र्य, नवे नवे पण सार्थ शब्द निर्माण करण्याची प्रतिभा, वगैरे काव्यगुण तिवारींच्या कवनातून आढळून येत नाहींत.

आश्रम जवळ असून सुद्धा मृगेंद्र काव्याच्या गप्पा मारीत उभा होता. कारण त्याला कस्तुरीसमोर जाववेना. कदाचित् गुल्नारजादींची जास्त माहिती मिळ-विण्याचीही त्याची इच्छा असेल. पण त्या गांधीभक्ताचें आता त्याच्याकडे विशेष लक्ष नव्हतें. शेजारच्या झोपडीतून हातमागाचा आवाज त्याच्या कानावर येताच त्याचें तिकडेच जास्त लक्ष लागलें होतें तें पाहून मृगेंद्र म्हणाला,

आपणाला हातमागाचा आवाज काव्यापेक्षाही जास्त आनंद देतो, हें पाहून मला महात्माजींचं फारच फार कौतुक वाटतं. सगळेच गांधीभक्त असेच चरका-भक्त आहेत का?"

'असा अपेक्षा आहे."

इतक्यात त्याच शेजारच्या झोपडींतून फिडलचे सूर निघाले व लवकरच गुल्ना-रजादीनें मृगेंद्राचें, ' हिरवा शालू तिचाच जादा वेलीहुनि कोंवळा,' हें पद म्हटलें. तें संपेपर्यंत हे दोघेही स्तब्ध होते तिकडे तें पद संपल्यावर मृगेंद्र गांधीभक्ताला म्हणाला,

"माझं एक काम कराल काय? फारच तातडीचें आहे "

"बोला."

"एक मोटार आणता काय? मला आताच्या आता सुरतेला गेलंच पाहिजे."

"एकाएकी?"

"हो. अगदीं या मिनिटाला. हा असाच निघायला मी तयार आहें. मला महात्माजींना या क्षणीं भेटायचं आहे. भेटलंच पाहिजे."



४

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

" हे उद्यां सकाळीं दहा वाजता परततील."

" या क्षणीं येत नाहीत ना? त्यांच मसाला घेऊन लावता? मिळेल का मोटार?"

" मिळेल? तयार आहे. दोन मिनिटांत निघतां येईल. त्या गॅरेजमध्ये मोटार आहे फक्त ड्रायव्हरला आणायचं एवढंच."

Very good! जा मग, आणा त्याला."

गाधीभक्त गेला. मृगेंद्र मात्र तेथें तसाच उभा राहिला. छे. छे. तो गुन्हा- रच्या झोंपडीच्या सावलींत उभा राहिला. अर्थात् आपण कोणास दिसूं नये अशीच त्याची इच्छा होती. त्याच्या मनांत मात्र विचारतरंग सुरूं झाले. "आज- पासून आयुष्यांतला खडखाळ मार्ग सुरूं झाला असं दिसतं. ती कस्तुरीची पर्ण- कुटी व ही गुल्नारची झोंपडी. ती वाग्दत्ता वधू आणि -ही—कोण?" या प्रश्नाचें, त्यानें मनातल्या मनातच का होईना, पण ठासून उत्तर दिलें. "अर्थात् धर्मपत्नी!" 'धर्मपत्नी' शब्दाचा पडसाद संपत नाहीं तोंच त्याच्या चेहऱ्या- वर चिंतेचे मेघ पसरले. त्यानें वर पाहिलें तों तेथेंही त्याला चंद्रावर ढग आलेले दिसले. ह्या बिकट परिस्थितींतून गुल्नारसह सुखरूपपणें बाहेर पडणें त्याला एकट्याला शक्य नव्हतें. तो स्वत धर्मांतर करायला तयार नव्हता, पण गुल्नारविषयीं त्याला कांहींच विचार करता येणार नव्हता. तिच्या आईबापाजवळ ती गोष्ट काढावयाला त्याला एक तर वेळ नव्हता; शिवाय त्याना अजून त्यानें पाहिलेंही नव्हतें. त्याच्या रीतिभाति, त्याची राहणी, त्याचे विचार, त्याची धर्मनिष्ठा, वगैरेविषयीं त्याचें मन अजून साफ कोरें होतें पण महात्माजींना सर्व गोष्टी सांगाव्या व त्याची मदत घ्यावी असें त्यानें, तें पद नुकतेंच ऐकलें, त्यावेळीं मनाशीं ठरविलें होतें. कस्तुरीला अगर गुल्नारलाही भेटण्याची त्याची त्या स्थळीं तरी छाती नव्हती. कस्तुरीला तर भेटण्याची त्याची इच्छाही नव्हती

मोटार आली. मृगेंद्र तींत तसाच बसला। मोटार निघणार इतक्यात गुल्नार झोंपडींतून तेथें आली, व त्याला म्हणाली, " आपणाला आज संध्याकाळीं सोनाळकराचं पद आवडलं असं दिसतं, तेव्हा हें त्यांच, 'कमलपराग' नावाचं पुस्तक मी आपणांस देते तें घ्याल काय? आणखी हेंही पण घ्या."

" हें दुसरं कोणतं ? " नृगेंद्राने पुस्तकें घेऊन विचारिलें. " तिवारींचीं संग्रामगीतें ! हें माझ्याजवळ आहे; " तो पुस्तकें चाळीत असता पुढें म्हणाला, " ठीक आहे. आपण प्रेमानं पुस्तकं दिलींत; आभारी आहें. आपणास जर तिवारींची कविता आवडते तर मलाही ती आवडेल. " माझ्यावरता नको. " ती हसून म्हणाली. तिवारींना मी सोनाळकरांप्रमाणेंच गुरुस्थानीं लेखते. आपण " संग्रामगीतावरचा नाथ निफाडकरावरचा लेख अवश्य वाचा. "

" कोठें सापडेल ? "

" ह्या 'लोकमान्या'च्या अंकात " असें म्हणून तिनं तो अंकही त्याला दिला.

" निफाडकर आपल्या ओळखीचे आहेत काय ? ते देखील कवि आहेत; नाहीं ? "

" हो. ते तिघे परस्पराचे चांगले स्नेही आहेत. खानदेशच्या कवींचा स्नेह आदर्शवत आहे. "

" प्रान्तिक अभिमान. "

" नव्हे. ते तिघेही बेहरे, अधिकारी, माधव ज्यूलियन, अनंततनय, भिडे, अकोल्याचे थी, गिरीश वगैरेंचे स्नेही आहेत. मी जशी पार्ल्यांत आलें आहें, तसे निफाडकर नाशिकांत गेले आहेत, व असं कळतं कीं ते बागलाणांतही राष्ट्रकार्य करीत आहेत. तिवारी व निफाडकर यांवर अहंकाराचा आरोप निष्कारण आहे. "

" तिवारींचं मला माहीत नाहीं त्यांचा अहंकार असल्यास तो खाजगी वर्तनात दिसून येत असेल. पण निफाडकररावरचा आरोप मात्र वाङ्मयप्रान्तात सार्वजनिक स्वरूपाचा आहे खरा. पण मला जेवढी त्यांची वाङ्मयसेवा माहीत आहे, तिच्यावरून त्यांच्या त्या वृत्तीला मी आत्मप्रत्ययात घालीन, असा आत्मस्पर्धी भाव जरूर हवा. निफाडकर खाजगी वर्तनात अहंकारी आहेत काय ?

" मला माहीत नाहीं. पण नसावेत असं मला वाटतं. तुम्ही म्हणता तेंच खरं. आपणाला कांहीं प्रसंगीं करारीपणा बाळगावा लागतो. तो ज्यांना सहन होत नसेल त्यांनी त्या आत्मस्पर्धी भावाला अहंकारात [illegible] नाहीं. मलाही निफाडकर आत्मस्पर्धीच दिसतात.

" तुमचं मराठींचं वाचन आधुनिक कालापुरतं तरी बरंच दिसतं."

" मला तें भारी आवडतं. पण आता एकदम निघाला ? कुठं ? "

" सुरतेला. "

" एकदां माझ्या आईबापांना भेटून जाल काय ? मला आनंद वाटेल. "

मृगेंद्राला ' नाहीं ' म्हणण्याची सोयच नव्हती. तो उतरण्याकरितां उठला इतक्यात मोटारच्या दुसऱ्या खिडकीशीं वस्तूरी आली; व त्याला म्हणाली;

" कुठं गेला होता ? बरंच लांबवर जाऊन आलात वाटतं. चला; मी जेव-णाची अगदी वाट पाहून होतें. आपली झोपडी ती पलीकडली हो. या पर्ण-कुटींत भाई आहेत. त्यांनीं तुमची दोनदा आठवण केली. "

मृगेंद्राच्या हृदयाचा त्यावेळीं भाववाचक नकाशा काढण्यासारखा झाला होता. पण तो अत्यंत समयज्ञ होता. तो म्हणाला; " चल, मी आलोंच. या शेजारच्या झोंपडींतल्या एका वृद्ध व सात्त्विक भक्ताला मी भेटून येतों. "

" किती वेळ लागेल ? "

" दोन मिनिटें. "

" मग मीही येतें, चला. "

मृगेंद्राला वस्तुरीलाही, ' नाहीं म्हणण्याची सोय नव्हती. तो खालीं उतरला; व शोफरशिवाय बाकी सगळे गुल्नारजादीच्या झोंपडींत गेले.

§ २ झोंपडींत पाय टाकतांच मृगेंद्राला येथें महात्माजी दिसले ! इतका समयावधानी मनुष्य, पण गांधींना तेथें पाहताच तो इतका आश्चर्यबद्ध झाला कीं, त्यानें जर झोंपडीचें कळक धरले नसते तर तो खचित झाबून पडता. तशी त्याला किंचित् मूर्च्छा आलीच होती. पण पांचपंधरा सेकंदातच तो भाना-वर आला त्यानें, इतराप्रमाणेच, महात्माजींना नमस्कार केला. त्यांनीही त्याला मोठ्या प्रेमानें आपल्या चटईवर बसवून घेतलें व शांतपणें विचारिलें.

" आपणाला सूत काढता येत असेलच ? " ते स्वतः चरका फिरवीत होतेच."

" नाहीं. " मृगेंद्रानें उत्तर दिलें. पण तो ओशाळलाही नाहीं.

" शिका कीं फार चांगलं काम असतं. "

" मला यापेक्षा वेगळींच कामं करायचीं आहेत. "

" कोणती ? "

" या प्रश्नाचं उत्तर मी इतक्यात देणार नाहीं. ' आधी केलं मग सांगितलं; अशी आमची महाराष्ट्रीयांची मनोरचना आहे. "

" चांगली आहे. मला तसं करता येईल तर मी टिळकांच्या, आमच्या लोक मान्यांच्या तत्त्वांचा पुरस्कर्ता होईन, अशी मला उमेद आहे. "

पण मृगेंद्राला राजकारणात शिरायचें नव्हतें. त्यानें विषय बदलण्याकरता, अथवा एक पंथ दो काज अशा दृष्टीनें महात्माजींना विचारिलें,

" आपण तर आज दुपारीं सुरतेला गेला होता म्हणून मला कळलं. "

" मीच याना सांगितलं." गांधीभक्त म्हणाला.

" आपण खरं तेंच सांगितलं. मी आज संध्याकाळींच परतलों."

" जाऊन यायला इतका वेळ पुरला ?" मृगेंद्रानें आपली भीति दाबून विचारिलें. तो मधून गुल्नारजादीकडे पाहत होता.

" हो. आमचे शॉफर व्हॉलंटियर्स फार हुशार आहेत. "

" पण आपल्या कामाला काहीं तरी वेळ लागला असेल ना ?"

" तीन मिनिटें. या युरोपियन अधिकाऱ्याचं मला हें वेळाबंधनमत फार आवडतं. आमच्या अंगीं तें रुजेल तर फार चांगलें होईल."

" ती संवय खरोखरच सुरेख आहे परंतु गोऱ्या अधिकाऱ्याचं एवढें कौतुक करण्याची मला जरूर वाटत नाहीं. सर्वच स्वतंत्र राष्ट्रांत ती सार्वजनिक संवय असते. आमच्या शिवकालातच कशाला, पेशवाईत सुद्धा आमचं तसंच वर्तन होतं. "

" तुमचा हा पूर्वजाभिमान पाहून मला आनंद होतो. आपल्या वडलांच्या ठायीं पूर्वजाविषयीं विपरीत भावना आहेत."

" त्याला कारण कालमाहात्म्य ! आपणसुद्धा काहीं वाबतींत पाश्चात्यांच्या गुणाचं फाजील स्तोम माजवतां. निरोळ सद्गुणाचं स्तोम आपायकारक होत नाहीं. पण अहिंसेमारख्या एकांगीतत्त्वात रमाइस्ट व टॉल्स्टॉय यांचं अंधानुकरण करून आपण बायबलच्या व कन्वेशन्सचा प्रयत्न आचार करून जगाचं नुकसान करतां आहां ! क्षमा करा. मी तरुण व अडाणी असलों तरी योग्य मर्यादा सांभाळून मला आपले विचार आपणापुढे मांडण्याम हरकत नसावी.

# महात्मा गांधी–संतान कीं साधु ?

" हरकत कमली ? आपलं म्हणणं मी कुठं अमान्य करतों ? अनत्याचारो अहिंसेचें तत्त्व मला केवळ व्यक्तीकरतांच नव्हे तर राष्ट्राकरतांहि पटलं आहे हा माझाही दोष नव्हे. आपणाला तसेंच मलाही आत्मस्वातंत्र्य हवं ना ? "

" पण आपल्या उदाहरणाच्या सर्व जगावर परिणाम होतो ना ? "

" होतो असं आपण धरून चालूं या. मग आपल्या म्हणण्याप्रमाणं माझा आचार चुकला तर तो प्रयोग चुकला असंच म्हणावं लागेल. मी सत्याकरतां दुसरा प्रयत्न करीन. "

" पण आपल्या प्रयोगानं शेंकडो जीवाचं नुकसान होत आहे. "

" उलट तो यशस्वी झाला तर कोटी जीवाचं कल्याणच होईल. "

" कबूल. पण नफानुकसानाचा अगोदर तारतम्यभाव ओळखला पाहिजे ना ? "

" मी ओळखत नाहीं का ? आजपर्यंत शेंकडों युद्धं झालींत. त्यामुळं नफे झाले तसे तोटेहि झाले. पण एकूण बेरीज किती ? जग कितीं सुखी झालं ? "

" जगाचं सुख कणाकणानं वाढण्यास हजारों वर्षं लागतात. "

" तसंच माझ्याही प्रयोगाकडे का पाहात नाहीं ? समजा अहिंसेमुळें या विसाव्या शतकात रणसंग्रामापेक्षाही जास्त नुकसान झालं, तर यातले दोष निघून जाऊन विसाव्या शतकात या तत्त्वापासून मानवाचं कशावरून कोटिकल्याण होणार नाहीं. आपण आपली दृष्टि विशाल ठेवता हें पाहून मला आपलं कौतुक वाटतं. "

" पण आपण तर वर्षांत स्वराज्य द्यावयाला तयार झाला होता ? "

" पण हिंदुस्थान तें दान घेण्यास तयार झालें नाहीं. "

" दाता पाहून जसं दान मागावं लागतं, त्याप्रमाणंच दान घेणाऱ्याची कुवत ओळखूनच दात्यानं दान देण्याची भाषा काढावी ना ? "

" नाहीं. दाता म्हटला कीं माझ्या नेत्रापुढें हरिश्चंद्र व कर्ण यांच्या मूर्ति उभ्या राहातात दान म्हणजे आत्मार्पण. राखून ठेवून बाकीचं दान हें दानच नव्हें, तो व्यापार झाला. "

" पण हें जग व्यापारावरच अधिष्ठित नाहीं का ? "

" मला आपलं विधान बरोबर कळलं नाहीं. अधिक स्पष्ट करा. "

" या मर्त्य जगात देवघेवीशिवाय जीवन तयार होणं देखील शक्यच नाहीं. "

" या मर्त्य जगांतच कशाला. सर्व विश्वात देवघेव ही आहेच. अगोदर ही आमची भूमिच तेवढी मर्त्य आहे असं नव्हे. मृत्यु सर्वत्र आहे. मृत्यु आहे म्हणून जीवन आहे; व जीवन आहे तेथें मृत्यु असलाच पाहिजे. नंतर देवघेवींतही तेच. जसं प्रत्येक जीवाला जीवन, आवडतं, तसंच त्याला दातृत्व आवडतं. कारण त्याला अनुभव असा असतो कीं, जेवढं द्यावं त्यापेक्षा जास्त परत मिळतं. आई अर्भकाला दूध पाजते, तर अर्भक आईकरता मोठेपणी प्राणापलीकडे जपते. जीवन दृश्य व मृत्यु अदृश्य; तसं दान दृश्य व ग्रहण अदृश्य. या ईश्वरीयोजनेंत जेव्हा मानव विषमता उत्पन्न करतो, तेव्हा अगोदर मनात व नंतर जनात हिंसा होते. म्हणून अहिंसा ही पूर्णत्वानं मनात अगोदर विंबली पाहिजे, म्हणजे ती जनात नंतर दृश्यमान झालीच पाहिजे. "

" महात्माजी ! आपण थोर पुरुष आहांत. आपण निश्चयी तपस्वी आहात. आपल्या जिभेवर सरस्वती नाचते आहे. उलट मी अजून अल्लड बच्चा आहे. मला जगाचं ज्ञान नाहीं. पुस्तकी ज्ञान अगदींच किरकोळ असतं; हें या गुल्नारनं- देखील मला आज संध्याकाळींच पटवून दिलं. "

" असेल. आपण आज संध्याकाळीं परस्परांशीं प्रेमानं बोलत होता खरे. मला आनंद वाटला. आमची गुल्नार फार सात्त्विक, तशीच रसिक व गोड स्वभावाची मुलगी आहे. कस्तूरबाई ! आपणाला इची ओळख करुन देतों अं ! इच्याइतकी साधी पण सात्त्विक पोर सापडणं कठीण आहे. गुल्नार ! या कस्तुरीबाईसुद्धां जरी श्रीमंत असल्या तरी, निगर्वी व प्रेमळ आहेत. या पुष्कळ शिकलेल्या आहेत. पण याची जास्त जास्त शिकण्याची तयारी असते. ईश्वर त्याना त्या कामीं धैर्य व निश्चल बुद्धी देवो !

मृगेंद्राला गाधीजींचा प्रत्येक शब्द भाजीत होता. त्याची खात्री होऊन चुकली कीं, ती सायंकाळची व्यक्ति गाधीच होते. त्याच्याशीं आता त्याविषयीं बोलून टाकण्यास तो उतावळा झाला होता; आणि तेथें कस्तुरी नसती तर त्यानें कदाचित् बोलूनही टाकिलें असतें. पण तो आता गांधीजींशीं खासगी मुलाखतीची गोष्ट वाढणार होता. पण गाधीच त्याला मध्यें म्हणाले,

" गुल्नारचे वडील आहेत. यांचें नाव उमरखानसाहेब. या त्याची पत्नी. यांचं नाव हजाराबिबी. दोघेही फार धार्मिक प्रवृत्तीचे आहेत; पण धर्मांध नाहींत. मुसल-

पुस्तक पहिलें

# महात्मा !

भाग ४ था

## चंद्रावरचें ढग

" बरोबरीच्या वयाचे मुलगे असलेल्या देवांगना देखील कामवासनेला बळी पडून, आपल्या नवऱ्यांना सोडून, पुत्रतुल्य तरुणाचा हात धरून जातात हें देवांच्या कपटाचें प्रायश्चित्त नव्हें, तर काय आहे—" कलंकरहस्य

श्रीपाद महादेव वर्दे—

§ १ मृगेंद्र व कस्तुरी यांचें जेवणखाण संपल्यावर तीं दोघेंही एकदां नरोत्तमभाईंना भेटून आलीं; आणि महात्माजींकडून त्यांच्याकडे मोटार आली होती, तींत बसून तीं महात्माजींच्या पर्णकुटींत गेलीं. नंतर महात्माजींनीही आपण स्वतः त्या मोटारींत बसून त्यांना नदीच्या त्या विशिष्ट स्थळाजवळील तीरावर नेलें; आणि शोफरला बरोबर दोन तासांनी परत येण्यास सांगून मोटार परत पाठवून दिली. नंतर ते म्हणाले;

" हें स्थळ अगदीं निवांत आहे. येथलीं ही झाडी रहानशींच आहे; पण मोठी दाट व सुरेख आहे. मृगेंद्रनाथ, आपली आज संध्याकाळची मनःस्थिति या स्थळाची शोभा पाहण्यासारखी नव्हती—

" आणि आताही नाहीं. "

" स्वाभाविकच. तथापि आपण आपल्या विषयाचें सुतोऽवाच कस्तूरबाईजवळ केलं असेलंच. "

" मुळींच नाहीं. "

" मींही पण विचारलं नाहीं. " कस्तुरी म्हणाली.

" एका परीनें तेंहीं बरं झालं म्हणायचं आता मृगेंद्रनाथ, आपण आरंभ करण्यापूर्वी तुम्हां दोघांनाही माझी अशी विनंति आहे की, माझंही म्हणणं पूर्णपणें विचारात घेऊन नंतरच दोघांनी काय करायचं तें करावं. माझ्या सल्ल्याप्रमाणं तुम्ही चालावंच असा माझा मुळींच आग्रह नाहीं. फक्त माझं म्हणणं निर्विकार चित्तानं ऐका; त्यावर शांतपणें विचार करा; व नंतर तुमचं शिकलेलं व सुसंस्कृत झालेलं मन तुम्हांस जसं वागायला सांगेल तसं निर्धास्त वागा."

" एकूण आपणांला यांनी कांहीं तरी सांगितलें आहे असं दिसतं." कस्तुरी म्हणाली.

" यांनी सांगण्याचं कारणच नव्हतं. मी स्वतः डोळ्यांनी पाहिलं आहे."

" इतकं महत्त्वाचं प्रकरण आहे की काय!" तिनें विचारलें.

" महत्त्वाचं आहे आणि नाहीं; आपण देऊं तर महत्त्व आहे; नाहीं तर मुळींच नाहीं." मृगेंद्रानें प्रथमच प्रसन्नतेनें तोंड घातलें. " कस्तुरे! काय

झालं अन् काय नाहीं, हें मी तुला आतां मनमोकळेपणानं मागणार आहें; पण त्यापूर्वी तूं आपल्या मैत्रीचीं व प्रेमाचीं चित्रें डोळ्यांसमोर आण. आपली झाइन्ह डेन-मध्यें भेट झाली तेव्हांपासून, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, स्वित्झर्लंड, इटली, अमेरिका, जपान व सबंध हिंदुस्थान यांतले आपले प्रवासांतील संवाद, गम्मती व प्रेमसंभाषणें देखील लक्षांत घे. कस्तुरी, इतक्यात मला एका पौराणिक गोष्टीची आठवण झाली. शकुंतलेला दुष्यंतानें, विस्मरण पडून, नाकारून टाकलं, त्यावेळीं तिनं त्याची स्मृति जागृत करण्याकरतां आपले प्रेमप्रसंग कथन केले. तसाच कांहीसा प्रसंग आज माझ्यावर आलेला आहे. आपले तसे प्रेमप्रसंग झाले नाहीत तरी; पण आज या शकुंतलेपुढें हा दुष्यंत, कांहीं विशिष्ट हृदयवेदनेचा पाढा वाचून मन मोकळें करण्याकरितां, तिला पूर्वीचे सारे सुखावह स्नेहप्रसंग आठवण्याची विनंति करीत आहे. कस्तुरी, तुला जरी ते प्रसंग एकूण एक आठवत असतील तरी, त्यापैकीं एक दोन तरी महात्माजींना सांगूं दे. त्यांचं आजच्या शाळेंत कमालीचं

"महात्माजी ! इचा शब्दन् शब्द खरा आहे आणि यात मी हार खातों. माझीसुद्धा अशी खात्री आहे कीं, आम्ही हिंदी तरुणानीं जर वेदकालीन कुमाराप्रमाणें आचरण ठेवलं तर, एकही घरन्दाज तरुणी आमच्याकडे, कोळी माशाकडे पहातात तसं पहाण्यास धजणार नाहीं. मात्र माझा अनुभव असा आहे कीं, आम्हींच त्याना सलगी करण्याला जागा देतों खरें. पण मी दोनचार प्रसंगापासून सावध होऊन शिक्षण पुरें होताच सुरतेला परतलों—

"एकादा प्रसंग थोडक्यात सागना का ? आपण सागणार होताच; विसरलात !" गाधी म्हणाले.

"माझी आज थोडीशी बावरल्यासारखी चित्तवृत्ती झाली आहे खरी. पण मी सागतों. एकदा लॉक्लोमंड्मध्यें असताना, माझ्या लॉजमधल्या एका फ्रेंच तरुणीचा टेरियर पाण्यात पडून लॉचखालीं सापडली. बोटमेन तिच्याशीं पैशाकरता घासाघीस करूं लागले. मी चटकन् कपडे काढून उडी मारुन त्या कुत्र्याला सुखरूप आणिलं. त्यावरून आमची मैत्री होऊन, दोन दिवसाच्या मुदतींतच तिनं माझ्यावर धाष्टं प्रसंग आणिला, आणि तिचं म्हणण इतकं धाष्टं होतं कीं, मला तिचा तिटकाराच आला, व मी महिन्याचे पैसे बुडूं देऊन दुसऱ्या हॉटेलात जाऊन राहिलों."

" प्रसंग काहीं विशेष फुशारकी मारण्यासारखा नाहीं. " गाधी म्हणाले, " त्या बाईचं म्हणणं रास्त असतं तर आपण कबूल केलं असतं, असंच ना ? "

" तसाही एक प्रसंग जर्मनींत आला होता. मी हॅम्बुर्ग येथें आजारी पडलों होतों. सीरियम टायफॉइड् होता त्यावेळीं एका अतिश्रीमन्त, फारच देखण्या व अत्यंत हुशार अशा एअरेसननें माझी जिवापाड शुश्रुषा करून मला वाचविलें. ती स्वतः ग्रॅज्युएट होती, होती या आहे सुद्धा. तिची व माझी मैत्री एका महिन्यात झाली. तिनं बायबल व गीता याच्या तुलनेसंबंधीं एक फारच विद्वत्ताप्रचुर असं पुस्तक लिहून पी. एच्. डी. ची पदवी मिळविली. मला ती आदल्याच वर्षी मिळाली होती. मी तिला तें पुस्तक लिहिताना मदत केली होती. तिनं पुढें माझ्याजवळ लग्नाची गोष्ट काढण्यासारखं वातावरण उत्पन्न केलं. कस्तुरी, सरंच दिनई ग ? मी तुला सागितलं होतं ना ? एकवार मला असं वाटलं होतं कीं,

आपण तिजजवळ गोष्ट काढावी. पण त्यावेळीं मात्र मला वचनबद्धतेची आठवण झाली; आणि मी ती गोष्ट ओघाओघानं तिला सांगितलीही."

"मग ती काय म्हणाली ?" महात्माजींनी विचारिलें.

"तिला थोडं तर वाटलंच, पण आश्चर्यही वाटलं. इतक्या लहान वयात मी वचनबद्ध होऊन वाग्दत्तवरही झालों कसा, याचं तिला राहून राहून आश्चर्य वाटत होतं. मी थापच मारतों की काय, अशी शंकाही तिला आली.परंतु मी कस्तुरीच्या परवानगीनं जेव्हां आमचीं पत्रंच तिला दाखवलीं, तेव्हां तिला तें खरं वाटलं ! आणि मग तिनं चांगल्या भावानं माझा नकार पत्करिला."

"शाबास ! हा प्रसंग मात्र खरा. आतां मला आणखी एक असा प्रसंग सांगा कीं, जो हिडिस स्वरुपाचा असेल. कस्तुरीबाई, तुम्ही इथं थोडा वेळ बसा अं. आम्ही तेवढा प्रकार बोलून येतों."

"तसं काहीं करायला नको. कारण माझ्या एकूण एक गोष्टी तिला माहीत आहेत. माझ्या चरित्रातली एकही गोष्ट, माझ्या पत्रातली एकही ओळ, माझ्या हृदयातली एकही भावना, की माझ्या मेंदूतला एकही विचार मी तिजपासून लपवून ठेवला नाहीं. म्हणूनच तिची आज इथ येण्याची मागणी मी अत्यानंदानं कबूल केली."

"भूपेंद्रनाथजी ! अशा या वृत्तीचा करावा तेवढा गौरव थोडाच होणार आहे. आपण एखादा वेश्याविषयक प्रसंग सांगाल काय ?"

"प्रत्यक्ष वेश्यागृहापासून मी मुक्त आहें. पण मी आपणास आता जो प्रसंग सांगणार आहे, त्यापेक्षा वेश्यागृहं चांगलीं असतील असं मला वाटतं आणि हा प्रसंग लंडन शहरांतल्या एका मिलियनेयरच्या घरातला असल्यामुळे मला त्या शहराची इतकी चीड आली आहे कीं, लंडनमध्यें प्रळयकाळ लवकरच झाला तर जग एका महत्संकटातून वाचेल अशी पूर्ण खात्री आहे. एकदां त्या अब्जाधीशानें सर्व डॉक्टरना खाना दिला. अर्थात् मीही तेथें होतों. त्या प्रसंगीं जॉर्ज बर्नार्ड शॉ याना मुद्दाम बोलावलं होतं, व तेही सोशॅलिझमूची मात्रा डॉक्टरना पाजण्याकरता आनंदानं आले होते. त्यावेळीं आमचा खूप खडाजंगी वाद झाला. त्यात मी एकटा शॉसाहेबाना पुरून उरलों, हें त्यानींही शेवटीं कबूल—

"म्हणजे मी असं धरून चालू की काय का, आपण सोशॅलिझमच्या विरुद्ध आहात?"

"बेलाशक! मी डेमॉक्रसीच्यासुद्धा विरुद्ध आहे"

"ठीक आहे. आता एकच विषयांतर. आपणास शॉसाहेब कसे वाटले?"

"तो एक अद्भुतपूर्व असा साधुपुरुष मला भासला. आमची नाशिकची गंगा जगाची पापं धुवून टाकते असं म्हणतात; पण शॉसाहेब साऱ्या मानवाचा पापं खचीत धुवून टाकतात. लोक त्याना सैतान म्हणतात. मी त्याना साधु समजतों. मात्र ते हिंदुस्थानात जन्म घेते तर ऋषि झाले असते. तरीसुद्धा आज ते मानवात दुसऱ्या नंबरचे खचीत आहेत. पहिला नंबर मात्र तुम्हाला द्यावा किंवा लोकमान्याना द्यावा हे मी आपल्या पश्चात् ठरवीन."

" मी माझं मत देऊं?"

" खरंच द्या," मृगेंद्राला कमालीचा औत्सुक्यानंद वाटला.

"शंकराचार्यांनंतर लोकमान्य टिळकच सर्वांत मोठे होऊन गेले आहेत. त्याच्यानंतर त्याच्या तोडीचा पुरुष होण्याला अजून तीनचारशे वर्षे पाहिजेत."

मृगेंद्राचे डोळे आनंदाश्रूंनी डबडबले! नव्हे लवकरच तो अत्यानंदानें रडूं लागला!! महात्माजींनीही त्याला गहिंवरून पोटाशी धरिलें!!!

§ २ " माझं शॉसाहेबांशी भाषण होऊन मी जें तेज पाडलं त्यामुळं खुष होऊन, आमच्या त्या दिवसांच्या यजमानीण बाईनीं मोठ्या आदरानं मला घरीं ठेऊन घेतलं व त्याच रात्रीं ती एकदम माझ्या अंथरुणात येऊन निजली. माझी बावरलेली चित्तवृत्ती पाहून ती हंसू लागली; व तिनं आधुनिक युगातची स्त्रीस्वातंत्र्याची लेक्चरं झोडीत तिनं नाना देशांच्या नानातऱ्हा सांगितल्या. त्यात " बर्थ कन्ट्रोल " सुद्धां आणायला ती विसरली नाहीं असं विद्वत्ताप्रचुर भाषण करणारी बाई कामांध म्हणी असूं शकेल पण ती कामांधतेपेक्षां फारच जास्त विकारी रोगानं पछाडली होती. तिला रोग झाला नव्हता तसं तिच्यासारखं शुद्ध लावण्य जगात दहाजणींच्या वाट्याला आलं असेल. तिला रोग जडला होता. तो कामलंपटतेचा. तिचा काम मेला होता असा याचा अर्थ नाहीं तिला कामाचा प्रकार पाहुण्याचा वाटे. तिला पाहुणा असा क्वचित आवडे. पण तो आवडे त्याच्या कामाचं पराभव देणं

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

ही ती संस्कृतीचं मूलतत्त्व समजतें. माझी अक्कल त्या रात्रीं तरी चालली नाहीं. तथापि मी तिचं म्हणणं साफ नाकारलं. कारण विचारता, मी रोखठोक जबाब दिला कीं, कामवासनेंत कांहींतरी तेज असतं, परंतु या असल्या काम प्रकारात संस्कृतीचं पतनच होय. माझं कारण ऐकताच तिनं आपलं एक नोटबुक काढलं, व त्याच्यातून शौसाहेबाचं बरोबर तसंच तिला मिळालेलें उत्तर वाचून दाखवलं व ती रागानं म्हणाली, एकाच्या ऐवजीं दोन सैतान, अथवा सर्पाच्या दोन जिभाच तुम्ही आहात. यापुढें जो पुरुष सर्व पुरुषजात मारील व आपण एकटाच राहील तोच माझा पाहुणा होण्यास पात्र होईल. "

" सौख्याचा पुरुषच त्या प्रकृतीचा पुरुष होय ! " गांधीजी हंसून म्हणाले.

" बरं; आता आपले प्रसंग पुष्कळ झाले. आता आपणाला कस्तुरीला काय सांगायचं त सांगा . "

" कस्तूर! मी तुला तीं सारीं चित्रें एवढ्याचकरता आठवायला सांगतों कीं, मी आपल्या भावी सुखाशेवर माझं मन इतकं टांगून ठेवलं होतं कीं, त्या सुखा-शेचा एक अंशसुद्धा माझ्या हातीं येणार नाहीं, अशी स्थिति आली असतां, माझी काय दशा होईल, याचा मला विचारच सुचला नाहीं. आतां हें खरं कीं, भाईंच चतुरबाईंना लिहून ठेवलेलं पत्र तूं वाचलं, त्या वेळेपासून काल रात्रीं प्रत्यक्ष भाईंना पाहीपर्यंत मी स्वतः तुला, व नंतर महात्माजींनासुद्धा भाईंच्या शुश्रू-षेचीं वचनं देत आलों. परंतु मी अक्षरशः कबूल करतों कीं, ती भावना ताप-लेल्या तव्यावरील पोळीसारखी क्षणिक उष्णतेची होती. माझ्यापाशीं! शरीर, मन, हृदय व आत्मा याच्यात समान स्पर्धांचा स्त्रीस्नेही म्हणजे धर्मपत्नी नाहीं, या कटु अनुभवानं मी होरपळून गेलों. अशा स्थितींत, आज सायंकाळीं याच खालच्या वाळवंटात मला गुल्नार भेटली, व आमची भेट झाल्यापासून अवघ्या एका तासांत, जें गेल्या सात वर्षांत घडं शकलं नाहीं, तें घडून गेलं. कस्तूर! मी आता गुल्नारचा पति झालों आहें!"

" म्हणजे वचनबद्ध ना ?"

" थांबा ! मृगेंद्रनाथ ! बोलूं नका. मी सांगतों तुम्हाला कस्तूरबाई ! " गांधी शांतपणें व विलक्षण गंभीरतेनें म्हणाले. " कस्तूरबाई ! यांचा गुल्नारशीं होत

असलेला खेद मला सचीत थाववता आला असता. पण ज्या अर्थी मी तो थाव-विला नाहीं त्या अर्थी, तें पाप असल्यास, माझ्या डोक्यावरच मी तें घेत आहे माझी खात्री आहे कीं, कस्तुरबाई त्या जर्मनबाईपेक्षाही जास्त शहाण्या व अधिक समजूतदार आहेत. आपण मानवानीं कितीहि प्रयत्न केले तरी लग्नही दैविक सोडतच खरी. सोडचिठ्ठ्या देऊन पाश्चात्य ती सोडत पुन पुन्हा खेळतात. पण तें व्यर्थ आहे. पण आपणाला त्याच्याशीं तूर्त कांहीं करायचं नाहीं. मला आपणाला एवढंच विचारावयाच आहे कीं, लग्नापेक्षाही जी उच्चकोटी आजन्मकौमार्याची तीं आपणापुढें परमेश्वरानं उभी केली आहे, ती आपण स्वीकारणार ? कीं सामान्य स्त्रीप्रमाणं त्याच्या बाबतींत हट्टानं, मत्सराचे खेळ खेळून पिताजींना विसरून रोगग्रस्ततेंतच मरूं देणार ?"

"पण यानीं सुद्धा माझ्यासारखंच ब्रह्मचर्याचं व्रत स्वीकारले आहे ना ?"

"त्यात हें नापास झालें. आपणालाही नापास व्हावयाचं आहे का ? पति कीं पिता ? हा आपणापुढें प्रश्न आहे."

"धाम आणि पिता अशीं दोन्हींही मला मिळूं शकतील. माझी पात्रताही तितकी आहे."

"पात्रता पतिव्रतापेक्षाही मोठी आहे. पितृनिष्ठ आब्रह्मचारी कुमारी कस्तुरीबाई देसाई, असं त्रैलोक्यात नाव गाजवण्याची आपली योग्यता आहे."

"पण भावी श्वशुरनिष्ट—

"क्षमा करा ! पुरुषाला तो वृथा मान देऊं नका. पुरुषापेक्षा स्त्री कितीतरी-पटींनीं श्रेष्ठ असते. मृगेंद्राना भलताच मोठा मान देऊन तुम्ही त्याना पशुकोटी-तही पेंवाल. ते आताच घमरले आहेत. पण अजून सावरून घेता घेईल. नाहीं पेक्षां त्या कामशन्य लंडनर्यांचा शापच खरा होऊन मृगेंद्र या जगावरचा खरा सैतान होईल."

"घसरलें तें कसें ? तें मला सांगा."

"*अजाण पोरी !*" झाडोंतून एकामागें एक फटाफट तीन काळे आकार तेथें आले. सांगेही सर्वांत उंच आकृतीनें आपला काळा झगा फेंकून देऊन म्हटलं" "अजाण पोरी ! मृगेंद्र कसा घसरला हें तुला हा सज्जन म्हणून सांगणार नाहीं"

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

काय हो गाधी !" त्या धिप्पाड सोल्जरनें खड्या आवाजात विचारिलें. " आपण मला ओळखताना ? "

" कसा ओळखणार नाहीं ? पण आपणास झाडींत लपून बसल्यामुळं—

" हॅं शांतपणं भाषण करण्याचं नाटक मजपुढं चालायचं नाहीं. या जनरल मोघेला सरळमरळ सवाल करण्याची व त्याचीं सरळमरळ उत्तरं ऐकण्याची संवय आहे. मणिले ! काढ तो बुरखा व ये अशी इथं ! ( तिनें म्ह. दुसऱ्या आकृतीनें तसें करताव ) गाधी ! ही माझी मुरगी अशी एकच. इच्या आईच्या पश्चात् हिला तळहाताच्या फोडाप्रमाणं वागविली. नंदिदुर्ग पहाण्यास ही चाकरमाणमासह गेली असता या नंदीनं, मृगेंद्रानं, हिला मोहवून हिच्याशीं शरीरसंबंध केला आहे. हिची आपण स्थिति पहातच आहात. ती ही गोष्ट, मला कळनाच या रावबहादुराच्याकडे-मृगेंद्राच्या वडिलाकडे जाऊन ( तिसरी व्यक्ति काळा डगला काढिते ) तक्रार केली. त्यानीं माझ्याशीं सोयरीक करून झालेली चूक अंशात सावरण्याचं कबूल केलं आहे व मुलीच्या प्रेमाकडं, पोरकेपणाकडं, व स्थितीकडं पाहून नाइलाजानं मी त्या तडजोडीला कबूल झालों आहें, नरोत्तमभाईचं वृत्त आम्हाला आज सकाळींच कळलं, व आम्ही घावरून तावडतोब मृगेंद्राला नेण्याकरता आपल्या आश्रमात गेलों होतों. आपण गावीं गेल्याचं कळलं म्हणून, व सरकारी अधिकाऱ्यावर बहिष्कार आपण टाकल्यामुळं, आम्ही त्या नजीकच्या खेड्यात रूपातर करून राहणार होतों, पण रस्त्यान आपण तिघेही दिसलात, नंतरचं आपलं संभाषण आमच्या तिघाच्याही जिव्हाळ्याचं असल्या कारणानं आम्ही तें अडून ऐकलं. शेवटीं कडेलोट झाला. मृगेंद्राचं पाऊल घसरलं असं कळ्ताच माझी आग मस्तकीं चढली आहे. खरा प्रकार मला कळलाच पाहिजे. "

" हो ! कळला पाहिजे खरा. " रावबहादूर प्रसंगी किती बावळे होते हें त्याच्या वर्तनाहून स्पष्ट दिसत होतें.

" अहो ! जनरल मोघे ! " कस्तुरी नागिणी सारखी संतप्त होऊन बोलूं लागली " ही तुमची, एक तर मुलगीच नसली पाहिजे, अथवा तिनं लाज तरी कोळून पोटीं जिरविली असली पाहिजे, मृगेंद्र व मी गेल्या साडेतीनवर्षापासून एकमेकाना सोडून नाहींत, समजलात. तोंड आवरून बोलत चला. ही जनरलशिपची घमेंड आम्हा आर्यललनापुढें चालायची नाहीं. "

" माणिले ! ही कस्तुरी काय म्हणते ? "

"नाहीं हो बाबा ! ही खोटं सांगते" माणिला म्हणाली. पण तिचा आवाजच सांगत होता कीं, ती स्वत च साफ खोटें बोलत होती. त्या तापट जनरलच्या तें चटकन् लक्षात आलें. त्यानें तिला दरडावून खरें तेंच सांगण्यास बजाविलें. तिनें मग खरें तेंच सांगितलें कीं, चावरापासूनच तिचा तो गर्भ होता. क्षणात जनरल्ची तरवार म्यान्यात चमकली, पण गांधींनीं तो हात वरच्यावर धरून म्हटलें,

" क्षमा करा ! क्षमा करा !! क्षमा वीरस्य भूषणम् ! "

" कोण ? गांधी ! " जनरलचे डोळे फिरायला लागले ! तो ओरडून म्हणाला, ( पण त्याचक्षणीं हार्ट फेल होऊन पडला व मेला. )

" गांधी महात्मा खरा ! पण सैतान...कीं...साधु ? "

पुस्तक पांचवें

# महात्मा !

भाग ५ वा

लग्नमंडपांतून मृत्यूच्या दरबारांत !

" Nothing is more real than the mighty shocks which two souls give each other by exchanging sparks of love and lust. " Les Miserables.

Victor Hugo.

## लग्नमंडपांतून मृत्यूच्या दरबारांत !

§ १ जनरल मोघे याच्या या अशा अकल्पित मृत्यूमुळें महात्माजींच्या त्या खासगी सभेची तारावळ तर उडालीच; परंतु सरदार वल्लभभाईंच्या बार्डोलीच्या सत्याग्रहावर देखील त्याचा अकल्पित परिणाम होणार, असा रंग दिसूं लागला. कारण आश्रमाच्या हद्दींतच मोघे याचा मृत्यू झाला होता; त्यामुळे आता त्याला सरकारपक्षीयाकडून क्रमक्रमे रंग फासले जातील याचा वाहा नियमच नव्हता. वल्लभभाईंना ही गोष्ट समजली, तेव्हा, जनरल मोघे बाळवंटात मेले, एवढेंच समजलें होतें; त्यामुळें त्याची जीभ भीतीनें टाळूलाच लागली. तथापि, त्याना जेव्हा कळलें कीं महात्मा गांधी स्वतः तेथें हजर होते, तेव्हा त्यांच्या जीवात जीव आला. ते तडक आश्रमात आले. त्यावेळीं पहाटचा कोंबडा नुकताच आरवू लागला होता. महात्माजी स्वतःच्या पर्णकुटीत चटईवर बसून नरसी मेहत्याचें पद म्हणून भजन करीत होते. याच्या उजव्या हाताकडे जवळच जनरल मोघे यांचें प्रेत होतें. त्याची मणिला गुल्नारकडे राहिली; कारण कस्तुरीकडे पाहण्यासही ती राजी होईना. तिनें बाळवंटातच आकांत करून कस्तुरीच्या नावानें बोटें मोडण्यास आरंभ केला होता; एवढेंच नव्हे, तर आपल्या शोफरला पाठवून जवळच्याच तारऑफिसातून, मुंबईस असणाऱ्या आपल्या थोरल्या भावाला बोलावून घेतले होते. तो तेथें आपल्या वडिलाप्रमाणेंच लष्करात होता. बॉम्बे टेरिटोरिअल्सचा तो एक कॅप्टन होता. अर्थात् ही गोष्ट महात्माजींना समजली होती. त्यांनीं सुरतेच्या सर्जन कॅप्टन माणिक लालजींना मोटार पाठवून बोलावलें होतें. व सरकारी नोकरी सोडून सत्याग्रहात सामील झालेले डॉक्टर संजाना एम्. बी. बी. एस्. याच्या हवालीं मोघे यांचें प्रेत केलें होतें. परंतु त्याना स्वतःकडून अगर कोणाकडून नही अगाऊ माहिती मिळूं दिली नाहीं. सकाळीं एकदां पंचनामा झाला कीं, ते पुढील उद्योगाला लागणार होते. तेथवर्यंचा आपला कार्यक्रम सरदारांना सांगून आश्रमात शांततेची विशेष काळजी घेण्यालाही त्यांनीं वल्लभभाईंना पाठविलें. त्यातल्यात्यात महाराष्ट्रीय सत्याग्रहींना जरा अशी इशारत देण्यास महात्माजी विसरलें नाहीत.

§ २ भजन आटोपल्यावर महात्माजींनीं आपला चरखा पर्णकुटीच्या बाहेर आणवून, सूत काढण्यास आरंभ केला. परंतु आतां त्यांच्या मनात एका विशिष्ट विचारानें काहूर उडवून दिलें होतें. त्यांच्या मनातून, मोघे यांच्या प्रेताला अग्निसंस्कार

मिळण्यापूर्वीच गुल्नारजादी आणि मृगेंद्रनाथ यांचा विवाह लावून द्यावयाचा होता. परंतु तें कार्य विलक्षण गुंतागुंतीचें तर होतेंच, पण यानंतर दर मिनिटाला तो ब्रह्मघोंटाळा वाढणारही होता. आहे तीच जानव्याची गुंतागुंत सोडवताना जास्तच आव्या बसतात तर लमासारख्या या अशा प्रकारात भविष्यकाळातून आणखी किती व कशा प्रकारच्या गाठी उत्पन्न होऊन, मूळची ब्रह्मगाठ सापडेनाशी होईल याचा पत्ताच नव्हता. 'मी सूत कातण्यात प्राविण्य मिळविलें, बसलोंच तर एक उत्कृष्ट बासरी विणीन, परंतु सामाजिक व धार्मिक धागेदोरे राजकारणाच्या ताणात विणणं किती कठीण काम आहे याची आज पुरेपुर खात्री पटते. महाराष्ट्रात आगरकर व टिळक, अगोदर सामाजिक सुधारणा कीं राष्ट्रीय स्वातंत्र्य, यावर कडकडून भाडले. त्याबद्दल लोक त्याना नावं ठेवतात, परंतु तो प्रश्न किती गहन व नाजूक आहे हें लोकांना कसं कळणार ? जो तो पक्ष आपल्यापुरतं पाहतो, पण आपलेपणाला राष्ट्रात विणून घेणाऱ्याला तो प्रश्न ठायीं अडवतो. लोकमान्यानीं अशा प्रसंगीं काय केलं असतं ?' असें महात्माजींचें विचारचक्र चाललें होतें. परंतु त्यानीं तें विचारचक्र चटकन् थांबविलें, आणि उमरखानसाहेबांना पटकन् आणण्यास स्वयंसेवकास पाठविलें तो गेला. नंतर महात्माजी स्वयंसेवक पथकाचे जनरल अंबादास मेथा याना म्हणाले,—

"अम्बादासजी ! काल रात्रीं मोंघ्याची मोटार प्रत्यक्ष आश्रमात येऊन गेली, तरी आम्हाला त्याचा पत्ता नाहीं. आम्हाला ती गोष्ट अगोदर कळती तर हा प्रसंग येता ना, खरं ना ?"

"खरं आहे" अंबादास अधोवदन करून म्हणाले "मी चौकशी केली त्यात मला असं कळलं कीं, मोंघे ताबडतोब परतले ते आश्रमाच्या हद्दीबाहेर जाण्याचे करताच, अशी खात्री वाटल्यावरून आपणाकडे बातमी पोंचविण्यांत आली नाहीं."

"ही खात्री त्या स्वयंसेवकानं कशी करून घेतली ?"

"त्याच्यासमोरच मोंघे तसं म्हणाले"

"म्हटल्याप्रमाणं मनुष्य, त्यातल्या त्यात सरकारी अधिकारी, करूं लागला, तरी किती सुधारेल; नाहीं ? शिवाय जनरल मोंघे व रा. ब. क्षेमकल्याणी अशा-

सारखे सरकारपक्षीय लोक आश्रमात रात्रीं अपरात्रीं येतात, तेव्हां प्रकरण सामान्य नाहीं, हें त्या स्वयंसेवकास कळावयास पाहिजे होतं. त्या स्वयंसेवकाचं नाव काय?"

"मल्हाप्पा."

"मी जातिभेदानं बोलतों असं समजूं नका, परंतु "वार्ता" खात्यात विशेषतः महाराष्ट्रीयांची भरती करा. त्यांना रामदासस्वामींच्या वेळेपासून तें वळण फारच चांगलं मिळालं आहे. बंगाली लोकांनी अलीकडे त्यांत उत्कृष्ट प्राविण्य मिळविलं आहे, परंतु ते अलीकडच्या युगाचा शिक्का घेऊन बसले आहेत. धर्माकरता राजकारण हें रामदासाचं बाळकडू त्यांना मिळालेलं नाहीं"

"आणि आमचे गुजराथी?" अंबादासानें हिय्या करून विचारिलें.

पण त्याचवेळीं उमरसाहेबांना घेऊन स्वयंसेवक आला. त्यांना जवळ बसवून घेऊन गांधींनी सर्व स्वयंसेवकांना वारासंवरा हात दूर रहाण्यास सांगितलें, व ते गेल्यावर ते उमरसाहेबांना म्हणाले,

"साहेब! माझं एक फार जरूरीचं काम आहे."

"हुकूम करावा, काम झालंच समजा"

हें उत्तर मिळण्याची खात्री असूनही तें मिळताच गांधी बुचकळ्यात पडले. तथापि रामदास व लोकमान्य यांच्या मूर्ति लक्षांत आणून त्यांनी निश्चयानें म्हटलें.

"आपल्या गुल्नारचं आतांच्या आतं लग्न करायचं."

"ठीक आहे. माझी कुठंच हरकत नाही."

महात्माजींनी स्वयंसेवकांना बोलाविलें. एकाला मृणालकडे, दुसऱ्याला गुल्नार व हजारासिंग यांच्याकडे व तिसऱ्याला ज्योतिर्विद उपाध्याय यांच्याकडे, चवथ्याला धर्मानिधारि शास्त्र्यांना आणण्याकरता, अशी सर्वांची पाठवण रवानगी केली. बाकीच्यांना फिरून दूर उभे रहाण्यास सांगून ते उमरसाहेबांस म्हणाले,

"उमरसाहेब! आपली गुल्नार मृणालला द्यावी."

"ठीक आहे!"

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

नंतर चरका शांतपणें चालूं लागला. उपासमयाची समाप्ति होऊन रविबिंबाची कड लवकरच दिसूं लागणार होती. आश्रमातले चरके घरोघर मैलोगणती सूत कातीत होते. त्यावरची बाल्याल्लिंची वर्णमधुर गीतें ऐकून, मोघ्यान्या उडून गेलेल्या, पण आसमंतात वावरणाऱ्या जीवात्म्यालाही खचित आनंद होत असला पाहिजे. तो एक शिपायी बाप्याचा जीवात्मा होता. पिंजऱ्यात कोंडून ठेवलेला वाघ सर्कसच्या वेळीं जसा, अंगवळणी पडलेल्या भयानें रिंगणात काम करतो, त्याप्रमाणें सरकारी नोकरींतल्या रिंगणात त्या नरशार्दूलानें नरहिंसेचीं कामें जिवंतपणीं केलीं असताल, परंतु नरदेहाच्या पिंजऱ्यातून तो जीवात्मा सुटताच मोकळ्या चंडोलाप्रमाणें गगनात फिरून प्रभुगीतच गात असला पाहिजे. सर्व जन्मभर ज्या मृदु भावना मारल्या गेल्या होत्या, त्या एकदम मोकळ्या होऊन सजीव होताच, त्यांनी तोफा, बंदुका, तरवारी, पिस्तुलें, काडतुसें वगैरे अस्त्रांच्या खणखणाटाकडे पाठ फिरवून, चरका, आनंदगीतें, भजनें, पक्षिगीतें, वगैरे शांत मंत्रात निमज्जन केल्यास, प्रतिक्रियेच्या तत्त्वानुसार, तो सृष्टिक्रमानंदच आहे, असो.

सर्वांच्या अगोदर मृगेंद्र आला. वस्तुरी निजली नव्हती; पण तिला सडकून ताप भरला होता हें त्याला माहीत होतें. आपणास गांधींनी एकदम बोलाविलें, त्या अर्थी मोघेप्रकरणाचाच विचार होत असला पाहिजे असें त्याला वाटलें. तसें त्यानें वस्तुरीला बोलून दाखवून तिलाही बरोबर जाण्यास पाचारिलें होतें, परंतु वडिलांना सोडण्यास ती तयार झाली नाहीं. भाईंची सर्व रात्रभर सारखी तगमग चालली होती; व त्यांना आता कुठं ताव डोळा लागला होता. मृगेंद्रानेंही तिला आग्रह केला नाहीं. आपल्या वडिलांना उठवून बरोबर घ्यावें, अशी त्याला एकदा इच्छा झाली; परंतु एकटेंच यावें अशी महात्माजींची आज्ञा होती. तरी सुद्धा वस्तुरीचा अपवाद करण्याचें तो धाडस करणार होता. वस्तुरीला कळवल्याशिवाय एकही गोष्ट करायची नाहीं, अशी त्याला संवयच लागली होती; व त्यामुळें आजपर्यंत त्याचें कधींही नुकसान झालें नव्हतें; असो. तो एकटाच गांधींच्या पर्णकुटींत गेला. त्याला त्यांनी

९. चटईवर डाव्या बाजूस बसवून प्रेमानें कुरवाळिलें.

लवकरच गुल्नारजादी आपल्या आईसमवेत आली. चारपाच मिनिटात ज्योतिषी, उपाध्या वगैरेही आले. दर्भ, दुर्वा, समिधा, फुलें, काळी माती वगैरे साहित्यही आणलें. दहा मिनिटांत दुसऱ्या पर्णकुटींत बोहलेंही तयार झालें. ती सगळी तयारी मृगेंद्र उघड्या डोळ्यांनीं पहात होता; पण त्यानें, परिस्थिति लक्षात आली असून एकही शद्ब काढिला नाहीं. कदाचित् गुल्नारच्या दर्शनानें तो खूप झाला असेल, कदाचित् प्रवाहपतितानें असल्या आणीबाणीच्या वेळीं मुळींच धडपड न करता, स्वस्थ बसावें व होईल तें होऊं द्यावें; तरच तरण्याची आशा, अशी त्याची मनोरचना झाली असेल. कसेंही असो. तो स्तब्ध होता खरा. गुल्नारला मात्र स्वर्गीय आनंद होत होता तिच्या चेहऱ्यावर प्रेमरागाची अशी सुंदर छटा पसरली होती, कीं तिचाच विस्तार पूर्वेकडे आकाशात त्यावेळीं झालेला असावा, अशी कल्पना एखाद्या कवीला खास सुचावयाची हजारविचारांची मात्र, का कोणास माहीत, पण विलक्षण चुळबुळ चालली होती. महारमार्जीच्या कल्पनाशीं लागण्या-करता तिची एकसारखी धडपड चालली होती, पण महारमार्जींना तिच्याकडे लक्ष देण्याला क्षणाचीही पुरसत नव्हती. ते ज्योतिषाशीं बोलत होते,

" समजलं. एखादा ग्रह अनिवार वाकडा असला म्हणून काय झालं ? रवि, शुक्र, चंद्र, व गुरु चागले आहेत ना ? मंगळाची वक्रदृष्टि असली तरी वधूवराच्या प्राणाना धोका नाहीं ना ? "

" प्राणाना खचित नाहीं, पण अब्रूला खचित आहे, तथापि हा आताचा शेवटलाच मुहूर्त आहे आता सूर्योदयात् सातव्या घटीनंतर मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी-पर्यंत मुहूर्त नाहीं "

" अब्रूला म्हणजे ? त्यांच्या शीलाला काहीं बट्टा लागेल काय ? विशेष फोड करून सागा. " गार्गीनीं घाबरून विचारिलें

" शीलातला आनुवंशिक संस्काराचा जेवढा भाग येतो त्यात या जोडप्याचें पटणार नाहीं. एकंदरीनें बोलायचं म्हणजे पटायचें नाहीं खरं. तथापि परस्परा-विषयीं त्याच्या हृदयात प्रेम बरंच राहील हें खचीत. पाप असं कोणीही करणार नाहीं. " ज्योतिषानें सागितलें.

## महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

" ठीक आहे. उडवा बार ! "

" वधूवराना समोरासमोर उभें करण्यात आलें. त्यात वस्त्रपाट धरण्याकरता महात्माजी स्वतः उठले, व त्यानीं शुभ्र दाढी धरून म्हटलें कीं, " मी गुल्नारला आज या शुभ मुहूर्तावर हिंदु करून घेत आहे. गुरु महाराज, आपली दोघाची मान्यता आहे ना? "

उपाध्या व ज्योतिषी यानीं विचारलें कीं, " वधूच्या आईबापाची संमती असल्यास आमचीही मान्यता आहे. "

लगेच उमरखानसाहेब उठून व दोन्ही हात वर करून म्हणाले. " माझी संमति आहे एवढेंच नाहीं, तर मी गुल्नारला यापूर्वीच महात्माजींच्या ओटींत टाकलें आहे, तेव्हा तिचे वडील तेच आहेत. त्यानींच तिचें कन्यादान करावें. "

हजराबिबीही मग आनंदानें ओरडून म्हणाली, " आता मात्र माझ्या जीवात जीव आला. खानसाहेबाच्या प्रत्येक शब्दाला माझी मान्यता आहे. गुल्नार हिंदु होतीच; गुल्नार हिंदु आहेच; व गुल्नार हिंदु राहील्च. तिचें कन्यादान महात्माजींनींच करावें. "

त्या गडबडींत म्हातारीच्या उद्गाराची खोंच कोणाच्याही लक्षात आली नाहीं,

कन्यादानाचा अधिकार प्राप्त झाल्यामुळें महात्माजींनीं पट धरण्याचें काम [illegible] व एक ब्राह्मण स्वयंसेवक याच्याकडून करविलें. बरोबर सूर्योदयात् गत-[illegible] ७ या मुहूर्तावर मृगेंद्र व गुल्नारजादी याचें लग्न लागलें, त्यावेळीं जो शुभ [illegible] वाजली, त्याच्या नादानें कस्तुरी भानावर आली व मृगेंद्राचे वडील जागे झाले, पण चहापाणी व नंतर शौचमुखमार्जनादि प्रातर्विधि उरकून कामाला सुरुवात करण्याची त्याना जन्माची संवय लागल्यामुळें त्यानीं कसली गडबड आहे, म्हणून कस्तुरीला विचारिलें व कस्तुरी तेंच पाहण्याकरता बाहेर पडली. ती लग्नाच्या पर्णकुटींत येताच तिला, बोहल्यावर मृगेंद्र व गुल्नार दिसली. पण ती येताच महात्माजींनीं तिला हाताशीं धरून म्हटलें,

" ये ! देवी कस्तुरी ये ! तुझें आगमन अत्यंत शुभप्रसंगीं झालें आहे ! तूं या माझ्या नुकत्याच लग्न लागलेल्या गुलाबवेलीला ओवाळ व तिला आशीर्वाद दे."

" दे ! देवी कस्तुरी ! माझ्या या नूतन परिणीत पत्नीला पुण्य आशीर्वाद

दे !" मृगेंद्र उभा राहून व आपल्या पत्नीस पुढें उभी करून म्हणाला; "तुझ्या-सारख्या पुण्यवान् कुमारीच्या आशीर्वादानें अस्पृश्यसुद्धा पुनीत होतील !"

"अहाहा !" हजराबिवी ओरडून म्हणाली. "महात्माजी ! तुम्हाला जावई पण जावई मिळाला. लोकहो ! ही गुल्नार आमची मुलगी नव्हतीच व आताही नाहीं. ही दुष्काळात आमच्या खानदेशांतील निबडुंगात आम्हाला सापडली; व आम्ही इचं स्वतःच्या पोटच्या पोराप्रमाणें पोषण केलं. देवी कस्तुरी ! ये ! तुझे शुभ आशीर्वाद अशा अनाथ अर्भकाला, आता सनाथ झाल्यावर अवश्य दे !"

कस्तुरीच्या वदनावर एकप्रकारचें दिव्य तेज झळकूं लागले. ती अत्यंत गंभीर वाणीनें, दोन्ही हात वर करून म्हणाली;

" अत्यंत पुण्यवान् गुलाबदेवी ? सौभाग्यवती झालीस तशीच पुत्रवतीही हो ! ज्याला हृदयातल्याही हृदयात प्रत्यक्ष नंदकिशोराप्रमाणें आजवर जपून ठेवलं, पुजून ठेवलं, असा हा माझा अत्यंत तेजस्वी कौस्तुभमणि, सौभाग्यदान म्हणून तुला अर्पण केला आहे ! याला स्वप्राणापलीकडे जप बरं ! मृगेंद्रा ? सख्या ? जीवीच्या जीवा ! हृदयेश्वरा ! भगवान् कृष्ण परमात्म्या ! या हीन, दीन, पंगू, अनाथ, अविवाहित, आधुनिक राधिकेला विसरूं नकोस अं ! मी चुरूल असेन ! मी वेडी असेन !—

मृगेंद्राकडून आता मात्र रहावेना ! त्यानें पटकन् कस्तुरीला प्रेमालिंगन दिलें ! महात्माजी ओरडून म्हणाले;

" पहा ! पहा ! जीवमात्रानो ! हें निष्कलंक, निर्व्याज, नितांत मधुर प्रेम पहा ! या प्रेमात जात नाहीं; या प्रेमात गोतही नाहीं. या प्रेमात एकच भक्तिप्रेम मात्र आहे."

लगेच त्याच्या वदनातून नरसी मेहत्याच पद सुरू झालें. सर्वांनीं तें खड्या सुरात म्हटलें.

एका तासात सप्तपदी वगैरे होमहवन झालें तेव्हा तेथें रावबहादुर आले; त्यांबरोबर सुरतेचे डी. एस्. पी. सर्जन वगैरे मंडळीही येऊन पोचेला. सनि पालटला. पण एकट्या महात्माजींचाच. त्यानीं वधूवरांना व कस्तुरीलाही मोध्याच्या पर्णकुटींत येऊं दिलें नाहीं.

अहाहा ! धन्य धन्य महात्माजी ! असें कोण उद्गारणार नाहीं ! लग्नमंडपांतून जो निःशंकपणानें मृत्यूच्या दरबारात संतोषानें चालत गेला त्याचे धन्यवाद अमुर-

## महात्मा गांधी–सैतान कीं साधु?

नृतांचे लोक मात्र गाणार नाहीत. पण स्वत महात्माजी कोणाला धन्यवाद देत होते? अर्थात् लोकमान्याना, रामदासाना व शिवाजी महाराजाना!

§ २ म्ताच्या पर्णकुटीत प्रथम दोन्ही डॉक्टर्स, डी. एस्. पी. आणि गांधी या चौघाशिवाय कोणालाही जाण्याचें कारण नव्हतें. परंतु डा. एस्. पीनें पर्णकुटीभोंवती पोलिसाचा गराडा देताच सत्याग्रहाचेंही कडें पोलिसाच्याभोंवतीं पडलें. तें काढून घेण्याची आज्ञा डी. एस्. पीनें गांधींना केली, तेव्हा गांधी म्हणाले;—

"पोलिसापेक्षाही जास्त शांतता सत्याग्रही ठेवतील, त्याची आप [illegible] काळजी नसावी. पोलिसाची बारडोलीत मुळींच जरूर नाहीं."

"पण कायद्याप्रमाणें आम्हाला संशयास्पद जागेला [illegible] अधिकार आहे." डी. एस् पी. नें घोगऱ्या आवाजानें म्हटलें.

"मानवाच्या कायद्यापेक्षा परमेश्वराचे कायदे अधिक [illegible] कोठें ठेवावा हें शिक्षण आमच्या हिंदुस्थानच्या पोलिसाना नीटसं मिळालं नाहीं; इथल्या पोलिसाचे सरकारी संस्कार सडलेले आहेत; सबब आम्ही आमचीच व्यवस्था करून घेत असतों. आपण आपल्या कामाला शांतपणें सुरुवात करावी."

"मि. गांधी! तुम्ही राष्ट्रात नसते दंगे माजवता बुवा!"

गांधींनीं डी. एस्. पी. कडे दुर्लक्ष केलें. त्यांनीं सर्जन कॅप्टन माणिकलालजी व डॉ. संजाना याना प्रेताची तपासणी करण्याची विनंति केली. कॅ माणिकलालजींनीं थोडीशी माहिती विचारिली, पण गांधीजींनीं प्रेताची स्वतंत्र चौकशी करण्याची अगोदर विनंति केली. त्यांनीं डा. संजाना यानासुद्धा अगोदर कांहीं करूं नये अशी व्यवस्था केली असल्याचे सरकारी डॉक्टराना सांगितलें व तें अक्षरशः खरें होतें; असो.

डॉक्टरानीं प्रेताची परीक्षा केली हार्टफेल्युअरची केस, अत्यंत साधी होती; परंतु हार्टफेल्युअरची अगोदर, ॲक्यूट टाइप् ऑफ् पॅरॅलिसिस झाला असावा असे डॉ. संजानाचें म्हणणें होतें, व मोघे याना हार्टडिसीज असावा असें डॉ. माणिकलालजींचें म्हणणें होतें, पण मग ते लष्करी खात्याला नालायक होते अशी डॉ. संजाना यानीं हरकत घेतली. त्यावें स्पष्टीकरण डॉ. माणिकलालजींनीं असें केलें कीं, हा रोग मोघ्याना अलीकडे सहामात महिन्यापूर्वी लागला असावा.

" मग आपलं असं म्हणणं आहे काय, कीं हा प्रसंग यांच्यावर आला नसता तरी त्यांना अवश्य जागेचा राजीनामा द्यावा लागला असता ? " डॉ० संजाना यांनीं विचारिलें.

" मग वाटतं कीं, आता आपण हजर असलेल्याची चौकशी करावी ! डॉक्टर संजाना यांनीं सुचविलें. " महात्माजी ! आपणांस कांहीं यासंबंधीं माहिती आहे काय ? "

" हो, आहे. यांच्या मृत्युसमयीं मी स्वत: हजर होतों. " असें म्हणून गांधींनीं सर्व हकीकत थोडक्यांत सांगितली. नंतर डॉक्टरांनीं रावबहादुर क्षेमकल्याणी यांना बोलावणें धाडलें. इतक्यांत एका पोलिसानें सत्यप्रताच्या पाहाऱ्यांत येऊन सांगितलें कीं, मुंबईहून मदनाचे चिरंजीव आले आहेत, व त्यांची आपणास भेटण्याची इच्छा आहे. डॉ. एम्. पी उठून जाऊं लागले, पण डॉ. संजानांनीं हरकत घेतली कीं, " त्यांनाहि अन्वास बोलावं लागेल कदाचित् म्हणून आपण सरकारी अधिकारी म्हणून त्यांना अगोदर भेटतां येणार नाहीं. "

## महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

" पण मि. संजाना ! " सर्जन म्हणाले, रावबहादुराच्या चिरंजिवांना बोलावून आपणास काय कळणार आहे ? ते मुंबईहून आताच आले आहेतना ? ते काल हजर नव्हते.

" खरं, पण त्याची बहिण काल हजर होती ना. तिच्या मनावर डी. एस् पींच्या भेटीनं विपरीत परिणाम होण्याचा संभव आहे. "

" डी. एस्. पी तिला पाहिजे तर भेटणार नाहींत. "

" हें शक्य नाहीं. कारण हल्लीं बहिण आपल्या भावाजवळच असेल. पण घटकाभर नाहीं भेटलं तर काय बिघडणार आहे ? "

" ऑल् राइट् ! ( डी. एस्. पीला ) प्लीज डोंट गो ! "

डी. एस्. पी, बसले; व पोलिस कॉन्स्टेबल आला तसाच स्वयंसेवकाच्या पाहाऱ्यांत परत गेला. तें पाहून डी. एस्. पी. चिडून गांधींना म्हणाला, " हें आपण काय बंड चालवलं आहे ? पोलिसावर पहारा ! " गांधींनीं हंसून म्हटलें, " जणों इंडियन पोलिस हायक्लास कल्चर्डमधलेच आहेत ! आपलं शिक्षण कितपत झालं आहे ? "

" हा माझा अपमान आहे. "

" ज्याला आपल्या शिक्षणाचा उच्चार करण्यासुद्धां लाज वाटते, त्याला, अधिकाराच्या जोरावर, दुसऱ्याची अब्रु घेण्याला कांहीं तरी शरम वाटेल काय ? म्हणूनच आमची अब्रू आम्हीच संभाळतों. "

रा. ब. क्षेमकल्याणीही त्याचवेळीं आले. त्यांनीं प्रथम डी. एस्. पीला व नंतर सिव्हिल सर्जनला " गुड् मॉर्निंग् " केला. डी. एस्. पींनीं त्याच्याशीं शेक्हॅन्ड् करून म्हटलें,

" रावबहादुर, आपल्या मुलावर भलताच प्रसंग आला असें पाहून मला फार वाईट वाटत आहे. पण—

" मिस्टर पिग्हेड ! " डॉ. माणिकलालजींनी त्याला चापून म्हटलें

" तुम्ही साक्षीदारावर कोणताही अनुकूल वा प्रतिकूल परिणाम होईल असं बोलं नका. "

" महात्माजी उठून आपल्या पर्णकुटींत गेले. त्याचा भोंवतीं स्वयंसेवकांचें कडें होतेंच. डी॰ एस्॰ पी॰ पाहात नाहीं, असें पाहून प्रत्येक कॉन्स्टेबलनें

त्यांना हात जोडून नमस्कार केला. तो त्यांनीही हंसतमुखानें स्वीकारली. इन्‌ड डी० एस्० पी० गुरगुरला;

" डॉक्टर ! हें न्यायमंदीर नव्हे; व आपणही न्यायाधीश नव्हत. "

" हो ! तूर्त हें न्यायमंदीरच आहे; व आम्ही दोघे न्यायाधीशच आहोत." आपण तूर्त आमचेच नोकर आहात. भलभलत्या चुक्या केल्यात तर मी आपणाविरुद्ध रिपोर्ट केल्याखेरीज राहणार नाहीं. वेल् ! रावबहादूर, क्षेमकल्याणी ! आपण जनरल् मोघे याच्या मृत्यूच्या वेळीं हजर होता काय !

" होतों ! पण —"

" जास्त सांगू नका. विचारीन तेवढ्याच प्रश्नाचीं सरळ उत्तरं द्या. हे मेले त्यावेळीं यांच्याजवळ कोण कोण होते ? "

" मी, माझा मुलगा, व कस्तुरी "

" कस्तुरी कोण ? "

" नरोत्तमदासांची मुलगी. "

" ठीक. आणखी कोण ? "

" मणिला, म्हणजे जनरल मोघे यांची मुलगी, व मि गार्धी. "

" आपण इतक्या अपरात्रीं वाळवंटात कशाला गेला होता ? "

" आम्ही तिथे मागाहून गेलों होतों आमच्या अगोदर माझा मुलगा, गार्धी व कस्तुरी वाळवंटात होतीं "

" काय करीत होतीं ? "

" कस्तुरी व सुरेंद्र, म्हणजे माझा मुलगा यांचा वाङ्‌निश्चय सुद्धा झालेला होता. परंतु भार्येच्या रोगग्रस्ततेमुळे त्याचें लग्न मोडलें होतें, असं दिसतं, आणि दरम्यान एका मुसलमान मुलीशीं माझ्या मुलानं मोठा अमम्यागमचं वर्तन केलं होतं. '

## महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

" मोघ्याच्या मुलीशीं नंदिदुर्ग इथं माझ्या मुलाकडून कांहीं बदकर्म झालं—"

" आपला मुग्गा भलताच वाईट दिसतो ! " सर्जन उद्गारले.

" हा रक्ताचा दोष तर नसेल ना ? " डी. एस्. पीनें रावबहादुराना सण-सणीत टोला मारिला. पण रावबहादुराना त्याची लाज कोठें होती ? त्यांनीं डोळे मिचकावीत म्हटलें, " असेलही कदाचित् ! असो. जनरल मोघे याना ज्यावेळीं आपल्या मुलीची स्थिति समजली—"

" यू मीन् प्रेग्नंसी ! "

" यस्. तेव्हां त्यानीं मजकडे तक्रार केली. तथापि साठ हजार रुपये हुंडा देण्यास ते तयार झाले, म्हणून मी जाहीर करणार होतों कीं, त्याचं नंदिदुर्गाला लग्न झालं—

" क्रिमिनल ऑफेन्स् ! " डी. एस्. पी उद्गारला.

" नो ! नो ! यस् ! यस् ! मी काय म्हटलं घरं ? मी त्यांची मुलगी सून करून घेण्याचं कबूल केलं असंच ना ? तेंच खरं. मग आम्हाला कळलं कीं, माईना गांधीजींनि इथल्या आश्रमात ठेवलं आहे; व माझा मुलगाही इथंच आहे. तसें आम्ही माणिलेला बरोबर घेऊन—

" तिला कशाला बरोबर घेतलंत ? "

" म्हटलं तिच्याकडे पाहून माझ्या मुलग्याला तिची दया येईल. "

" पण मृगेंद्रानं तें कर्म केलं असं आपणांस वाटतं काय ? "

" किरकोळ गोष्ट आहे. साठ हजार रुपये घरीं चालून आले ते का सोडा, असाच मी विचार केला. "

" आपणाला कांहीं मुली आहेत ना ? "

" आहेत तर. पण मी त्यांचीं लवकर लग्नं करून टाकिलीं. "

" आणि त्यापैकीं दोन घरीं परत आल्या, " डी. एस्. पीनें चिमटा घेतला.

" वेल् ! पुढें काय झालं ? " सर्जन क्षेमकल्याणीच्या मदतीला आले.

" पुढें आम्ही इथं आश्रमात आलों. गांधी बाहेरगावीं गेल्याचं कळलं, व इथं तर सरकारी अधिकाऱ्यावर कडेकोट बहिष्कार होता. सबब, आम्ही वेष पालटून जवळच्या खेड्यात रात्रभर मुक्काम करून सकाळीं पुन्हा आश्रमात येणार होतों. पण आम्हाला तीं तिथें वाळवंटात दिसलीं तसं आम्हीं त्याचं संभाषण अडून ऐकलं.

त्यात, त्याच सायकाळी माझ्या मुलाचं नवीन सूत घडल्याचं आम्हाला कळलं. त्यामुळं मोघ्याना अनावर राग आला. तथापि त्यानीं प्रगट होऊन मृगेंद्राला सांगितलं कीं, त्यानं जर मणिलेला पत्नी म्हणून घरात घेतलं, तर आपण सर्व विसरून जाऊं. पण कस्तुरीनं ते सारं थोतांड असल्याचं सिद्ध केलं; व तसं मणिलेनं कबूलही करून, आपल्याच चाकराकडून आपला गर्भ असल्याचं सांगितलं. त्यामुळं मोघ्याच्या क्रोधाचा भडका उडाला, व त्यानीं मुलीवर तलवार उपसली. पण गाधींनीं त्याचा हात वरच्यावर धरून क्षमेची याचना केली ! गाधींनीं हा अगदीं गाढवपणा केला. कारण त्यामुळंच मोघ्याच्या रागाचं एकदम रीॲक्शन होऊन त्याच्या हृदयाची क्रिया एकदम थाबली. माझ्या मतें या मृत्यूबद्दल जर कोणी जबाबदार असेल तर खुनी माणूस गाधीच होय ! "

" राइट् यू आर ! परफेक्टली राइट् ! ! " डी. एस्. पी. ओरडला !

" मि. क्षेमकल्याणी ! "

" रावबहादुर प्लीज ! "

" वेल् ! रावबहादुर ! " सर्जन थोडा वेळ विचार करून म्हणाले. " मोघ्याना हार्टडिझीज होता का ? "

" होता ! "

" राइट् ! " डी. एस्. पीनें दुजोरा दिला !

" कॉन्स्टेबल ! " सर्जन ओरडून म्हणाले. कान्स्टेबल आला. त्याला ते म्हणाले, " डी. एस्. पीला घेऊन बाहेर सावलींत उभे करा. मिळाल्यास खुर्ची द्या. घरीं जावयाचं असल्यास जाऊं द्या पण या झोपडींत जर ते आले तर ध्यानात धरा "

डी. एस्. पी. चडफडून निघून गेला. नंतर सर्जन शांतपणें क्षेमकल्याणींना म्हणाले.

" मोघ्याना हार्टडिझीज आहे हें गाधींना माहीत होतं का ? "

रावबहादूर घोटाळले त्यानीं काहीं उत्तर दिलें नाहीं. मग सर्जननें त्याना दुसरा प्रश्न केला.

" त्यावेळीं गाधींनीं दुसर काय करायला पाहिजे होतं ? "

" त्यानीं मणिलेच्या पुढं आपण उभे राहून मोघ्याचा वार झेलून दूर करा-

ययाचा होता. म्हणजे मोघ्यांचा राग यमी होऊन ते दोन शब्द ऐकण्याच्या स्थितीत आले असते. पण बनिया माईला हर्त असगान कुठलं ?"

कदाचित् त्यांना मनुष्य म्हणून अपमान वाटून त्यांना गांधींबरोबर मणिलाही दुसऱ्याच मारानें मारूनही वाटलं असलं."

"नाही. सायकॉलॉजिकल पॉइंट् एकच असतो."

"तो पहिल्या की दुसऱ्या माराचा हें ठरवायचं कसं ?"

"राग अनावर झाला की रागाच्या पहिल्याच कृतीचा कळस, तो सायकॉलॉजिकल पॉइन्ट् समजावा."

"पण कळस तो पहिल्या माराचा की दुसऱ्या ?"

"हें हजर असणाऱ्यालाच ओळखतां येतं !"

"मग आपण कां नाहीं ओळखलं ? आपणही तिथें होता ? मला वाटतं की, ज्या अर्थी मोघ्यांच्या हार्टडिझीजचं ज्ञान आपणांला होतं व गांधींना नव्हतं, त्या अर्थी गांधींच्यापेक्षा आपणालाच सायकॉलॉजीचं जास्त ज्ञान आहे; ज्या अर्थी गांधी गाटर व आपण रावबहादुर म्हणजे शहाणेसुरते आहात; व ज्या अर्थी आपणास साठ हजार रुपये, मुलाला सहजासहजीं जन्म दिल्याची घरवसल्या किंमत मिळणार होती. आणि महात्माजींना विकत श्राद्ध घेतल्याचा उलटाच मोबदला मिळणार होता त्याअर्थी, मोघ्याच्या मृत्यूची, खुनाची म्हणण्याचं काम माझं नाहीं, पण मृत्यूची तरी जबाबदारी आपणावरच आहे"

"माय गॉड् !" रावबहादुर मटक्न् खालीं बसले !

"मि क्षेमकल्याणी ! असं घाबरूं नका ! आम्हाला आपल्या या साक्षीशीं तूर्त फारसं कर्तव्य नाहीं. जनरल मोघे हे कसे मेले, आपोआप मेले कीं त्यांना कोणी मारलं एवढंच आम्हाला ठरवायचं आहे."

"मग मी सांगतों कीं, ते आपोआपच मेले ! त्यांना कोणीही मारलं नाहीं." रावबहादुरांनीं बसल्या बसल्याच घाम निपटीत म्हटलें.

"ठीक आहे ! आतां असं सांगा—खरंच सांगा हं—कीं मोघ्यांनीं प्रवासात दारू घेतली होती का ?"

"हो ! व्हिस्कीची सबंध बाटली !"

" धायही ! " डॉ. संजाना यानीं विचारिलें; " मोघ्यांना फेफरं वगैरेची संवय होती का ? "

" मला माहीत नाहीं. "

" ठीक आहे. जा. "

रावबहादुर क्षेमकल्याणी गेल्यावर मणिला व नंतर मणिलेचा भाऊ यांची त्या दोघा डॉक्टरानीं साक्ष एकदमच घेतली.

त्या दोघांचाही वडिलांच्या मृत्यूमुळें रागानें भडका झाला होता; व ते वारंवार गांधी व मृगेंद्र आणि कस्तुरी यांच्यावर सूड उगवण्याच्या गोष्टी काढीत परंतु त्यांना पदोपदीं मुद्यावर आणून दोन्ही डॉक्टरांनीं एवढी जादा माहिती मिळविली कीं, " पत्नीच्या मृत्यूपासून जनरलसाहेब फार दारुपान करीत असत. रागाचे झटके त्यांना वारंवार येत, रागाच्या झटक्यात त्यांना मूर्च्छाही येत. त्यांनीं कैक वेळा अधिकाराचा अतिक्रम केला होता. स्वतःच्या चाकरानाही बुटानें लाथाडिलें होतें. त्यापैकीं एकानें त्यांच्यावर सूड उगवण्याचा निश्चय केला होता. तो देखणा होता. त्याच्यावर मणिलेचें थोडेंसें प्रेमही होतें; वगैरे. "

नंतर दोन्ही डॉक्टरांनीं प्रेताचें पोट फाडून स्प्लीन तपासून पाहिलें, त्याचप्रमाणें कवटी फोडून मेंदूही तपासून पाहिला, व आपला पोस्टमॉर्टेमचा निराल लिहून योग्य अधिकाऱ्याकडे पाठवून दिला. त्याचा इत्यर्थ इतकाच कीं, "जनरल मोघे हार्ट फेल होऊन मेले. हार्टफेल्युअरचें तावडतोब कारण म्हणजे मनःसंतापामुळें मेंदूची नस तुटून ॲक्यूट पॅरॉलिसिसचे स्ट्रोक्स बसले. शिवाय मयताला हार्टडीसीझ होताच. मयत सुखासुखींसुद्धा एका आठवड्यात मरता. चालूप्रकरणात जबाबदारी अशी कोणावरच दिसत नाहीं. मयताच्या व्यसनाचाच तो परिणाम होय. "

§ ३ जनरल मोघे यांच्या प्रेताला अग्निसंस्कार देण्याची रीतसर परवानगी मिळाली. पण आपण त्यांना मुंबईंत अग्निसंस्कार करणार, अशी त्यांच्या मुलांनीं विनंति केल्यावरून तशी परवानगीही देण्यात आली. म्हणून मणिला व तिचा भाऊ यांनी तें प्रेत घेऊन मुंबईचा रस्ता सुधारला.

§ ४ रावबहादुर क्षेमकल्याणी यांना आपल्या मुलाच्या विवाहाची यारिक-

सारिक हकीकत कळली, तेव्हां त्यांना फार राग आला. त्यांनीं भर मंडळींत महात्माजींचा "सैतान" म्हणून उपमर्द केला; व आपण आपल्या मुलाला एकही पै देखील देणार नाहीं; अशी भीषण प्रतिज्ञा केली. तेव्हा मृगेंद्र म्हणाला,

"दादा! आम्हाला आईकडून पैसे मिळतील ते मुद्दां सुरेंद्राला द्या. त्यातला माझा वाटा मी बाबूला मोठ्या खुषीनें देतों"

"दादासाहेब!" दुराणाईत भाई म्हणाले, "परमेश्वराच्या अवकृपेनें तुमचा मृगेंद्र माझा जांवई जरी झाला नाहीं तरी माझ्या इस्टेटीचा मुख्य मुनीम मी त्याला नेमलेंच आहें. त्याला दीड हजार रुपये दरमहा मिळणार आहेत."

"भाईसाहेब! मी आपला आभारी आहें." मृगेंद्र म्हणाला. "पण मला आजीवात वेगळाच मार्ग घ्यावयाचा आहे. तेव्हा मला आपली इस्टेट पाहता येत नाहीं."

"शाबास" गांधी म्हणाले. तेव्हां रावबहादुर ओरडून म्हणाले,

"गांधी! तुम्ही महात्मा खरे! पण सैतान कीं साधु?"

पुस्तक पहिलें

# महात्मा !

भाग ६ वा

## मृगेंद्राचें स्वतंत्र कार्य

"My aims and proposals go so much further, than any of my hostile critics are yet capable of conceiving, that I am only too thankful to be mistaken for a mere harmless Utopian, instead of being hanged without a benefit of clergy. When the spirit drives me to tell the truth, and the flesh reminds me of the police, and of the fate of those who have yielded to that temptation in the past, I screw my courage up, by reflecting on the extreme improbability of anybody seeing anything in my treatise but a paradoxical joke."

—*G. B. Shaw*

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

§ १ डॉक्टरांनीं, जनरल मोघे यांचें प्रेत, अग्निसंस्कारार्थ आश्रमातून हल-विण्याची परवानगी दिल्यानंतर, त्याच्या निकालाकडे पाहून "मोघे प्रकरण" पुढें चिघळूं शकलें नाहीं. तथापि महात्माजी मात्र बार्डोलीच्या आश्रमात, त्या-नंतर चार दिवस, तेवढ्याकरिता राहिले होते. मात्र अगोदर ठरल्याप्रमाणें, कस्तुरी व तिचे वडील यांना दुसऱ्या दिवशीं साबरमतीच्या गांधी-आश्रमात रवाना करण्यात आलें. तेथें पूर्वी सांगितल्याप्रमाणें भाईनीं स्वताकरिता एक पर्णकुटी, आश्रमापासून दोन मैलावर बांधली; आणि कस्तुरी जरी साबरमतीच्या गांधी-आश्रमातच एका स्वतंत्र पर्णकुटींत राहिली, तरी ती एकदोन दिवसाआड आपल्या पित्याकडे जाऊन येत असे. मृगेंद्र व गुलाबदेवी यांना मात्र गांधीजींनीं तूर्त बार्डोलींतच ठेवून घेतलें. मृगेंद्राचा स्वतंत्र कार्यक्रम कोणता, हें जाणण्याची त्यांची इच्छा होती. तथापि त्या नूतन विवाहित जोडप्याला त्यांनीं तीन दिवस मुळींच त्रास दिला नाहीं; व तें जोडपेंही मोठें सुखी दिसलें. चवथ्या दिवशीं सायंकाळीं मात्र गांधीजींकडून मृगेंद्राकडे एक कार आली व कांहीं विशेष कामाकरिता आप-णास तावडतोब भेटावें, आपण तुम्हाला फार वेळ ठेवून घेणार नाहीं, असा मृगेंद्राला, महात्माजींकडून निरोपहि आला. आपल्या प्रियपत्नीचें प्रेमानें चुंबन घेऊन मृगेंद्र गांधींकडे गेला.

मृगेंद्र येताच महात्माजींनीं त्याला प्रेमानें कुरवाळून आपल्या चटईवर बसवून घेतलें. चरक्याचा सुस्वर आवाज चालला होताच. ते मृगेंद्राला म्हणाले,

"आनंद आहे ना ?"

"आनंद आहे." मृगेंद्रानें म्हटलें, "मला कोणत्या कामाकरता बोलावलं ?

"काम तातडीचं नाहीं. आपणाला सवड असल्यास बोलूं."

"मला आता पूर्ण सवड आहे. वडलानीं मला पूर्ण मोकळं करून सोडलं आहे. आता माझ्या संसाराची तेवढीच काय ती काळजी."

"का बरं ?" गांधी शांतपणें म्हणाले. "वडिलानीं आपणास इस्टेटीचा वाटा दिला नाहीं म्हणूनच का आपलं पुत्रकर्तव्यही संपलं ?"

"महात्माजी ! मी मन मोकळं करून बोलूं का ?"

"नेहमींच मन मोकळं ठेवा; आताच तसं बोलून पुढं मनात कुढत बसूं नका."

" मनात कुढणारा मी नव्हेंच. परंतु मनात असेल तें सगळंच, स्थलकाल न पाहता एकदम ओकून टाकणंही, मला श्रेयस्कर वाटत नाहीं. मला मोर्ले साहेबाचं एक वाक्य अतिशय आवडलें. ते म्हणतात कीं, मनुष्याच्या हृदयात प्रथम वासनाच्या द्वारें विचार उत्पन्न होतात; आणि त्याची गति ताबडतोब सुरु होते. जो मनुष्य त्या गतीला एकदम तोंडातून मार्ग देतो, तो सामान्य समजावा; किंबहुना रानटी माणसाचा तोच दुर्गुण होय. पण त्या विचारगतीला जो, मनेच्या द्वारें चढवून मेंदूतून फिरवून नंतर योग्य दिमन्यास वाचेंतून मार्ग देतो, तोच शहाणा होय, किंबहुना सुसंस्कृत माणसाचं तेंच उत्तम लक्षण होय."

"अगदीं खरं आहे. पण या उपदेशाकरता मोर्लेसाहेबाकडेच धाव घेण्याचं कारण नाहीं. आपले हिंदी कवि व साधुसंत अनादिकालापासून तेंच सागत आले आहेत. समर्थ रामदास दासबोधात तर सावधानतेचीचं अनेक ठिकाणीं ग्वाही देतात. बरं तें असो; आपणाला काय ? सद्वचन कोण बोलतो हें किरकोळ आहे. सद्वचनाशीं आपण एकदम गाठ घेतली की झालं तेव्हा आपण आता मनमोकळेपणानं बोलणार याचा अर्थच असा कीं, आपण शहाणपणाचंच बोलणार. मनुष्य मनात येईल तें तसंच्या तसं बोलूं लागला तर त्याच एकही वाक्य पुरें होणार नाहीं. तो ज्यावेळीं सुसंगतीनं बोलतो तेव्हा, विचार करूनच बोलतो, नव्हे का ?"

" मला तसं वाटत नाहीं. सुसंगति म्हणजे जबाबदारीचं भाषण, हा नियम सर्वांनाच लागू पडत नाहीं. शेकडा नव्याण्णव माणसं पोपटासारखे तासोन्तास प्लॅटफॉर्मस्पीकिंग करतात, म्हणूनच त्याच्यावर जबाबदारीचा आळ घेणं योग्य नव्हे. आपल्या 'यंग इंडिया'तले लेख पाठ करून आज किती लोक डेप्युटि महात्मा होण्याची हाव धरितात बरं ?"

" मृगेंद्रनाथ ! तुमच्या भाषणाची खोच मला समजली, आणि तशी स्थिति आहे याचं मला अतोनात दुःख होतं परंतु चळवळीकरता असेच वक्ते लागतात. अहो ! फार कशाला ? मला देखील एका दिवसात अनेक व्याख्यानं देण्याचं कारण पडलं तर माझं मीच अनुकरण करतों ग्लॅड्स्टनचा इलेक्शन कॅम्पेन्सची भाषणं आपण ऐकलीं, नव्हें, वाचिलीं असतीलच. आहेत ना एकसारखीं ? हल्लीं सोशालिस्टांचीं भाषणंही अशीं एकाच ठशाचीं असतात. प्रोपेगँडा करावयाचा, म्हणजे असं चालायचंच. सरकारसुद्धा जे टिकठिकाणच्या दरबाराना पद्धतें तें

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

त्याच्या वक्तृत्वाकरता नसून, त्यातील चळवळींच्या उष्णतेच्या अंशाच्या मानानं
ते त्या वक्त्याची जबाबदारी ओळखतात, तेव्हा सुसंगति ही देखील स्थलकालावर
अवलंबून आहे, हें मी कबूल करतो. पण विचाराचं जितकं आकलन होईल,
तितकी त्याच्या आविष्करणात स्पष्टता उमटेल, नाहीं का ?"

"स्पष्टता म्हणजे वाक्याची पूर्तता कीं काय ? मला तर असं दिसून आलं
आहे कीं, विचाराचं संपूर्ण आकलन होऊनही जर ती गति भयंकर तीव्र असली, तर
मोठमोठ्या तत्त्ववेत्त्यांच्या भाषेंत तुटकपणाच उत्पन्न होतो. उदाहरणार्थ कार्लाईल,
इमर्सन, ब्रौनिंग. त्यांच्या भाषेंत स्पष्टतेपेक्षां सूचकता हाच मोठा गुण असतो."

"तरी त्या तिघांनींही खूप लिहून ठेवलं आहे. तथापि आपलं म्हणणं
चालेल," गांधी हसून म्हणाले, "आपण सूचक वाक्यात मजजवळ बोलला तरी
चालेल."

"असं नव्हे" मृगेंद्र सजीव होऊन म्हणाला. "माझं म्हणणं सूचकही
होईल व स्पष्टही होईल. स्पष्टतेचा अमोलिक गुण मी कधींच नाकारणार नाहीं.
कार्लाईल, ब्रौनिंग, इमर्सन वगैरेंना स्पष्टता साधली नाहीं याचं कारण कीं,
त्यांचा विचारगतीवर ताबा नव्हता. लिहितां लिहितां त्यांच्या मनात विचार-
लहरी उठत, पण त्यांतही चालू विचारांशीं समरसता त्यांच्याकडून उत्पन्न होईना.
उलट, स्वामी विवेकानंद, आपण स्वतः, लोकमान्य टिळक, अरविंदबाबू,
वगैरेंच्या लेखांत विचारौघ आणि भाषौघ कसे एकजीव झालेले असतात.
तथापि तुम्ही सगळं बोलून टाकतां. वाचकांकरतां तुम्ही सगळं अन्न शिजवून व
अगदीं चटकन् गिळतां येईल असा त्याचा घांस तयार करून तुम्ही वाचकांना
फक्त गिळण्याचेंच काम ठेवतां. यामुळं तुमचे ते तयार झालेले घांस पटापट
भराभर कोंबून, त्यांचें मुळींच रसाभिवन होऊं न देतां, शेंकडों डेप्युटि लोकमान्य
व डेप्युटि महात्मे तयार होतात. सूचकता हा गुण आपल्या ठायीं मला
आढळून येत नाहीं."

"कबूल !" गांधी स्मित हास्य करून म्हणाले. "आपण आरंभ तर चांगला
केला आहे. तेव्हां आतां आपण स्पष्ट व सूचक अशा दुहेरी पद्धतीनं सांगा कीं,
आपले [illegible] असं आपणांस कां वाटतं ?"

" कारण एक मुक्काम संपला कीं दुसऱ्या मुक्कामाच्या रस्त्याला लागलें म्हणजे घरापासून फिरून आरंभ करण्याची जरूर नसते म्हणून. दादांनीं मला स्वखर्चानं शिक्षण दिलं, त्याचा मोबदला ते मागत नाहींत."

" ते मागणारही नाहींत. पण आपण मात्र त्यांचे ऋणको खचित आहात."

" ऋणको हा शब्द मला मान्य नाहीं. दादांनीं जें मानवजातीकरता कार्य केलें, त्याच्यापुढें जाऊन मी मानवजातीची सेवा केली कीं, दादांच्या शिक्षण-दानाचं, त्यांना फळ मिळालं, अशी माझी ठाम समजूत आहे. पण पुढें मी जातांना, दादांनीं जर माझे पाय धरून ठेवले तर—तर—तर—" तो स्तब्ध राहिला. त्याचें अधोवदन झालें.

" मृगेंद्रनायजी ! तुमचं तेज मी ओळखून आहें. तुम्ही कराल तें चांगलंच कराल अशी माझी खात्री आहे. पण आपण अगदीं वेगळंच असं कांहीं तरी कार्य करणार असल्याचं परवा भाईंना सांगितलं होतं ना ? तें कोणतं कार्य, हें मला आपणास सांगता येईल का ? "

चटकन् मृगेंद्राची मान वरती झाली तो म्हणाला.

" हो हो. मला तें आपणाला एकदा सांगायचंच होतं. आपण १९२० सालीं जेव्हां असहकारिता पुकारली होती तेव्हा मी सोळा वर्षांचा होतों; व नुकताच इंग्लंडमध्यें शिक्षण घेण्याकरतां जाणार होतों. आपल्या व्याख्यानांतीं मला, परदेशीं जाऊं नये, असं वाटलं व मी तसा दादांच्या जवळ हट्ट धरला होता. पण त्यावेळीं भाईंच्या व दादांच्या भाषणाचा माझ्यावर एकप्रकारें जुलूम झाला; व मी मग सात वर्षें युरोपांत शिकलों व हिंडलोंही; पण आपल्या स्वराज्यप्राप्तीच्या अचाट प्रयत्नांचाही मी यमून अभ्यास करण्याशाठीं येथ उत्सवप्रसंग टाळले. मी महाराष्ट्रीय असल्यामुळें, व स्थानिक वास्तव्यांत नाशिकचा राहणारा असल्यामुळें माझ्या महाराष्ट्रीय संस्कृतीचा पिंड माझ्या ठायीं फोफावत होता हें मी अगदी कबूल करतों अशा रीतीनं 'ठोशास ठोसा' या संस्कृतीचा हा पिंड, "ठोसा अगोदर ठोसा" या संस्कृतीच्या युरोप व अमेरिका या राष्ट्रांत वास्तव्य असतांना, "ठोशालाही या वगा !" करणाऱ्या महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानाचा व आचारांचा बारकाईनं अभ्यास करीत होता, तसा त्यानं केस व ठाकरेंच्या मराठे आचरण करणार असा निश्चय करून, हिंदुस्थानांत येतांच, भाईंना झालें

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

मजवर भयंकर वावटळ आली; व मी दिङ्मूढ होऊन गेलों. परंतु मला कल्पनाही नव्हती कीं, प्रत्यक्ष महात्मा गांधीच मला त्या वावटळींतून शिरसलामत काढतील, पण दैवयोगानें तसें होऊन मी आज प्रत्यक्ष आपणाजवळच आहे. आपणाजवळ येऊनही, वावटळींतून निघूनही, माझी दिङ्मूढता नष्ट झाली नाहीं; उलट ती वाढलीच असती. कारण सूर्यावरचे डाग कोटों मैल अंतरावरून टेलिस्कोपच्या द्वारें दिसतात; प्रत्यक्ष त्या खड्ड्यात जाऊन ते कदापि दिसणार नाहींत. परंतु आपलीं मी तोंडदेखली पूजा करीत नाहीं; परंतु आपण खरोखरीच महात्मा आहात, मला आपण माझ्या पत्नीसमवेत तीन सुखाचे दिवस घालूं दिले; त्यामुळें मन सुखशय्येवर सुद्धां माझ्या बुद्धीला पूर्ण वाव मिळून, मी सूर्याच्या खड्ड्यात नसून, चंद्र-म्याच्या व्हॉलकॅनिक सरफेसवर आहे, असा मला अनुभव आला आहे. आता मला त्या बाजूचा आभ्यास तेथेंच राहून करतां येईल अशी उमेद आहे. चंद्रम्याची एकच बाजू आमच्या पृथ्वीकडे असते तशी आपली एकच बाजू आज जगापुढें आहे. त्यामुळें आपण अनेकांना साधु भासता, पण कांहींना आपणावरच्या डागाचें यथातथ्य ज्ञान नसल्यामुळें, आपण सैतानच वाटतां. मला आतापर्यंत त्या दुसऱ्या बाजूचं जें ज्ञान झालं आहे त्यावरून आपण सर्व बाजूंनीं साधूच आहात असें पटत चाललें आहे. आपणास सैतान समजणाऱ्या माझ्या दादाच्या विरुद्धही माझी आत्मप्रचिति आहे. त्याचें आज्ञान आहे; माझा विश्वास आहे. विश्वासानें अज्ञा-नाला, तें जुनें व वृद्ध म्हणून मान देऊन, जगाचें नुकसान होऊं देऊन खरं पुत्र-कर्तव्य होत नाहीं. तथापि आपल्या साधुत्वाचीही आपल्याशीं चर्चा करून मला मानवजात्युत्कर्ष करावयाचा आहे. म्हणून मी माझा स्वतंत्र मार्ग कोणता, हें आप-णाशीं मनमोकळं करून बोलों.

" Bravo ! "गांधी उद्गारले " आपण माझें चित्त ओढून घेतलंत. आपण मजवर बेलाशक टीका कराल अशी माझी खात्री आहे. महाराष्ट्राबद्दल मला एवढ्याचकरता आत्यादर वाटतो. Fire up !

" मी माझा स्वतंत्र मार्गच आपणास आतां एकदम सांगतों. " सुरेंद्र पाणी पिऊन बोलूं लागला. " मी, हिंदुस्तानच्या कल्याणाचा विचार, जागतिक कल्याणाच्या दृष्टीनें केला; व त्या दृष्टीनें तावडतोब काय करायला हवं, हेंही

पाहिलं तेव्हा मला असं दिसून आलं की, हिंदुस्थानचं यापुढलं कर्तव्य साम्राज्य-सत्ता परत मिळवण्याचं नाही. No Indian Empire for the Indians at all!"

"मग काय? For the English people perpetually?"

"नाही. कोणाकरिताच नाही. हिंदुस्थानचं साम्राज्य ही संज्ञाच जगातून नष्ट झाली पाहिजे."

"मग कोणती आली पाहिजे."

"हिंदु संस्कृति. संस्कृति साम्राज्य ही संज्ञा व तिचा आचार हेच जगाच्या कल्याणाला पोषक होईल. साम्राज्य म्हणजे राजकीय हक्क व जबाबदाऱ्या अशी कल्पना, राष्ट्रीय कल्पना, अत्यंत प्राचीन कालापासून जगात एकट्या हिंदुस्थानानेंच उत्पन्न करून पोसली. अगदी १८६० च्या जर्मन साम्राज्यापर्यंत अथवा १९०५ च्या जपानीज साम्राज्यापर्यंत जीं साम्राज्यें झाला अथवा आज आहेत, तीं सारीं हिंदुसाम्राज्याच्या नकला आहेत. राजकीय सत्ता थाटावयाची, परकी राज्यें जिंकावयाचीं, त्यांतील लोकांना आपणांशीं समरस करण्याकरता, आपल्या राज्यपद्धतीला संस्कृति हें नांव द्यावयाचं, व तिचा प्रसार, शिक्षण, आरोग्य, शेतकी, वाहनें, कलावाङ्मय वगैरेंच्या द्वारानीं करावयाचा, ही जुन्या धडयाची जुनीच उजळणी

soul हा महामंत्र नष्ट झाला. आस्तें आस्तें हिंदूंच्या साम्राज्याला त्या Prestige नच मारल. त्याच जादुटोण्यामुळं सगळीं साम्राज्यें मेलीं, व आजचीं ब्रिटिश साम्राज्यासह सगळीं साम्राज्यं तशींच ठार मरणार, मेलींच पाहिजेत. मारण्याचं पवित्र कार्य हिंदुस्थानचंच आहे, कारण त्यालाच तितकी ताकद आहे. आत्मस्वातंत्र्याचं रोमरोमातून रक्ताभिसरण जगतीतलावर एकट्या हिंदूंच्याच शरीरात होत आहे. सबब त्यानंच राजकीय साम्राज्याच्या राष्ट्रीय कल्पनेला आता स्वताच्या हातानं जाळावं."

"कोणत्या उपायानीं ?" गांधींनीं विचारिलें.

"मुख्यत तुमच्याच उपायानीं मानवजातीवर अविकृत प्रेम करून. पण हें तत्त्व जर लवकर उदयास आणण्याचं असेल तर या तत्त्वाला विरोध आणणाऱ्यांना वठणीवर आणण्याकरिता त्यांचेच भीषण उपाय, प्रसंग पडल्यास अमलात आणलेच पाहिजेत. देवगण जसा राक्षसगणाला वळण लावून देवगणात सामील करून घेतो, पण तें वळण लावताना त्यालाही राक्षसगणाचीच भीषण कृति करावी लागते, त्याप्रमाणंच हिंदुस्थाननंही आज, संहारक शक्तींत श्रेष्ठता मिळविली पाहिजे."

"म्हणजे राजकीय सत्ता मिळविली पाहिजे."

"का ?"

"तिच्याशिवाय संहारक शास्त्रीय शोध लागणार कसे ?"

"मूळात संहाराचीच माझी कल्पना अशी आहे कीं, भयंकर संहार तोच कीं, ज्याच्या ठायीं कमालीची जीवनशक्ति असते. उदाहरणार्थ, उन्हाळ्यांत वणवा पेटून डोंगरचे डोंगर जळून पालेखिर पडतात. परंतु एक आषाढमहिना सरतांच त्याच काळ्या पत्थरावसुद्धां हिरव्या चार पुरणाची गर्दी उडून त्यावर असंख्य जीवांचं जीवन चालतं. तें जीवन जसं पूर्व-संहाराला मारतं, तशीच माझी संहारसंहारी शक्ति आहे. नाहीं तरी मला आतां असं सांगा कीं, पाश्चात्यांचीं संहारक अस्त्रं तरी आतां त्याच मार्गाला लागलीं नाहींत का ? परंतु जें जीवनशास्त्र Empirical sciences मधून उत्पन्न होणं शक्यच नाहीं, उलट ज्याचा उदय मानवशरीर व मानव-हृदय यांतून उत्पन्न होतो, त्याचा परिपोष या भौतिक शास्त्रज्ञांना क[illegible] ?"

"म्हणजे तुमचें म्हणणं असं आहे कीं काय, का, प्राणायामादि योगसाधनानीं जीवनशास्त्राची प्रगति करून मानवजात स्वतंत्र करण्याची हिंदुस्थानला धमक आहे."

" अर्थात् ! त्याशिवाय आता तरणोपायच नाहीं. जिथून हिंदुस्थाननें चूक केली व त्या चुकीचा विस्तार पाश्चात्यानीं केलेला आहे, तिथून आरंभ केल्याशिवाय आता प्रगतीची आशाच नाहीं."

"पण प्राणायामान काय होणार ?"

" माझी बोलण्यात चूक होत आहे, असं दिसतं भौतिकशास्त्राचा उदय शोधून पाहता मानवी शरीरापासूनच पाश्चात्य संशोधक दृश्य सृष्टीकडे वळले, व त्याची चिकित्सा करताना सुद्धा शास्त्रज्ञांची एकाग्रताच त्याच्या कामीं मुख्यत पडली आहे शेवटीं दृश्यसृष्टींतून अनेक मूलभूत तत्व त्यानीं ओळखून, त्यांत विलक्षण तेज व शक्ति आहे असें दिसताच त्यानीं ती निर्जीव पदार्थांना लाविली आहे, व ते आजून लावीत आहेत. परंतु त्याना आता कळून चुकलं आहे कीं, एकीकडलं तेज दुसरीकडे लावल्यान तेजात भर न पडता, त्याचं मूळ प्रमाण चुकून, सृष्टिरचनाच बदलते. अजून सृष्टि फार मोठी व शोध अल्प शक्तीचेच आहेत, त्यामुळें सृष्टिरचना बदलण्याचा भयंकर धोका, त्याना दिसत नाहीं मधून मधून जलप्रलयाच्या थपडा बसतात, पण त्या डोळे फाडून टाकण्याइतक्या ज्वलज्जहाल अजून झाल्या नाहींत तथापि त्या पापाचं प्रायश्चित मानवी शरीराला घ्यावं लागत, त्यामुळ, मानवी मेंदूची विकृति घडते, व त्यामुळें समाजरचना बिघडून सोशॅलिझम, कॉम्युनॅलिझम, अनार्किझम, वगैरे रोग मानवी समाजाला लागतात " " पण मानवीसमाजसुद्धा बदललेच पाहिजेत बदलल्याशिवाय प्रगति कशी होणार ? "

" बदलणं वेगळं, व बदलवणं वेगळं, मी सृष्टीची रचना व समाजाची रचना सारे बदलून टाकीन, अशा अहंकारी वृत्तीच्या माणसाला आपण सैतान समजतों ना ? परमेश्वराच सर्व शक्तिरूप एक तर मान्य करा, नाहीं तर तें समजत नाहीं म्हणून स्वस्थ बसा, पण मिस्टर परमेश्वर मेला, व मि लॉर्ड कर्झन काय तो मोठा, अशा अहंकारानं काय होतं हें दिसतंच आहे "

# महात्मा गांधी-सैतान कीं साधु ?

" अहो ! संजीवनीचा शोध प्रत्यक्ष जडसृष्टींत आणण्यापर्यंत त्यांवेळीं आर्यांची भौतिक शास्त्रप्रगति झाली होती."

" मग तेच करण्याचा उपक्रम आपण करणार कीं काय ? "

" नाहीं ! कधींही नाहीं ! चुकून नाहीं ! अहो ! पाश्चात्य याच मार्गानें चालले आहेत आणि शुक्राचार्यांनीं निदान एकाच व्यक्तींत ती शक्ति सांठवली होती, पण हे पाश्चात्य तर त्या सृष्टिशक्तींना बाजारबसव्या करीत आहेत, शुद्ध बाजारबसव्या ! स्त्रीस्वातंत्र्याचे गोडवे गाणारे ते, स्त्र्‍ -ची किती विटंबना करतात हें आपण तर पाहातोंच आहोंत पण ते तरी का होंनं ? कारण त्यांच्या मुळाशा ही बाजारी कल्पनाच आहे ! प्लेटोपासून अगदी वर्कफ.र्यनचे सारे संशोधक पहा ! , वसे एकूणएक स्त्रीदेहविटंबक ! रुसोनें तर प्रत्यक्ष अबदात्रीशींच व्यवहार ठेविल होता, कारण तिनेच त्याला ते शिकवलें ! अंगावर शहारे उत्पन्न होतात ! ६५ याच्याबद्दल दोष नाहीं. आम्हा इंडोआर्यांच्या पडत्या काळांतलीच ही आ.. -पापीं पाश्चात्य पोरं आहेत ! अर्थात् पापक्षालन आमचे आम्हींच केलें पाहि ज्या अमोघ शक्तींच्या बलानें महेंद्राला स्वर्गीय राजकीय साम्राज्य मिळालें, त्या अमोघ शक्तींना, राजकीय साम्राज्याच्या कल्पनेला मानून, योग्य वळण ला आम्हींच मानवसंस्कृतिसाम्राज्य तयार केलें पाहिजे."

"आपण कृपा करून संस्कृतिसाम्राज्याच्या पायऱ्या सांगाल काय ? "

" हो ! अत्यानंदानें ! प्रत्येक मानवी देह हा चिद्दश आहे त्यात परमात्म्याचे सर्व गुण असतात. परंतु एका विशिष्ट गुणाला त्याच्याकडून महत्त्व मिळावें अशी परमेश्वराची इच्छा असते, व ती त्या मनुष्याच्या स्वभावातून चमकते. त्या विशिष्ट गुणाचा, तो सद्गुण असल्यास, पूर्ण विकास होऊं देण्याकरता, त्यास भरपूर वाव असावा दुर्गुण असल्यास, तो त्याच्या भोंवतालच्या माणसात जिरला जावा."

" हें सद्गुणदुर्गुणत्व कोणी ठरवायचें ? "

" त्याच्या आईबापांनीं व मित्रांनीं व तेही नसल्यास शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं."

" म्हणजे कुटुंबपद्धति आलीच ? "

" एकदम उत्तर देतां येणार नाहीं. सृष्टींत हवापाण्याचे फरक असतात. त्या त्या मानानें कुटुंबादि संस्था लवचीक असाव्यात. मुळात हलींच्या मुख्य रोगावर

औषध घेतलं म्हणजे भलभलत्या अडचणी उत्पन्न होणार नाहींत. आजचा रोग विषम अन्नकरणीचा आहे. तेव्हा पुष्कळ अन्न उत्पन्न करणं हा पहिला शास्त्रीय प्रयत्न. शरीराच्या ठायीं आळस उत्पन्न होऊन काम वाढणार नाहीं. अशा बेतानं अन्न मिळणं व ग्रहण करणं हा दुसरा शैक्षणिक प्रयत्न, आणि ही विभागणी करण्याकरता योग्य योजना करणं हा तिसरा राजकीय प्रयत्न, व सर्वांना विश्वकाचें ध्येय मात्र दाखवून उन्मत्तपणापासून दूर ठेऊन सात्त्विक व सतेज कसं व्हावं हें

## महात्मा गांधी—सैतान की साधु ?

प्रख्य करणार, अशी महात्माजींना भीति वाटली. कोणताही प्रसंग घ्या; त्यांना लोकमान्यांची पदोपदीं आठवण व्हावी. लाईमहाराज प्रकरण जसें त्यांना जन्मभर पुरलें, तसें हें मृगेंद्रगुल्झार प्रकरण आपणास त्रास देणार काय ? असें त्यांना होऊन गेलें. तथापि लोकमान्यांप्रमाणें तेही स्थितप्रज्ञच आहेत. त्यांनीं त्या जोडप्याला अमेरिकेंत पाठवून स्वतः साबरमतीचा आश्रम गाठला. बार्डोलींत सरदार वल्लभभाईंचेंच राज्य होतें. गांधी तेथें पुढें क्वचितच जात होते. तथापि त्यांनीं गुल्झारच्या आईचा शोध लावून तिला आश्रमांत आणविण्याचेंही एक कार्य सरदारांना सांगून ठेविलें होतें. परंतु मृगेंद्र आपल्या बायकोला घेऊन अमेरिकेला गेला हें कळताच कै. माधवराव मोघे उद्गारले, "गांधी महात्मा खरे! पण सैतान की साधु ?"

### पुस्तक पहिलें समाप्त

पुस्तक दुसरें

# सैतान !

भाग पहिला

## मवाळांची खरी मनोरचना !

" जहाल व मवाळ हे नवीन राजकीय पक्षवाचक शब्द निघाले आहेत ते सापेक्ष समजावे. कारण प्रगतीचा असा नियमच आहे की, आजचा तुमचा हा जहाल उद्यांचा मवाळ ठरणार "—व्याख्यान " नवा पक्ष व त्याचे मार्ग " या विषयावर कलकत्ता येथील.

लो. बाळ गंगाधर टिळक

# मवाळांची खरी मनोरचना !

§ १ " That's right ! " दादासाहेब क्षेमकल्याणी आपल्या आराम खुर्चीवरून चटकन् उठून उद्गारले. " मी गव्हर्नर असतों तर अगदीं असंच केलं असतं ! "

" कसं ? " राधाबाईंनीं तेथें येऊन विचारिलें.

" अग ! तुला कळलं का ? सरकारनं बार्डोलींत लष्कर नेऊन ठेवलं आहे. आजच्या वर्तमानपत्रात मुख्य बातमी तीच आहे. "

" एवढंच नाहीं, " कॅप्टन माधवराव मोघे तेथें येऊन म्हणाले. त्याचा क्षेमकल्याणींशीं विशेष घरोबा होता. तरीपण राधाबाईंना तेथें पाहताच ते थोडे चपापले व म्हणाले, " नमस्कार वहिनीसाहेब ! "

" तुम्ही आज पार्टीला येणार हें मला कळलं होतं, " राधाबाईंनीं नमस्कार घेऊन म्हटलें, " पण मुंबईहून सुरतेला केव्हा आला, हें कळलं नव्हतं. "

" पण तुम्ही कांहीं सांगणार होता ना ? " दादासाहेबांनीं माधवरावांना आठवण करून दिली.

" हो; मी सांगणार होतों कीं, बार्डोलींचं पथक माझंच आहे. मी आजच दुपारीं तिथं जाणार ! "

" Good ! " दादासाहेबांनीं त्याच्याशीं हस्तांदोलन करून त्याचें अभिनंदन केलें. त्यांना खरोखरच आनंद झाला होता.

" बरं झालं बाई ! " राधाबाईंनींदेखील आपली पसंती दाखविली. " पण माझ्या मृगेंद्राला जपा हो. "

" मृगेंद्र मेला ! " दादासाहेब ओरडून म्हणाले, त्यावेळीं त्यांच्या कपाळावर आठ्याचें नुसतें जाळें होतें, ते बायकोला रागानें म्हणाले, " तुला सांगितलं ना कीं, त्या कारट्याचं नांव कोणीहि काढतां कामा नये म्हणून ! असलीं कार्टी जन्माला येताच, त्याच्या नरडीला नख— "

" पुरे ! पुरे ! " राधाबाईंना पतीचे ते विखारी शब्द सहन होईनात. "अहो ! पापाचीं पोरं सुद्धा अलीकडल्या चवचाल पोरींना मारवत नाहींत, तर माझं पतिव्रतेचं तें पहिलंच बाळ, पहिलाच सोनुल्या—

म्हातारीच्या डोळ्यांना टचकन् पाणी आलें. तिला आपल्या पतीचा सर्वात्र

विशेषसा आवडत नव्हता. ती स्वतः अत्यंत प्रेमळ, शांत, समंजस, देवपूजादि
करण्यात जुन्या पद्धतीची असे. नवऱ्याकरता तिनें पोषाखात तेवढा नवेपणा पत्क-
रला होता; पण तोही अलीकडल्या नवेपणाच्या मानानें पुराणाच होत होता, व
तें त्या वृद्धेला आवडत होतें. आपल्या यजमानाच्या इभ्रतीकरिता तिनें आपल्या
अनेक ल्हानसहान धार्मीक भावनांना गुंडाळून ठेवलें; एवढेंच नाहीं, तर पोटच्या-
गोळ्याकडे पाहून तिनें नवऱ्याचा नखरेलपणा तर राहोच, पण तापट स्वभावही
अतोनात सहन केला. परमेश्वरानें दोघा मुलींना घरीं परत पाठवून, तिच्या
हृदयाला अगोदरच चरके दिले होते; त्यात "तुझ्या अल्पवयीं लग्न
लावून देण्यामुळेंच हा असा प्रसंग आला." हा पतीचा टोमणाही तिला
वारंवार सहन करावा लागत असे. तरीसुद्धा त्या पतिव्रतेनें पतीविरुद्ध बंड असें
कधींच केलें नव्हतें. तिचे पहिले दोघे मुलगे अल्पवयातच मेले, त्यावेळीं कृष्ण-
भक्तीनें तिची नंतरचीं सगळीं मुलें वाचलीं होतीं. तिनें मृगेंद्राचें नाव मुरलीधर
व सुरेंद्राचें नाव दामोदर असें ठेविलें होतें. परंतु शंकररावांना आपल्या स्वत:च्या
नावात 'रोमान्स' आढळेना, म्हणून त्यांनीं तीं नावें रद्द करून मृगेंद्र व सुरेंद्र अशीं
बंगाली पद्धतीचीं प्रचलीत केलीं होतीं, व मुलींचींही सरोजिनी, मृणालिनी व
नलिनी अशीं ठेविलीं होतीं. पैकीं पहिल्या दोघी परत आल्या होत्या व नलिनी अजून
अल्पवयी होती. या सर्व प्रकारात राधाबाईनीं नवऱ्याचें म्हणणें निमूटपणें मान्य
केलें होतें पण मृगेंद्रावर जशी पतीची आग पडत चालली, तशी त्या माउली-
चीही चित्तवृत्ति भावावत चालली होती. मृगेंद्रानें एका कुलहीन मुलीशीं लग्न
केलें, ही गोष्ट अर्थातच तिला आवडली नाहीं. तथापि आपल्या मुलग्यावर
मानसिक बहिष्कार तिजकडून घालवेना आणि शंकरराव (दादासाहेब) तर
मृगेंद्राचें नाव ग्रामोफोनमधूनसुद्धा ऐकण्यास तयार नव्हते. (त्याच्या कवितांच्या
प्लेटी प्रचलित होत्या) तरीसुद्धा त्यासाठीं जवळच्या मातेनें आपलें दुःख फक्त
देवघरातच देवाजवळ बोलावें. पण आज जेव्हा परक्यासमोर मृगेंद्राच्या नरडीवर
नख ठेवण्याचा फूत्कार पतीनें सोडिला, तशी त्या म्हातारीची प्रेमाच्या दुधाची
धारही फुटली. तिने आपले दुःखाश्रु पदराला पुसून देवघर गाठण्याकरिता तोंड
फिरविलें. तेव्हां कॅ. मोघे तिला म्हणाले—
"वहिनीसाहेब ! तुम्हाला मृगेंद्राबद्दल दुःख होणं जितकं स्वाभाविक आहे,
तितकंच माझ्या वहिलांनाही मणिलालबद्दल होणं स्वाभाविक होतं ना ?"

" माधवराव ! " राधाबाई आवेशानें बोलल्या. " तुम्ही सगळे जरी त्याच्या-विरुद्ध उठला, तरी मी खरं तेंच सांगतें कीं, माझ्या बाळाकडून तसं कधीं कधीं घडायचंच नाहीं. "

" घडायचं नाहीं कदाचित् ? पण एकदा घडून गेलं खरं ! "

" साफ खोटं ! माझ्या बाळावर नसती तोहमत तुम्ही सर्वांनीं आणली आहे !" पुढें तिला काय वाटलें कोणास माहीत; पण ती वाघिणीच्या आवेशानें म्हणाली " माधवराव ! मीसुद्धां तुमच्या अगोदर वार्डांत जाणार, व माझ्या बाळापुढं उभी राहून तुमच्या गोळीबारापासून त्याचं संरक्षण करणार ! "

Madness ! sheer madness ! दादासाहेब उद्गारले, व आपल्या आरामखुर्चीवर पुन्हा बसले.

" वहिनीसाहेब ! " माधवराव म्हणाले, " तूर्त त्याची कांहीं गरज नाहीं. मृगेंद्र आपल्या मुसलमान बायकोसह अमेरिकेला गेला आहे. "

" खरंच कीं काय ? " राधाबाईंना अत्यानंद झाला. " देव पावला ! ( पर्णाकडे पाहून ) हें नाहीं मला कळवलं ? "

" साठीबुद्धी नाठी झालेल्या बायकोला सगळं सांगण्याचं कारण काय ? "

" नका सांगूं ! माझा बाळकृष्ण तर सांगेलच किनई ! "

" जा आतां खालीं जा ! आमची आतां मंडळी येतील, त्याच्यापुढं तरी हें घरगुती नाटक करूं नकोस ! "

" आपण कांहीं वेडं वाकडं बोलूं नका, म्हणजे मीही बोलणार नाहीं. " असें म्हणून राधाबाई, पार्टीची व्यवस्था करण्यास गेल्या

§ २ राधाबाई निघून गेल्यावर माधवराव आणि दादासाहेब हे दोघेही कांहीं वेळ स्वस्थ बसले होते. माधवरावांनीं एक वेल्कम् चिरूट पेटविला, आणि दादासाहेबांनीं एक, आर्मी नेव्ही कटची सिगरेट् चेतविली; आणि दोघेही समोरच्या सुंदर देखाव्याकडे पाहूं लागले. दादासाहेबांची लायब्ररी आणि दिवाणखाना यांच्या पुढें एक सुंदरशी व रुंद अशी गॅलरी होती. ते आराम खुर्च्यांवर बसले होते. गॅलरीच्या पुढच्या बाजूवर ट्रेलिस वर्कची लोखंडी जाळी होती. परंतु रुंद ऑब्लाँग असा तीन चार खिडक्यांएवढ्या बाकांचा जाळीचा तेवढा खाली भाग

प्रीन आयर्व्हीने भरून गेला होता, आणि आयर्व्हीमधून एका विस्तृत समुद्रवेलाचीं रुंद पानें व घंटेच्या आकाराचीं, पोटीं निळीं पण अंगीं पांढरीं अशीं फुलें खिडक्यांतून, वाऱ्याच्या झुळकीनीं हलत होतीं. त्या फुलावर भुंगे बसत तेव्हा, त्याच्या त्या फुलावरचा झोला त्यांना सुखावह होत होता व पाहणाऱ्याची चित्तवृत्ति शांत असली तर, त्यानाही आनंद देत होता. खिडक्यांत उभें राहून खालीं डोकावलें तर, तापीचा उतार सहजगत्या दिसे, आणि जरा लांबवर नजर फेकिली तर, आगगाडीचा रम्य पूल एकंदर देखाव्यांत किती सुरेख भर घालीत होता, याची साक्ष पटे. तसेंच दुर्बिणींतून समुद्राकडे नजर फेकिली तर, समुद्राचा मनोल्हादक देखावा संतप्त जीवालाही सुखवी. पण तो समुद्रच दादासाहेबांना नको होता. त्याच्याकडे पहातांच त्यांना मृगेंद्रनाथाची आठवण होई आणि ते त्या बाबतींत घरीदारीं, व विशेषत बायकोपाशीं कितीही कठोर रहात असत, तरी त्यांच्या नेत्रांत पुत्रविरहानें पाणी चमके. खरा गोष्ट अशी होती कीं, दादासाहेब स्वत: अत्यंत बुद्धिमान् होते, व आपणापेक्षाही आपले दोन्ही मुलगे जास्त बुद्धिमान् निघाले याचा त्यांना मनापासून आनंद होत असे. नाशिकला त्यांची जी जहागिरी होती ती त्यांच्या वडिलांनीं सगळी गहाण टाकून जवळजवळ गमाऊन टाकली होती; परंतु दादासाहेबांनीं स्वकष्टानें ती सारी तर सोडविली होतीच पण मुलखेलाच सर्व दारिद्र्य गेल्यामुळें तेथेंही त्यांनीं जमीनजुमला मिळवून विद्वान् लोकांकडून आणि सरकारदरबारांतून पदव्या व मानमान्यता मिळविली होती, आणि त्यांचा स्वभाव जात्याच रंगेल नव्हे, उच्छृंखल नसता तर त्यांनीं आपल्या मागें नाव ठेवण्यासारखी ग्रंथनिर्मितीही करून ठेवली असती. आपल्या मुलांनीं तें करावें; द्रव्य व मान यांत आपल्या डोळ्यादेखत, भर टाकावी अशी त्यांची जबरदस्त इच्छा होती. त्याकरतां त्यांनीं पैसाही खूप खर्च केला होता; आणि जेव्हां नरोत्तमभाईसारख्या कोटपाधीशाशीं सोयरीक ठरविली तेव्हां, त्यांना धन्यधन्य झालें होतें. धाकटा मुकुंदराव आय्. सी. एस्. होऊन अमदाबादेस असिस्टंट कलेक्टर म्हणून तीन महिन्यांपासून लागला होता आणि त्यानें यांना न विचारतांच एक्झिक्यूटिव्ह लाइन् सोडून ज्युडिशियल लाइन् जरी पत्करली होती, तरी तो आरंभीच व अमदाबादेलाच ॲडिशनल् सेशन्स जज्ज असल्यामुळे त्यांना उलट आनंदच वाटत असे. जनरल मोघे यांच्या मर्जीशी

त्यांचें लग्न व्हावें अशी दोघांचीही इच्छा होती; व त्याप्रमाणें परस्पराची मैत्री करून विवाहबंधन त्याना कितपत पचेल, हें तीं दोघेंही पाहत होतीं. इतक्यात माणिलेचें तें कर्म सुरेंद्राच्या आडवें आलें, व मृगेंद्रावरच तो आळ आल्याकारणानें सुरेंद्राला माणिलेविषयीं तिटकारा आला होता. दादासाहेबानीं त्यातल्या त्यात मोघ्याकडून साठ हजाराचा हुंडा हवकून स्थिरस्थावर करण्याचा प्रयत्न केला, कारण भाईच्या अकल्पित रोगामुळें त्याच्या घशातला कोटींचा नल्किातमणि उमळून बाहेर पडला होता. तेव्हा राहो कोटी, राहो लक्ष, निदान अर्ध लक्ष तर खरें, असा मॉडेस्ट भाव, त्या मवाळी मनोरचनेच्या विद्वानानें केला होता. पण बार्डोलींत तो भलताच प्रकार झाला. अर्थात् वृद्धपणीं आपल्या पूर्वजाप्रमाणें आपल्याही मागें साडेसाती लागली अशी त्याची खात्री होऊन चुकली. त्यात सरोजिनी व मृणालिनी यानाही वैधव्य प्राप्त झालें होतें, त्यामुळें तो म्हातारा कावून गेला होता. अशा मन:स्थितींत, नुकत्याच पत्नीशीं झालेल्या भांडणामुळें ते उद्विग्न चित्तानें आपल्या सिगारेटच्या धुराकडे पहात बसले होते. त्याची दृष्टि मधून मधून समोरच्या सुंदर देखाव्याकडेही जाई कारण त्या स्थळीं त्याचे किती तरी " रोमान्सेस " झाले होते,

परंतु दादासाहेब सगळ्याच दु:खाची जाणीव माधवरावाना नव्हती; त्यातून तो लष्करी बाण्याच्या म्हणजे अघमुठा, अल्पशिक्षित मनुष्य होता. तो म्हणाला,

" What a fine day ! नुकताच पाऊस पडून गेल्यामुळें वेलीवरचे ठिपके कसे गळतात पहा. दादासाहेब ! You have a very charming house of your own."

" हो ! आहे खरं ! " दादासाहेबानीं मानावर येऊन म्हटलें.

" दादासाहेब ! " माधवराव थोडा वेळ जाऊं देऊन म्हणाले. " माणिलेविषयीं मी एक तोड सुचवूं का ? आता मंडळी येतील, व मग आपणाला एकान्त मिळावयाचा नाहीं; आणि मलाही आज दुपारीच " ड्यूटी " वर निघालें पाहिजे. " " सुचवा कीं, " दादासाहेब खोल आवाजात म्हणाले, त्याना भीति वाटली कीं, हा माणिलेला आपल्या घरीं ठेवण्याची गोष्ट काढितों कीं काय हरि जाणें. " मला असें वाटतें कीं; " माधवराव एक एक शब्द मोठ्या मोरळा करून म्हणूं लागले, " एकंदर गोष्ट लक्षात घेऊन, सुरेंद्रानंच आता माझ्या



८

बहिणीशीं लग्न लावावं. त्यात आमच्या घराण्याची अब्रू तर वाचेलच; पण मुंद्राचीही शिल्लकी दिसेल." नंतर तो फारच सावधानतेनें म्हणाला. "वडिलांच्या साठ हजार रुपयात मी माझी नगरची चाळीस हजाराची शेतीही तिला स्त्रीधन म्हणून देईन.

या सूचनेनें दादासाहेबास कोणत्याचप्रकारें धक्का बसला नाहीं. कारण ही सूचना येणार अशी त्यांची अपेक्षा होतीच, परंतु मुलाच्या बाबतीत ते आता फारच हवालदील झाले होते. गांधींनी सगळी तरुण पिढी बिघडवून टाकिली अशी त्यांची त्या महात्म्यावर आजपर्यंत नुसती शाब्दिक टीकाच होती. पण त्यांनी आपला एक निदान तरी गोळा खावून टाकिला अशा दुःखोद्रेकानें ते अंतर्यामी चडफडून होते. ते माधवरावाना म्हणाले,

"माधवराव ! तुमची ही सूचना मी आपण होऊन करणार होतोंच. हुंड्याचं व देण्याघेण्याचं समजलं. आपणासारख्यांना लाख दोन लाखाच्या भाषा बोलायला काहींच हरकत नसल्यामुळं, तो प्रश्न आपणाला तरी दुय्यम असतो. प्रश्न काय तो सुंद्राचा आहे मणिलेच्या हल्लीच्या स्थितींत.

"हल्लींच मी म्हणत नाहीं," माधवरावांनीं त्यांना मध्येंच अडविलें, "तिच्या बाळंतपणानंतर. तिच्या बाळंतपणाची मी सोय केली आहे. प्रसंग येऊं नये,आला बहिणीला मारता तर येत नाहीं."

"अंनतरावांनी जर इतकी शांतता ठेविली असती," दादासाहेबांनींही आता माधवरावाना अडविलें, "तर इतका गाजा वाजा झाला नसता; आणि आतां झालं आहे, तितक्या गुंतागुंतीचं हें प्रकरण झालंही नसतं. परंतु "स्वभावो दुरतिक्रम' हेंच खरं."

"झालं तें होऊन गेलं आता काय त्याचं ?" माधवराव म्हणाले. "आता त्या आईबापावेगळ्या मुलीचं मला शक्य तितकं हित केलंच पाहिजेना ? आपणच आता आम्हाला वडलांच्या ठिकाणीं आहात. आपणाशिवाय आम्हाला आता कोण मुक्त करणार ? "त्याचा घसा स्वाभाविकपणेच भोगरा झाला, "आपण मनात आणाल तर बापू कांहीं आपल्या शब्दाबाहेर जाणार नाहीं, असं मला वाटतं."

"बाळेगांहून येरेपर्यंत मला असं वाटत होतं. परंतु तेव्हापासून मला जग बुडत असल्यासारखं वाटतं आहे. वास्तवीक समाजसुधारणेची इतकी

उत्कृष्ट संधी मला स्वतःला आली असती तर, मी ती कधींही सोडली नसती. मी रानडे, आगरकर वगैरेंना ' बोलके सुधारक " म्हणून नावें ठेवण्यास मुळीच कमी केलें नाहीं. मला स्वतःला करता आली तितकी मी समाजसुधारणा केली. आतां माझ्या दोन्ही विधवा मुलींचे पुनर्विवाह मी लावून द्यायला पाहिजेत खरे, परंतु त्या वेडगुळ्यापुढे इलाजच चालत नाहीं; त्याला मी तरी काय करूं ! ती म्हणते कीं, तसं केलंत तर मी जीव देईन, आणि ती खरोखरच जीव देईल सुद्धा ! माधवराव, आपला विशेष परिचय आहे म्हणून बोलतों हो, पण मणिलेचें उदाहरण देऊन मी गेल्या आठवड्यात तिच्याशीं पुष्कळ युक्तिवाद केला, पण फुकट ! पालथ्या घागरीवर पाणी ! ती म्हणते कीं, माझ्या मुलींकडून तसं अन्मान घडणार नाहीं. मुलींपाशी गोष्ट काढतांच, ती साफ नाकारते. आपण स्वतः च तें स्वस्थपणे पाहिलं ना ? माधवराव तुम्ही माझ्यापेक्षा पुष्कळ लहान असलात तरी आतां पोक्त आहांत. तुम्हांला जास्त खोलांत शिरून सांगायला हरकत नाहीं. आमच्या हेमकल्याणीच्या घराण्याला Masochism नांवाचा एक रोग आहे. तुम्हांला तो माहीत नसेल, पण मोठा मजेदार रोग आहे तो. तो विशेषतः बायका ते सेरांग आणि पिरून पंचरांग ते चार्टांग या वर्षांत जडतो. त्याला इंग्रजींत

अडल्या नारायणाला काय कळणार. तो मुकाट्यानें ऐकूं लागला. दादासाहेब त्याला सांगूं लागले; " आता तुम्ही म्हणाल कीं, हा रोग फक्त पाश्चात्य बुद्धिमतानाच होतो तर तसेंही नाहीं. आपणाकडे अत्यंत प्राचीन काळापासून ऋषि, मुनि, तपस्वी, कवि, तत्त्ववेत्ते याना झाला होता, व अजूनही आमच्या महाराष्ट्रात विनायक कवि, गोविंदाग्रज वगैरेंचीं उदाहरणं ताजीं आहेत. त्याना खल ला रोगनिदान ओळखता आलं नसेल, व ह्यातापैकींही तीव्र बुद्धीचे हिंदु व मुसल्मान कवि ती गोष्ट कबूल करणार नाहींत. पण अचाट बुद्धीमार्गे तो रोग हटकून ठरलेला असतो. प्रत्यक्ष गांधींचे सत्यप्रयोग तरी हेंच शाबीत करतात सागायचं इतकंच कीं, माझ्या पोराना जरी तो लागला तरी मला चिंता नाहीं. पण मणिलालसारखा—

" क्षमा करा ! मला सरळ उत्तर देण्याऐवजीं माझ्या डु खावर डागण्या देऊं नका. वाटल्यास खुद्द गांधीशींच हा वादविवादाचा वापूस पिंजा, पण मला आपला एक सरळ जवाब द्या."

" आपण सुरेंद्राचं मन वळवलं तर माझी ना नाहीं."

" आणि बाईलीचं मन ? "

" तेंही तुम्हीच पहा—

" भवानी शंकर तेरसी एम्. एल्. सी. शेट जयशंकर दिवाटिया, आणि रा. रा. द्वारकानाथ सहस्रबुद्धे आले आहेत " चाकरानें पुकारिलें.

" येऊं दे त्याना इकडं " दादासाहेबांनीं हुकूम केला, व माधवरावांना म्हटलं कीं, " आज आपण एवढ्या प्रतिष्ठित मंडळींशी ओळख करून ठेवावी. आपलं बार्डोलीतलं काम फार नाजुक आहे. पुढं मागं या मंडळींची ओळख आपल्या कामीं येईल."

" Thank you very much. '

§ ३ पाचसहा मिनिटातच सगळी मंडळी जमली. त्यात तीन एम्. एल्. सी. होते, तीन सर्व बहादुर होते, चार रावसाहेब होते, गुजराथी दोन चार, व महाराष्ट्रीय दोन चार प्लेडर होते, कॉलेजचे प्रिन्सिपाल व एक प्रोफेसर होता, आणि चार पाच मुसल्मान व्यापारी होते. गुजराथी व्यापाऱ्यांपैकी पारख थोडे होते, पण होते त्यांनींही सबंध खादीचा पोषाख केला होता, आणि गांधी टो

घातली होती. सर्वांच्या शेवटी डी. एस्. पी. मि. एब्रहॅम पिग्हेड् हे आले. ते युरेशियन होते.

सर्वांची कॅ. माधवरावांशी ओळख करून देणे झाल्यावर, शेट शिवशंकर धरमसी म्हणाले,

" आपला मोठा मुलगा पत्नीसह अमेरिकेला गेला म्हणूनच ना ही आजची पार्टी ? पण ही जरा अगोदरच व्हायची होती. आम्हाला आपली सून दिसली असती. "

" मि. धरमसी ! " अडमुठे मोघे म्हणाले, " तो विषय या घरात वर्ज्य आहे. "

" का रे बुवा ? " धरमसींनी आश्चर्य दाखविलें. " त्यात वाईट असें काय आहे ? "

" आपणाला तें प्रकरण कळलं नाही का " मोघे म्हणाले.

" कळलं, पण त्यांत आपणाला वाईट काय दिसलं ?

" मि. धरमसी ! Let as drop it altogether " दादासाहेबांनीं सांगितलें. आजची पार्टी कॅप्टन मोघे यांचा सन्मान करण्याकरिता आहे. बार्डोलीप्रकरणात तरी ते मुंबईहून इथं येऊं शकले. "

" काय म्हणता ? " सगळे गुजराथी व्यापारी एकदम ओरडले, " मोघ्यांचीच का तुकडी बार्डोलीत आली आहे ? तर मग स्वदेशाच्या इभ्रतीच्या दृष्टीनं आम्हाला आजच्या पार्टीत भाग घेता येत नाहीं. दादासाहेब, क्षमा करा ? "

" दादासाहेब ! आम्हाला पण क्षमा करा ! " एकजात मुसलमान व्यापारी म्हणाले, ' आम्ही कॅप्टन मोघे याचा इनकार करतों. " असें म्हणून ते जाऊं लागले, त्यांच्या मागोमाग गुजराथी व्यापारीही जाण्यास तयार झाले. त्यामुळें चिडून मि. पिग्हेड् उद्गारले.

" काय हो एम्. एल्. सीज ! हाच का आपली व्यापाऱ्यावर हुकमत ? धड लोकमत पाठीशी नाहीं, कीं धड व्यापाऱ्यावर वजन नाहीं, अन् म्हणें, आम्ही लोकप्रतिनिधि आहोंत. "

" दादासाहेब ! " भवानी शंकर तेरसी एम् एल्. सी. म्हणाले, " हा आमचा अपमान करण्याकरताच का आपण आम्हाला आज बोलावलं ? यापुढें

मि. पिग्हेड् याना आमन्त्रण दिलं तर, आम्हाला देऊं नका अं ! मि पिग्हेड, 'We dont condescend to quarrel with pigs' ! ( आम्ही डुकराशीं भांडत बसत नाहीं. ) असें म्हणून सगळे एम्. एल्. सीज सुद्धा निघून गेले राहता राहिले प्रिंसिपॉल्, प्रोफेसर, कवि, ग्रंथकार, रावसाहेब व रावबहाद्दुर एवढेच. पैकीं कवि व ग्रंथकारही निघून गेले. त्यांनीं तर स्पष्ट सांगितलें की, आपणास पार्टीचें कारण अगोदर समजतं तर आपण तेथपर्यंत येण्याची तसदीसुद्धा घेतली नसती. ते जात असताना रा. महाशब्दे नांवाच्या कवीना दादासाहेब म्हणाले,

" मनोहरपंत, तुम्हीतरी जाऊं नका माझ्या या गुजराथच्या चाळीस वर्षांच्या वस्तींत, माझ्या घरात मायबोलीची तेवती ज्योत आपणच कायम ठेविली, आणि आता आमच्यांवर प्रसंग येताच आपणही निघून जाता, हें ठीक नव्हें. निदान तुम्हीतरी राजकारणापासून मराठी वाङ्मय दूर ठेवलं आहे. "

" पण म्हणून माझी लेखणी मी राष्ट्रहितशत्रूंना विकलीही नाहीं. आणि प्रसंग पडला म्हणून, दादासाहेब स्पष्ट बोलावं लागतं कीं, आपल्यासारखा टिळकाच्या अमदानींतला मनुष्य, आपल्या सर्वस्वाला सरकारच्या पायीं इतकं ठेवील कीं, राष्ट्रावर तोफा डागणाऱ्या राष्ट्रद्रोही माणसाला, त्याच उलट्या काळजाच्या पराक्रमाबद्दल अगाऊ ही पार्टी देईल. ही कल्पनासुद्धा मला सहन होत नाहीं. मी तुम्हाला आजपर्यंत तुमच्या राजकीय मताबद्दल अगर पक्षाविषयीं एका अवाक्षरानंसुद्धां दोष दिला नाहीं कीं, तुमची स्तुति केली नाहीं. तुमच्या अलौकिक बुद्धिमत्तेला, तुमच्या रसिकतेला आणि तुमच्या मायभाषाभिमानाला मी निरपेक्ष बुद्धीनं शिरसावंद्यच लेखलं आहे. पण आज—

" मनोहरपंत ! " दादासाहेबांची बुद्धिमत्ता चमकूं लागली, " क्षमा करा ! परंतु मला खरोखरच अजून वाटतं कीं, इंग्रजांशीवाय आम्हां हिंदवासीयांचें जगात चालायचंच नाहीं. मला टिळकाची तशींच गांधींचीही सगळीं मतं मान्य नाहींत, त्याला माझा उपाय नाहीं. मी माझी बुद्धि गांधींच्या लंगोटीला टांच लाऊं तयार नाहीं. "

" पण गांधी तरी तुमच्यापाशीं तुमची बुद्धि मागण्याकरता कधीं आले होते ? " जटाशंकर कविराजांनीं दादासाहेबांना विचारिलें.

" आणि दादासाहेब, " महाशब्दे म्हणाले, " इंग्रज नव्हते तेव्हा, आम्ही जसें कांहीं भुकेनें मरत होतों; आम्हाला पांघरायला भरपूर वस्त्रं नव्हतीं कीं आमच्या डोक्यावर छपरंदेखील नव्हतीं ! "

" होतं; तें सारं होतं. " दादासाहेब म्हणाले, " पेशवाईत सुरक्षितता कांहीं तरी उरली होती का, " इंग्रजांनीं बाजीरावापासून गादी घेताच हिंदुस्थानभर सगळ्या रयतेनं त्याना दुवाच दिला ना ? "

"ती राष्ट्राची नवज्वरानंतरची, पहिल्या उसाशानंतरची भाषा होती. त्यावेळीं डॅक्टर कोणीही व कसाही असो; तो परमेश्वरतुल्यच वाटतो. परंतु खडराडीत ताजेतवानें होऊन राष्ट्राच्या रिंगणात उतरण्याची तयारी होऊन सुद्धा हा डॉक्टर जर आमचं घरच सोडीत नाहीं तर कोणत्या रोग्याला आपले प्रथमचे धन्योद्गार बाधक आहेत असं वाटेल ? "

" तुम्ही असं धरून चालता, मनोहरपत, कीं, आज हिंदी राष्ट्र जागृत झालं आहे. अहाहा ! तो सुदीन येईल का ? हिंदुस्थानला सर्व राष्ट्रपरिषदेत स्वतंत्र राष्ट्राचें मत मिळेल का ? बंधूंनो ! तुम्ही मला मवाळ म्हणा कीं, काय वाटेल म्हणा, पण तसा दिवस खाचित खचित उगवणार, मात्र गांधींच्या उपायानीं खास नव्हे, तर अत्यंत सुसंस्कृत व स्वतंत्रतेचें माहेरघर अशा इंग्लंडच्या दोस्तीनेच मिळणार ! "

" पठाणानीं बार्डोलींत स्त्रियावर हात टाकले ! ते स्त्रियापुढें नागवे उभे राहिले ! " वर्तमानपत्रें विकणारीं पोरें खालीं ओरडूं लागलीं.

" बघा ! दादासाहेब बघा ! " महाशब्दे गर्जना करून ओरडले, " ज्या दोस्तावरून प्रत्यक्ष गृहलक्ष्मींची अब्रू भर चव्हाठ्यावर घेण्यात येते, त्या दोस्तावरून आम्हाला स्वराज्य मिळणार तर नाहींच, पण मिळालं तरी ते पातकी स्वराज्यसुद्धां आम्हाला नको; कारण तेंही आमचा घात करण्याकरताच देण्यात येईल. "

" मि. पिंग्हेड ! " दादासाहेबाचा आवाज एकदम खालीं पडला, " ही बातमी काय म्हणते ? "

" कांहीं तरी तुमच्याच लोकाची कारवाई असेल. पठाणाना नागव्यानं स्नान करण्याची संवय असते. त्यामुळें कांहीं तरी गैरसमज होऊन, गांधींनीं—

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

" गांधींचे नाव काढूं नका ! " दादासाहेब आवेशानें म्हणाले "तो महात्मा कधींसुद्धा खोटें बोलणार नाहीं. "

" तो नाहीं, त्याचे साथीदार ! ते काहीं नाहीं; कॅप्टनसाहेब, " Now it is you who are to save our Nation from anarchy. "
" Of course ! " माधवरावनींही दुजोरा दिला. " दादासाहेब ! तुम्हीं मवाळसुद्धा ब्रिटिश साम्राज्याचे प्रबळ शत्रूच आहात ! " असें ओरडून ते आणि डी. एस्. पी. निघून गेले.

" घ्या हें बक्षीस ! दादासाहेब ! " जटाशंकर म्हणाले व गेले.

" अहो ! अजून तरी रावबहादुरी सोडा ! " उमय्या भाटे म्हणाले, व जटाशंकरच्या मागें गेले. कवींपैकीं महाशब्दे मात्र एकटे राहिले. त्यांना रावबहादुर क्षेमकल्याणी म्हणाले;

" गांधी महात्मा खरे ! पण सैतान कीं साधु ? "

आणि जगाचिया सुखोद्देशें ।
शरीर वाचा मानसें ॥
राहाटणें तें अहिंसे ।
रूप जाण ॥ १६–११४ ॥

श्रीज्ञानेश्वर

§ १ ज्या कॅप्टन माधवराव मोघे याकरिताच दादासाहेबांनीं पार्टी दिली होती, ते मोघेच निघून गेल्यावर पार्टीचा बेरंग झाला हें सांगणें नलगे. नंतर यार्कोच्या रावबहादुर रावसाहेब प्रोफेसरांनींही आल्यासारखें चहापान वगैरे करून यजमानाचा निरोप घेतला. जातेवेळीं एका रावसाहेबांनीं मात्र हळहळ दाखविण्यास कमी केलें नाहीं ते म्हणाले,

" दादासाहेब ! तुमच्या या राजकारणाच्या उठाठेवीनें आमची आज शॅंपेन बुडाली बुवा ! "

" मला हेंच समजत नाहीं; " एक रावबहादुर उद्गारले; " कीं आम्हां हिंदूंना राजकारण हवं तरी कशाला ? खावं, प्यावं, चैन करावी हें आपलं काम. मग राज्यकर्ते कोणी का असतनात; इंग्रज असोत कीं, फ्रेंच असोत.

पण दादासाहेबांनीं त्यांच्या त्या मदिराप्रियतेकडे व जिभल्या चाटीकडे लक्षच दिलें नाहीं. पाहुणेमंडळी परत गेली तशी त्यांनीं आपल्या लायब्ररींत दडी मारिली; ते चांगले दोन तास बाहेर आले नाहींत ' आपली जगात आता नाचक्की होऊं लागली आहे " मार्केटव्हॅल्यू "मध्यें रावबहादुरांची, युद्ध प्रसंगातल्या जर्मनमार्क इतकी किंमत उतरत चालली आहे; हें पाहून त्यांना फार दुःख झालें. ज्या पदवीला, खरेंच सांगावयाचें म्हणजे, त्यांनीं धर्मपत्नीपेक्षांही जिवापलिकडे जपून ठेविलें होतें. ती पदवी १९२१ च्या असहकारितेच्या वेळेपासूनच निवलच्या नाण्याची होती चालली होती; परंतु त्यावेळीं त्यांना तें खरें वाटलें नव्हतें. नंतर १९२२ चा बार्डोलीचा बार फुसका होऊन, केळकरजयकरादिकांच्या " स्वराज्यपक्षामुळें म्हणा कीं, आणखी कांहीं अवांतर कारणामुळें म्हणा, महात्माजींच्या कीर्तिसागराला ओहोटी लागलेली पाहून, क्षेमकल्याणींना तर आपल्या पदवीचा " सॉव्हरिन् " दुर्मिळ वाटूं लागला होता. आणि फिरून १९२८ च्या त्याच बार्डोलीनें चांगलीच उसळी जरी मारिली होती, तरी आपल्या दोन्ही मुलांच्या अलौकिक बुद्धितेजान, त्यांच्या मार्फत येणाऱ्या अलोट संपत्तीमुळें व सरकारदरबारच्या अधिकारोत्तम मानमान्यतेमुळें त्यांना आपल्या पदवीची ध्येयप्राप्ती हातीं पडल्यासारखें झालें होतें. फार झालें तर गांधीजींची चळवळ यशस्वी होऊन, सरकार पै दोन पयांनीं बार्डोलीचा शेतसारा कमी करील; पण त्यामुळें आपल्या पदवीला आणि धनसमृद्धीला यत्किंचित् सुद्धा

खार बसणार नाहीं; असा त्याचा, चालू चळवळीविषयीं दृष्टिकोण होता. परंतु दैवगति पहा, कशी विलक्षण फिरूं लागली. ज्या कोटनारायणाची कोटींची जिंदगी आपल्या घरात येऊन आपला तेजस्वी मृगेंद्र " मानधनप्रभु " होणार अशी त्याची खात्री होती, ( कारण तें जांभूळ अगदीं त्याच्या ओठावर येऊन पडलें होतें, आता तें खाऊन गिळण्याचाच काय तो अवकाश होता, ) नेमक्या त्याच कोटनारायणामार्फत महात्माजी त्याच्या प्रत्यक्ष घरात घुसले, व ते जांभूळ सर्वस्वीं त्याच्या हातून महात्माजींनींच हिसकावून घेतलें अशी त्याची तगमग होऊन राहिली होती. कोटनारायण कोटीसह व कन्येसह त्यांच्या आश्रमात तर जाऊन राहिलाच, पण प्रत्यक्ष आपला स्वतःचा पोटचा गोळादेखील त्या सैतानानें आपल्या घरातून कायमचा काढून आपल्या साबरमतीच्या Hell—

ही हेलची कल्पना अतिशय भयंकर होती. ती त्याच्या त्या बुद्धिग्रस्त पाढऱ्या केशाच्या डोक्यात येताच, त्यानें त्यांनाच भयानें पछाडिलें. गांधींना सैतान व त्याच्या आश्रमाला Hell म्हणणारे आपण तरी काय किंमतीचे आहोंत अशी त्याची आत्मपरीक्षा सुरूं झाली. दादासाहेब क्षेमकल्याणी कितीही मवाळ मताचा मनुष्य असो, त्याचीं सामाजिक मतें कितीही जहाल असोत, व त्याची इंग्रजाबद्दल कितीही प्रामाणिकपणाची आपूलकी असो, ते बुद्धिमान् होते यात शंकाच नाहीं, आणि जेथें अलौकिक बुद्धिमत्ता आहे, तेथें निदान एकातात तरी आत्मपरीक्षा होतेच होते. बुद्धिमत्ता जर खरोखरच तेजस्वी असली, तर ती अहंकारानें दूषित होऊनही, प्रतिरोधाच्या धपक्यामुळें मधून मधून तरी अंतर्मुखी होतेच होते. त्याप्रमाणें महात्माजी व आपण स्वतः याची तुलना दादासाहेबांच्या बुद्धिचक्रात सुरूं झाली.

त्या तुलनेंत कोणते विचार त्याना सुचले कोणास माहीत, पण त्याना थोडेंसें समाधान वाटल्यासारखें दिसलें खरें, आणि पुढें पुढें तर त्याचा काहीं तरी निश्चय झाला असला असेंही भासलें त्यानीं आणखी पाचसात मिनिटें विचार केला, व नंतर चटकन् ते आपल्या टेबलापाशीं गेले व एक तारेचा फॉर्म काढून लिहू लागले,

Want a most private interview immediately provided Mrigendra is not even hinted at.

Kshemakalani.

ही तार त्यानीं तावडतोब साबरमती आश्रमाला गांधींकडे करविली, आणि ते प्रवासाची तयारी करूं लागले. घरची "मॉरिस" कार तयार होतीच. अर्थातच आपण कुठें जाणार आहोंत हें त्यांनी कोणालाही कळू दिलें नाहीं.

§ २ दादासाहेबांच्या अपेक्षेप्रमाणें महात्माजींकडून होकार आला, व दादासाहेबही तावडतोब दुपारींच निघाले. बाहेर आजिरात ऊनच होतें असें नाहीं; आकाशात मधून मधून ढगदेखील येत. परंतु उष्मा फार होई. अर्थातच मोटारमध्यें वारा येई. परंतु दादासाहेबांना तो बाहेरचा वारा, वयोमानानुसार सोसवेना; म्हणून त्यानीं मोटारचे पडदे सोडवून खिडक्या बंद करवल्या होत्या, आणि आतला ' इलेक्ट्रिक फॅन ' सुरू केला होता. अशा रीतीनें, Upton Sinclair ची Love's Pilgrimage ही कादंबरी वाचीत वाचीत, दादासाहेब सायंकाळीं अमदावादेजवळ जाऊन पोंचले. इतक्यात पाऊस पडण्यास सुरवात होऊन दहा मिनिटात जिकडे तिकडे जलमय होऊन गेलें. पुढें पुढें तर पावसाचा इतका जोर झाला कीं, दादासाहेबांची "मॉरिस" देखील एका वडाखालीं थांबवावी लागली. ती थांबून एक मिनिट होत नाहीं तोंच एक गरीब बाई शोफरला, आपणास मोटारींत घेण्याची विनवणी करूं लागली. त्यानें तिला अर्थातच धुडकावून दिलें. परंतु प्राणरक्षणाकरता त्या बाईला त्याची पायधरणीहि करण्याशिवाय अन्य उपायच नव्हता. कारण आता वारक्या वारक्या गाराही पडण्यास आरंभ झाला होता, मागच्या वरसातींतला जलप्रलय श्रीमंत लोकसुद्धा विसरले नव्हते, तर गरिबाची गोष्ट कशाला? म्हणून त्या बाईनें झाडाच्या आश्रयानें उभ्या असलेल्या त्या मोटारच्या शोफरला काकुळतीनें आपणास आत घेण्याचा जवळजवळ तगादाच चालविला. तो तिच्याकडे पाहून हसून "चल जाव" म्हणे, व ही "ल्वोजी" या शब्दाची माळ ओढी. शेवटीं प्रकरण इतकें निकरावर आलें कीं, एवातेवीं आपण जर मरणारच तर, काकडून मरण्यापेक्षा मोटारखालीं चेंगरूनच मरू अशी तिनें धमकीच दाखविली. त्या धमकीला दाद देणारा शोफर तर नव्हताच. परंतु दादासाहेब सुद्धा नव्हते, परंतु दादासाहेबांना, त्या वादळांतून, तिची ती धमकीच प्रथम तिला ऐकूं गेली, व आपण येथूनच गांधींच्या मार्गी सत्याग्रहात शिरलों आहोंत, अशी एक उपरोधिक कल्पना त्याना सुचली. तसे ते हसले, व पडदा दूर करून खिडकीच्या

तावदानातून त्यानीं त्या बाईकडे पाहिलें. बाई तरुण, गोरी पण दारिद्र्यामुळें सुरकुतलेली होती. तरी पण दादासाहेबांना masochism चा तिसरा, उतार-वयातला झटका आला. त्याना मृच्छकटिकातल्या " अंगें भिजली जलधारानीं " ची आठवण झाली. बाईच्या पोषाखावरून ती गुजराथी नसून देखणी–देखणी तर होतीच होती–दिसत होती. तेव्हा तिला आश्रय देण्यात आपण प्रान्ताभिमान ही दाखवीत आहोंत असें त्याना वाटलें. त्यांनी तिला आपल्याच बाजूच्या गादी-वर बसण्यास सांगितलें. तिनें तें नाकारिलें. तरी ती शोफरजवळ बसण्यासही नाखूष होती. म्हणून ती दादासाहेबांच्या पायाचींच पण विरुद्ध बाजूच्या दारा-जवळ खालीं बसली. दादासाहेबांनीं शोफरच्या मागला पडदाही खालीं टाकला, व नंतर अमदाबादेस जाईपर्यंत दादासाहेबांचा वृद्धापकाळचा " रोमान्स ' झाला. त्यात एक खरें कीं, त्या बाईनेंही त्याना गोड बोलूनच थेटपर्यंत चालविलें, आणि शेवटीं ती जशी उतरून निघून गेली, तशीं " द्राक्षं आंबट " म्हणण्यासारखी या म्हाताऱ्या जंबुकाची गत झाली ! मात्र " मी आपणास स्वस्तच भेटेन अं ! अशी तिनें उतरताना खात्रीची वाणी काढिली होती, त्यामुळें द्राक्षें लवकर पिकून, आपल्या ओंठावर आपण होऊन येण्याची त्या कोल्ह्याला थोडीतरी आशाही होतीच. कांहीं असो, डोंगराद्ऱ्यांविना अशा त्या लोण्यासारख्या मृदु प्रातान, आजचा प्रवास अगदींच कांहीं निरस झाला नाहीं, याचें दादासाहेबांना बरें वाटलें !

§ ३ अमदाबादेला मुलाकडे जेवणखाण करून, शेट गोवर्धनदास सुकड याज-कडे, एका विशेष कामाला जात आहोंत, विशेष उशीर झाला तर कदाचित् तिकडेच निजूहीं, अशी बतावणी करून, दादासाहेब प्रथम खरोखरच त्याच्याकडे गेले, व त्याच्याशीं नुसते नमस्कार चमत्कार करून, ते तेथून थेट साबरमतीच्या गांधी–आश्रमात गेले, त्यावेळीं रात्रीचे दहा वाजून गेले होते. आश्रमात बहुतेक ठिकाणीं निजानीज झाली होती. सायंकाळचा पाऊस तेथेंही पडून गेला होता. तरी आश्रमात, दाहराप्रमाणें, मुळींच घाण नव्हती. रस्ते अगदीं, मुंबईच्या क्वीन्स रोडप्रमाणें तकतकीत नव्हते, किंवा त्याप्रमाणें येथल्या रस्त्यावर दिव्याचा लखल-खाटही नव्हता. परंतु वाटसरूंचा पाय खड्ड्यांत पडून दुखवणार नाहीं, किंवा त्याला दोन पादत्राणें घाणीच्या चिखलामुळें अनुभवावीं येणार नाहीं, अशा नीट-

नेटकेपणा, त्या आधुनिक ल्हानशा जाबाली–आश्रमात दादासाहेबांच्या प्रत्ययाला आला. त्या आश्रमात दादासाहेबांचें पाऊल आज प्रथमच पडत होतें, आणि ते इतरत्र कितीही वाकडें पडून मुरगळले असलें, तरी येथें त्याची ती नेहमीची संवयसुद्धा तें विसरून गेलें; फार कशाला, त्यांच्या सायंकाळच्या " रोमान्सची " सुद्धा त्याना आठवण नव्हती. ते गांधींच्या पर्णकुटींत गेले त्यावेळीं गांधी त्यांचीच वाट पाहात होते. दादासाहेब आत शिरताच—त्याना गांधींची पर्णकुटी एका पोक्त गुजराथी बाईनें दाखविली होती; ती गांधींचीच पत्नी असेल असें दादासाहेबांना वाटलें—गांधींनी उठून त्याना नमस्कार केला; व आपल्या समोरच्या एका चौपायीवरील चटईवर बसविलें चटईवर एका अत्यंत स्वच्छ असा सुंदर खादीचा पलंगपोस अंथरला होता. गांधी स्वतः खालीच एक चटईवर बसले होते. त्यांच्या पुढें एक लाकडी उतरतें मेज होतें; व त्यावर सर्वप्रकारचें लेखनसाहित्य होतें, पर्णकुटी कोठेंही गळत नव्हती.

" मी शेगडा पेटवूं काय ? " गांधींनी विचारिलें.

" आपणच पेटवणार काय ? "

" हो. " असें म्हणून महात्माजींनी लगेच तसें केलें व दादासाहेबांना विचारिलें; " आपण आमच्या आश्रमात प्रथमच आला आहात; नाहीं ? " असें विचारता विचारता त्यांनी एका पितळी ताटलींत थोडीशीं चिकूचीं व अंजिराचीं फळें दादासाहेबांना दिलीं; आणि गाईचें दूध शेगडीवर ऊन करण्यास ठेविलें. दादासाहेब त्याना म्हणाले.

" आपण कशाला श्रम घेता ! मी अमदावादेहून जेऊनच निघालों आहें. आता एखादें फळ घेतों; व मी हा थरमॉसमध्यें चहा आणला आहे, तोच अमळ-शानें घेईन म्हणजे झालं. मला दूध अलीकडे पचत नाहीं. ( हंसून ) मी आपणा-पेक्षा सहासात वर्षांनीं मोठा आहे. "

" तुमचं वयानंच ना ? मानानं, बुद्धीनं व तपश्चर्येनंही आपण माझ्यापेक्षा मोठे आहात, आपण आलात; मला मोठा आनंद झाला. "

नंतर थोडा वेळ दोघेही स्तब्ध बसले. मग दादासाहेबांनी मेजाकडे बोट करून म्हटलें, " काहीं लिहीत होतां वाटतं ! "यंग इंडिया"चं आर्टिकल ! "

" नाहीं. 'सत्याचे प्रयोग' लिहीत होतों. तें काम मी पहाटेच्यावेळीं करतों. "

" आपण त्या पुस्तकात फार लिहिता बुवा. टीका करूं ना ? "

" काय हरकत आहे ? "

" एक तर आपण अतिशय लिहिता, आणि सागूं नये तें सागता. Sense of Proportion आणि Sense of Decency हीं दोन्हीं आपल्या आत्मचरित्रात सापडत नाहींत. आमच्या नरसोपंत केळकरानीं टिळकाचं चरित्र असंच भारुडानं भरल आहे. त्यापेक्षा मला दादासाहेब पाध्याचं टिळकाविषयाचं Appreciation आवडलं. पुस्तक कसं आटोपशीर व मुद्देसूद असावं. "

" मला आपलं म्हणणं मान्य आहे. "

" मग तस करीत का नाहीं ? गाधी, मला तुमचा या दाभिक—क्षमा करा अं "

" क्षमा कसली ? बोला कीं, दादासाहेब, आपण अगदीं मन मोकळं करून बोला. "

" मला आपलीही चूक कबूल करूनही ती सुधारण्याची वृत्ति दाभिकपणाची वाटते, हें पुस्तकाचं सोडून द्या, एकवार. पण Practical Politics मध्यें सुद्धा आपण तसच वागता, हें काहीं चागल नाहीं. आपणास जर खरोखरच आत्मचरित्राविषयीं, आपण चुकलों, असं वाटत असेल, तर ती चूक सुधारणं हें आपल कर्तव्य नाहीं काय ? "

" अलबत आहे पण " सत्याचे प्रयोग " हे अगोदर सत्याचे प्रयोग आहेत, व नंतर आत्मकथन आहे. आपण Confessions of Rousseau हें पुस्तक वाचल असेलच. "

काय असेल तें असो, दादासाहेब घोटाळले खरे. त्याना प्रश्न विचारणारा मनुष्य, महात्माजी खेरीज दुसरा कोणी जरी असता, तरी त्यानीं चापून " हो वाचलं " हेंच उत्तर ठोकून दिलें असतें पण तें पुस्तक त्यानीं पाहिलें सुद्धां नव्हतें, आणि गाधीपुढें खोटें बोलताही येईना. एक तर नक्कीच कीं, त्या महात्म्यापुढें असत्य कथन करण्यास ते घाबरलेच, पण त्याना तेथें तसें करताही आलें नसतें. कारण महात्माजीनीं त्यास, दोन चार प्रश्नातच खोट्याचें माप दिलें असतें. इतराशीं बोलताना ते अशा पेचींत सापडत नाहींत, पण इतराच्या मतांचीही

दादासाहेबांना पर्वा नव्हती; पण येथें तीं लटपट चालेना. तेव्हा त्यांनीं महात्माजींचाच, लहानपणा पदरीं घेण्याचा भाव आणून म्हटलें,

" नाहीं. मी तें पुस्तक वाचलें नाहीं. "

" मग तें अवश्य वाचा, अशी मी आपणास शिफारस करतों. मी टिळकांचीं काहीं इंग्रजी चरित्रें वाचलीं; व केळकरांच्या चरित्राचाही दिवेकरानीं भाषांतर केलेला भाग वाचिला; व इतर भागही मराठींतून वाचला. मला मराठी फारसं कळत नाहीं. पण मला वाटतें कीं, मराठी वाङ्मयात केळकरांच्या टिळकचरित्राला फार मोठें स्थान असेल. इंग्रजींतल्या मोर्लेच्या ग्लॅडस्टन चरित्राची आठवण होते. खरं म्हणाल तर टिळक व केळकर, विशेषत: त्यांचा केसरी यांची मराठी भाषा इतकी जोरदार व सुंदर आहे कीं, तितकी जर आमची गुजराथी भाषा जोरकस होईल तर आम्हाला अत्यानंद होईल."

" दादासाहेब, आपण दोन्ही भाषा उत्तम जाणता, मग आपणच का तें काम करीत नाहीं ? "

" आता माझें वय गेलें, बरें ते असो. मी ज्या कामाकरिता आज मुद्दाम आलों त्याविषयीं बोलूं या. पण इथं अगदीं एकांत आहे ना ? आपली पत्नीसुद्धा नको. "

" ती इथं नाहींच. आजच ती बार्डोलींत गेली आहे. "

" स्त्रियांनीं सत्याग्रहात जोरानें भाग घ्यावा एवढ्यावरता का ? " दादासाहेबांनीं नापसंती दाखवण्याच्या आवाजानें म्हटलें.

" हो. "

" त्याविषयीं मी आजच्या या मुलाखतींत बोलणार आहेच. पण आपल्या झोंपडींत, बाहेर पोक्तशी बाई कोण आहे ? "

" ती कस्तुरीची मोलकरीण आहे. "

" कस्तुरींची झोपडी नजिकच आहे का ? "

" आपलं भाषण कोणालाही ऐकूं जाणार नाहीं. तुम्ही बिनधास्तपणें बोलावं."

" त्याचप्रमाणें आपल्या आजच्या मुलाखतींविषयीं एक शब्दही आपण कोणाजवळ बोलूं नये, अगर त्याविषयीं कोठें लिहूंही पण नये. "

## महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

" देशहितविघातक असं जर काहीं त्यांत असेल, तर मी तसं वचन आपणास देऊं शकत नाहीं."

" कबूल, पुष्कळसं खासगीच आहे पण त्याला आपणच सार्वजनिक रूप देऊन टाकलं आहे, पण तें असो. प्रथम मला असं सांगा कीं, आपणाला खरोखरच असं वाटतं का, कीं रणसंग्रामाशिवाय, ब्रिटिशांना येथून हुसकून देण्याचा अन्य उपाय आहे ? "

" दादासाहेब ! प्रथम हें दूध घ्या कीं, मग आपण शांतपणे बोलूं."

" मला नको. मी चहाच घेतों, आपण दूध घ्या कीं."

" ठीक आहे." गांधींनी मग दूध गाळून घेत घेत म्हटले, " मला, ब्रिटिशांना हुसकून देण्याची बुद्धि कधींच सुचली नाहीं. त्यांनी, परवडल्यास येथें नोकर म्हणून रहावं कीं."

" पण सार्वभौमसत्ता गाजविणारे सत्ताधीश, नोकर म्हणून कसे राहतील ? "

" काय झालं न राहिला ? मराठी साम्राज्याचे, तुम्ही क्षेमकल्याणी जहागिरदार, मुरतेला वीस वर्षं कॉलेजात नोकरच होता ना ? आणखी मी तुम्हाला सांगतो कीं, तुम्ही आज पूर्व वैभवानं मनातल्या मनात चडफडता तरी, पण उद्यां प्रसंग पडला तर हे आजचे इंग्रजी अधिकारी, याच सुरतेला, फिरून वखारी घालून थोडा किफायतशीर व्यापार करण्यांतही आनंद मानतील."

" शक्य नाहीं. जिथं साम्राज्य गाजवलं तिथं तें विसरून जाणं सोय नाहीं."

" कोणाला, इंग्रजांना नव्हे. अमेरिका हातची गेली. काय त्यांना वाईट वाटतं, सांगा बघूं ? "

" पण त्याचवेळीं ब्रिटिशांना हिंदुस्थानचं राज्य मिळालं होतं."

" खोटी गोष्ट ! १७८२ सालीं अमेरिकेचं स्वातंत्र्य जगानं कबूल केलं, आणि त्याच सालीं, इकडे वॉरन् हेस्टिंगच्या अनन्वित जुलुमामुळें बंगालची जहागिरी ही हातची जाते कीं काय अशी त्यांना भीति होती, शिवाय १७८२ सालींच तुमच्या महादजी शिंद्यानं रजपुतांचा चुराडा उडवून, मराठेच साऱ्या हिंदुस्थानचे सम्राट् होणार असं साऱ्या जगाला वाटावयाला लागलं होतं. दादासाहेब, एक गोष्ट मी तरी कालत्रयीं विसरणार नाहीं, ती ही कीं, १८ व्या शतकांत मराठ्यांचा दरारा नसता, तर, बंगालचा, कायमचा शेतसारा तर जगताच मिळाला, पण अखिल हिंदुस्थानमध्यें जीं सहासातशें लहानमोठीं हिंदी संस्थानें

आज दिसतात, तींही दिसती ना. एवढंच नव्हे, तर अजून सुद्धा जी धाकधुक ब्रिटिशांना वाटते ती त्या वेळच्या मराठ्यांच्या दराऱ्यामुळेंच होय. "

" आपण महाराष्ट्राला हा जो मान देता त्यामुळं मला आनंद होणें स्वाभाविक आहे; पण त्यावरोबर आता तो अभिमान निव्वळ निराधार म्हणजे पोकळ आहे, अशी माझी खात्री आहे. अहो फार लांब कशाला जा; खुद्द आपणदेखील बार्डोलींत महाराष्ट्रीय स्वयंसेवकांना घेत नाहीं. जे थोडेसे दिसतात ते गुजराथेंतलेच माझ्या सारखे; मराठी गुजराथीच आहेत. खरं ना ? "

" याचं कारण पण वेगळं आहे. एक तर, हिंदुस्थानच्या आजपर्यंतच्या अनेक स्वातंत्र्ययुद्धांत गुजराथेनें कधींच स्वतंत्ररीत्या नांव मिळविलं नाहीं; तें त्यास मिळावं, ही इच्छा; पण तीही इच्छा का ? तर चालू स्वातंत्र्ययुद्धांत जी अनत्याचारीपणाची संवय, ती बार्डोलींतल्या गुजराथ्यांना, मजबरोबर दक्षिण आफ्रिकेंत लागली आहे. इतर कोणत्याही प्रांताला ती अजून लागली नाहीं. मग त्यांना जें तूर्त करता येणार नाहीं तें त्यांना कसं सांगावं ? त्यानं कार्यही सिद्धीस जाणार नाहीं. १९२२ सालीं खुद्द बार्डोलीचीही माझी खात्री नव्हती. "

" आता आपण खऱ्या मुद्यावर आलों. " दादासाहेब, म्हणून, सर्व जगात माझी छी थू होणार, हें माहीत असूनही, मी माघार घेतलीच ना ? पण इतकं करूनही मी इतिहासाचे धडे विसरायला मात्र तयार नाहीं " जरा आसन सावरून व थोडेसे पुढें सरकून म्हणाले, " गांधी ! अनत्याचार व अहिंसा यांची आपली मीमांसा, सगळीची सगळी, लक्षात घेऊनही, मी आपणास असं विचारतों कीं, स्वराज्यप्राप्तीला तें साधन म्हणून उपयोगी पडेल ? कीं राष्ट्रांतलं अमूल्य रक्त त्या पायीं व्यर्थ सांडलं जाऊन, आमच्या राष्ट्राला कायमचं खच्ची करण्याकडे त्या एकाडी तत्त्वाचा उपयोग होणार ! मला माझा आपणाविषयींची अती तिटकारा दाखवून एकदा तरी, आपणाजवळ अगदीं एकांतांत हेंच आज मुख्यतः सांगायचं होतं कीं, गौतमबुद्धानं जें तेज खच्चून ठार मारण्याचं राष्ट्रविध्वंसक कार्य दोन अडीच हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानात केलं तेंच आपण आता, स्वामी विवेकानंदासारख्या, लोकमान्य टिळकांसारख्या, अहो फार काय ? पण आमच्या सावरकरांसारख्या ज्वालाग्राही नरपुंगवानीं उत्पन्न केलेल्या धुगधुगीलाही पिच्छन, भलत्याच घाणेरड्या

तत्त्वानें जागच्या जागीं, ठार मारण्याचें दुष्ट कृत्य, आपण करीत आहांत ! आपणांकडून तें चुकून होत आहे, अशी मी परवा परवापर्यंत माझ्या मनाची कशी बशी समजूत करून घेत होतों. परंतु जेव्हा प्रत्यक्ष माझ्याच बहुमोल हिऱ्याला, माझ्या मृगेंद्राला—

दादासाहेबांच्या नेत्राला स्वाभाविकपणेंच पाणी आलें; तें त्यांनी चटकन् रुमालानें पुसून टाकलें, व पुढें गद्गदित कंठानें म्हटलें;

" गांधीजी ? मृगेंद्राविषयीं एक अक्षरही बोलावयाचें नाहीं, अशी मीच आपणास अट घालून मीच ती मोडीत आहे हें मी जाणून आहें; पण माझा आता उपाय चालेना. पितृहृदय; पितृहृदय. पण माझ्या मृगेंद्रापेक्षां अधिक उत्तम उदाहरणही मला, अहिंसेचा बळि, म्हणून देण्यास सांपडेना, हेंही तितकेंच खर आहे. "

दादासाहेब थोडा वेळ थांबले; पण एखाद्या स्फूर्तिमग्न कवीप्रमाणें त्यांची स्थिति झाली होती. त्यांचें सर्वांग लटलट कांपायला लागलें. तसेंच आवेशानें उठले, व खड्या सुरांत म्हणाले,

" गांधीजी ! आपण महात्मे आहांत हें मीसुद्धां कबूल करतो परंतु सर्व देवदूतांत सैतानांचीच थोरवी मोठी असते हें देखील मी आपणांस कळवकून सांगतों. माझा एकच मुलगा कशाला, दोन्ही मुलगे नव्हे, मी स्वतांही, माझ्या सर्वस्वांसह या राष्ट्राच्या स्वातंत्र्याकरता बळि जाऊन जर परमेश्वर आम्हांस राष्ट्रस्वातंत्र्य देत असेल तर या क्षणीं, प्रत्यक्ष हालहाल होऊनही मरण्यास तयार आहे; तर मग चुटकीसरसा मरण्यास कां बरं तयार होणार नाही ? पण गांधी, ज्या तत्त्वाच्या एकांडेपणानें मी प्रत्यक्ष माझ्या पोटांतल्या चांगल्या पोरांची अंडेखची–या ग्राम्य शब्दाची माफी करा. पण त्यापेक्षां अन्य शब्दच जोरदार नाहीं–केली नसी स्थिति शेंकडों तरुणांची तुम्ही आज करतां; आणि पुढें जर कां प्रत्यक्ष रणसंग्रामाचा प्रसंग आला; आणि तो येणारच येणार, ते आंडिल घोडे खामल्या काळ व भुईला भारच होणार ना ? तुम्ही आम्ही मरून जाऊं. तुमचा आमचा संसार होऊन गेला व उरलेल्यांचेही थारण म्हातारे आपल्या परीनें गुजराण करतोंच आहोंत. मी पेन्शन खातों; तुम्ही मॅक्मिलन् कंपनीला पुस्तकं विकत देऊन पैसे मिळविता ! माझ्या कुटुंबासाठीही अनेक गरजा आहेत, आणि गरजांची संख्या कमी केली आहे. परंतु तो प्रश्न आर्थिक स्वरूपाचा आहे; आणि

त्याविषयीं मला आज साल सोलावयाची नाहीं,व आपणहीं,त्या कापसाची पिंजणी करूं नये. माझी आपणास, निवळ तात्त्विक अहंकार सोडून, हा तरुणांचा माजोरीपणा एकदम थांबविण्याची, राष्ट्रहित व व्यक्तिशः हित अशी दुहेरी विनंती आहे. "

दादासाहेबाना बोलण्याच्या श्रमानें दरदरून घाम आला. हें पाहून गांधींनीं उठून आपल्या उपवस्त्रानें त्याचा घाम पुसून टाकिला; त्यास नीट खाटेवर बसविलें; त्याना स्वच्छ व गार असें पाणी पिण्यास दिलें, व स्वता ताडाच्या पंख्यानें त्याना वारा घालून बोलण्यास आरंभ केला;

" दादासाहेब, आपणास सिग्रेट् ओढण्याची संवय आहे हें मला माहीतें आहे व आपण बेलाशक ओढा, माझ्या आश्रमाचा तो कडक नियम मी आपणाकरता तूर्त मोडण्यास तयार आहे. "

" Thank you ! " दादासाहेबांनीं उत्तर दिलें. " पण मलाहीं आपणास दाखवायचं आहे कीं, हृदयाच्या जळजळीपुढें व्यसनाची मातबरी नसते. मी व्यसनाचेंही व्यसन आहे. व्यसनें माझीं आहेत. मी व्यसनाचा नाहीं. " " आनंद ! आनंद " गांधी हात जोडून म्हणाले. " दादासाहेब ! आपल्या या हृदयाच्या जळजळींत निघालेल्या वचनाच्या श्रवणानं कोणता अधम पुनीत होणार नाहीं ! मला लोक महात्मा म्हणतात, व आपणास मवाळाग्रणि ही निंदावाचक संज्ञा देतात; पण या संज्ञा फोल होत. खरं तेज हृदयाच्या जळजळींतच असतं. ज्या स्वार्थत्यागाच्या दैवी गुणानं मराठ्यांनीं, राष्ट्राच्या कमालीच्या औदासिन्यातही प्रत्यक्ष साम्राज्यसूर्याचीं किरणं लंडन शहरापर्यंत विकसून टाकिलीं, त्याच स्वार्थत्यागाच्या ठिणग्या, तुमच्यासारख्या गुजरायेतल्या मराठी रक्तातून अजूनही बाहेर पडतात, याचा कोणत्या राष्ट्रभक्तास आनंद वाटणार नाहीं ? दादासाहेब, आमच्या आजकालच्या राष्ट्रस्वातंत्र्याच्या धकाधकीच्या मामल्यात रणसंग्रामाचा घनघोर प्रसंग येणार नाहींच, असं मी चुकूनही म्हटलं नाहीं. एवढंच नव्हे, तर ऐतिहासिक प्रसंग पाहिले तर " रणाविण स्वातंत्र्य " कोणालाही अजून मिळालं नाहीं असंच दिसतं. पारतंत्र्यशृंखला ज्यानं नुकत्याच तोडल्या, अशा इटलीलाही रणसंग्रामच करावे लागले आहेत हें मी देखील कबूल करतों; आणि तसाच जर का हिंदुस्थानावर प्रसंग आला तर, एका " हरहर महादेव ',

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

या रणगर्जनेचा काय तो अवकाश, ती करणारा देवर्षि शिवाजी महाराज महाराष्ट्रातच निघेल, व सर्व जगभर विखुरलेले मराठे जर्मनांनाही थक्क करून सोडणार, कडेकोट शिस्तीचं आणि अलौकिक पराक्रमाचं तरी यशस्वी रणकंदन करतील अशी माझी बालंबाल खात्री आहे. मध्यंतरी मी म्हणत होतों कीं, माझी महाराष्ट्रावर सारी भिस्त आहे, तें याच जाणीवेत, व ती जाणीव माझ्या हृदयातून अजून तितक्याच तेजस्वितेनें तळपत आहे.

" तरीसुद्धा मला असे विचार सुचतात कीं, जें साम्राज्याचे धडे आम्ही सतराव्या व अठराव्या शतकात गिरविले व एकोणिसाव्या शतकांत जे आम्हास उपयोगी पडले नाहींत, किंबहुना, जे गिरवून, अंतीं आम्ही हिंदु व मुसलमान असे दोघेही पडतो तोच स्वत पडण्याचे व शत्रूंसही पाडण्याचे धडेच गिरविण्याचें हिंदूचें शतकानुशतकें कार्य आहे काय ? युगानुयुगापर्यंत स्वतंत्रता व परतंत्रता याच रहाटगाडग्यात हिंदुस्थानानेंही भाग घ्यावा कां ? आणि समजा, घेतला तरी जें गाठतांना हिंदुस्थानातील यच्चयावत् जीवाला त्यांत भाग घेतां येत नाहीं, म्हणून जें गाठल्यावर, मिळालेल्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या विभागांकरतां फिरफिरून यादवी माजते, तें स्वातंत्र्य गाठतांनाच, तेंच पूर्वीचें रहाटगाडगें चालवायचं हें पाश्चात्यांनी यमालीनं चालविलेलं आसुरी मत आम्ही देखील करायचंच कीं काय ? वास्तविक जें देशस्वातंत्र्य आमच्या अत्यंत पुरातन अशा सोमसूर्यवंशीय पूर्वजांनी मानवकल्याणाकरितां वृद्धिंगत केलं, त्याचच विडंबन हीं पाश्चात्य राष्ट्रं गेल्या हजार वर्षांपासून करीत आहेत त्या विडंबनाचीच री ओढण्याचं अपवित्र काम आम्ही करावयाचं कीं काय ? देशभक्ति, राष्ट्रभक्ति हा एक अमोलिक गुण खरा, परंतु तो गुणसुद्धां परदास्यावर अवलंबूनच असतो ना ? परचक्रापासून आपलं रक्षण, एवढ्याकरतां परचक्रानाच अगोदर आपल्यांत मिसळून घ्या कीं, जणूं दोन राष्ट्रं म्हणजे खरोखरच दोन भांवडें पक्षे आहेत, अशा आर्दवान्स्वनीती व मॉर्डभेदनीती नीति, ही भाऊबंदकीच्या प्रश्नाला आतां अवघड दुनीयुगाणी ठरणार निराळी हानी आहे. टोलास टोला, अथवा Burn Carthage हें माटी त्याचं अथवा रोमन त्याचं तत्व गेलं, जीव मारून मरण नाहीं, उडून जडत नाहीं हें अत्यंत पुरातन सनातन तत्व खरं आहे. तें आम्ही हिंदूंनीच विसरलों होतों, मुसलमानांना तें माहीत नव्हतं, पाश्चात्यांना तर तें अजूनसुद्धां नाहीं. अहिंसा म्हणजे हिंसा करणं नव्हे

माहीत असून मुद्दा, केवळ अज्ञानानं दुसऱ्याच्या वित्ताचा व प्राणाचा अपहार करावयाचा, ही चूक आहे, हें ज्ञान व त्याप्रमाणं वागणं होय. हें तत्व गौतमबुद्धाचं आहे, अथवा जीजस् ख्राइस्टचं आहे, असं म्हणणं चुकीचं होईल. तें सनातन आहे; मानवी हृदयाइतकं तें पुरातन आहे. तुमचं जोराचं सांगणं असं आहे कीं, तें तत्त्वच कांहीं एकटं नाहीं; नव्हे तें अत्यंत क्लिष्ट तत्त्व आहे. इतर तत्त्वाच्या सापेक्षेनं त्याचा आचार करावयाचा असतो. आपलं म्हणणं अगदीं अक्षरशः खरं आहे. मी तरी तेंच सांगत आलों आहे. कोणत्याही एका सद्गुणाचा अतिरेक करूं नये, असाच माझा आग्रह आहे. सर्वभूतीं परमेश्वराचं चैतन्य ओळखणं व त्यावर अंतःकरणापासून प्रेम करणं, ह्यातच सर्व सद्गुणाचा मिलाफ होतो. आपल्या प्रेमपात्राचे दोष आपण जसे सहज पचवतो, व त्याच्या गुणाकडेच दृष्टि देऊन, त्याच्या सुखाकरता झटतो, त्याप्रमाणेंच इतर सर्व प्राण्यावर आपण प्रेमच ठेवलं पाहिजे. या प्रेमाकरता, या भक्तीकरताच इतर गुणाची थोरवी आपण गातों; पण त्यापैकीं एकाच गुणाला आपण डोक्यावर घेऊन नाचलों, तर लवकरच तो गुणही आपल्या डोक्यावर नाचून, आपणास भक्तिपासून दूर नेतो. त्यावेळींच तो सद्गुण दुर्गुणात रूपांतर पावतो. गौतमबुद्धाची अहिंसा, हा दुर्गुण नव्हता, त्या तत्त्वाचा अतिरेक झाला तेव्हा राष्ट्र दुर्बल झालें, जैनानीं मुसल्मानाना किल्ल्याच्या जामदारखान्याच्या व कोटांच्या किल्ल्या देऊन प्रचंड हिंसेला मदतच केली हें मला माहीत आहे. पण त्याचा दोष गौतमबुद्धाच्या माथीं लादूं नका. पेशव्याच्या जुलमानं जसे आजचे ब्राह्मण दोषास्पद ठरत नाहीं, किंवा मनुस्मृति जाळून जशी अस्पृश्यता जावयाची नाहीं, त्याप्रमाणंच गौतमबुद्धाच्या पंचविसाव्या पिढीन्या अतिरेकाचा दोष गौतमबुद्धाच्या माथीं लादता येणार नाहीं आणि त्याचीं पुस्तकं बहिष्कृत करून अहिंसा मरणार नाहीं. मी देखील अहिंसा ही केवळ शरीराचीच आहे असं म्हणत नाहीं, एका प्राण्याला आपल्या शरीराचं, मनाचं, व हृदयाचं पावित्र्य राखावयाचं असेल, तर त्यानं पावित्र्याच्या आड येणाऱ्या असंख्य अज्ञानी पण सत्ताधारी जीवांना, प्रसंगीं निष्ठुरतेनं दूर सारलं, तरी ती अहिंसाच होय. मात्र सुखाभिलाषेनं ती क्रिया झाली तर ती भयंकर हिंसा होय ज्या अहिंसेमुळं आपली निष्कलंक प्रेमज्योति कमी होणार नाहीं, तीच अहिंसा खरी असं माझं म्हणणं आहे, या अहिंसेनं प्रेरित होऊन,

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

हिंदुस्थानानं जर जगाला धडा दिला तरच तें दोनचार हजार वर्षांचं रहाटगाडगं थांबेल. जगाचं तें फुटकं तुटकं रहाटगाडगं थांबावं, अशी माझी तर अत करणापासून इच्छा आहे. वरुन दिसावयाला मी क्रांतिकारक आहें. परंतु मी राज्यक्रांतिकारक आहें हें कबूल करुनही सांगतों कीं, मी तत्त्वदृष्ट्या उत्क्रान्तिकारकच आहे. जगाची अज्ञानीपणाची धांगडधिंग्याची क्रान्ति मला मान्य नाहीं. पाश्चात्यांना राज्यक्रांतीचं भस्मासुरी वेड लागलं आहे. उत्क्रान्तीसारख्या उत्कृष्ट तत्त्वांतही ते Survial of the fittest असं रक्तबंबाळी, तरीसुद्धा अशास्त्रीय राज्यक्रान्तीचंच तत्त्व घुसडतात. Everything Survives, nothing dies हें उत्क्रान्तीचं सात्त्विक तत्त्व जगाला प्राचीन आर्यऋषींनीं सांगून ठेवलं आहे, पण तें आपण पहात नाहीं. आपण नकळत पाश्चात्यांच्या वळणाचे चळवळीचेही मार्ग घेतों. ही चूक माझीसुद्धा होते; पण मी वेळींच सावध होऊन माझ्या चुक्या सुधारतों—

" दादासाहेब, तुमचं पितृहृदय, मी पूर्णपणें ओळखलं. माझ्या चुक्यापायीं शेंकडों, नव्हें हजारों, तरुणाचा चक्काचूर उडतो, त्यांचीं आयुष्यें पुढें मातीमोल होतात, नव्हे, माझं म्हणणं नकळून म्हणा, किंवा अवांतर कारणामुळं, त्यांच्या हातून पितृ–आज्ञा–भंग, मातृहृदयभंग, वगैरे मोठे, व थोडासा दांभिकपणा, स्वार्थसाधूपणा वगैरे ल्हानमे प्रमादही घडतात, हें मी पाहून आहे. तरुणास भडकवून देणारा त्यांना वेगळ्याच मार्गाला लावणारा, असा सॉक्रेटीसावरचा आरोप मजवर कोणी केला; व त्याबद्दल जर मला कोणी, शक्य असल्यास, हें ग्लान्स प्यायास दिलं, तर मी त्या दंडाला जगताच्या भ्रामक दृष्टीनें खरोखरच पात्र आहे, एवढंच नव्हे, **तर गांधी सैतान कीं साधु ? या अंतरंग भावनेला, गांधी सैतान, असं जरी कोणी उत्तर दिलं तरी तो आपल्या दृष्टीनं चुकला असं मला म्हणतां येणार नाहीं.** तथापि मी असं विचारतों कीं, आज आमच्या तरुणांना तरी, पोटापाण्याचे मार्ग किती व कोठें मोकळे आहेत ? तुमच्या नृपेंद्र-सुरेंद्रासारख्यानांसुद्धा हजार दोन हजार रुपये दरमहा मिळाले, किंवा आमच्या नेहरू पितापुत्रांना दरमहाची प्राप्ती पन्नासमाठ हजारांची झाली, तरी ती इतर

हजारोंच्या तोंडचे अन्न काढूनच ना ? व तीं तोंडेंही आमचींच ना ? आपण सांगितलें होतें कीं, आर्थिक प्रश्नाचा कापूस मी पिंजूं नये; पण मीं वरील उदाहरणें तरुणांच्या स्वतंत्र मार्गशोधनार्थ उल्लेखीत आहें. मग जर तरुणाची आताच मातीमोल स्थिति आहे, तर त्या स्वताचा मी अहिंसेच्या रोपाकडे का उपयोग करून घेऊं नये ?

" दादासाहेब ! आपण आपल्या , निदान वडील चिरंजिवांशीं तरी–त्याचा उल्लेख करण्याची मला क्षमा करा–जसा आपला तो मुलगा आहे, तसाच माझा तो जावईही आहे. चागलं झालं म्हणा कीं वाईट घडलं म्हणा, त्यानं गुलाबशीं लग्न केलें, व गुलाबवर माझं पोटच्या गोळ्यापेक्षाही जास्त प्रेम आहे. उद्या माझा रामदास तुरुंगात गेला, अगर गोळीबारात गारद झाला, तर मला वाईट वाटणारच, परंतु माझ्या गुलाबचं जर काहीं वाईट झालं तर, या हृदयाला–असो. मला सांगायचं इतकंच होतं कीं, आपला मृगेंद्र खरोखरच अत्यंत तेजस्वी आहे. तो माझ्या तन्नानं चालण्यास मुळींच कबूल नाहीं, व मी देखील त्याला चुकून आग्रह केला नाहीं त्याचा मार्ग एकदम वेगळा आहे, व तेवढ्याकरता तो अमेरिकेंत गेला आहे—

" त्याला द्रव्यसहाय्य कोणाचं ? "

" माझें मी मॅकमिलन् कंपनीला एवढ्याचकरता माझीं पुस्तकं विकत असतों. पाश्चात्यापासून शक्य तितका पैसा आम्ही मिळविला पाहिजे. " एकॉनमिकल बॅलन्स " त्यानीं पार बिघडवून टाकल आहे; तें परत स्थिर बिंदूवर आम्ही देखील आणलं पाहिजे "

" पण मी आपलं कर्ज फेडण्यास बांधलेला नाहीं, हें आपण ध्यानात धरालच ? " दादासाहेब गांधींना म्हणाले

" त्याना नाहीं, पण मला तर बांधलेले आहात ना ? " ती पोक्त बाई एकदम आत येऊन म्हणाली ती येताच व तिला निरखून पाहताच दादासाहेब एकदम ओरडून म्हणाले,

" तूं इथं कशी ? मोटारींत तूंचना मला भेटली होतीस ? "

" मोटारींत ? अहो ! आपणाला वीस वर्षांपूर्वी पुण्याच्या एका गटारातून

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

ज्या कुमारिकेनं काढून आपल्या घरीं नेलं, त्या या भागीला आपण विसरलात वाटतं, दादासाहेब, वंडगार्डनमधल्या—"

" गांधी ! रात्रीच्या जाग्रणानं माझं डोकं दुखायला लागलं आहे. येतों आता. Good night ! "

" मी बरी जाऊं देईन ! " भागीनें त्याचा कोट धरून ठेवला. " बापूजी " या म्हाताऱ्यानं माझं जन्माचं नुकसान केलं. माझ्या पोरीला–"

"भागूताई !" महात्माजी अंतर्यामीं चरकून म्हणाले, " सोडा त्याना ! आपलं सगळ नुकसान मी भरून देईन, त्याना जाऊं द्या. "

" तुम्हाला नुकसान कसं भरून देता येईल ? दादासाहेबाची मी रखेली आहे. माझ्यापासून– "

" भागुताई ! " गांधी अगदीं काकुळतीनें म्हणाले, कारण हीच गुल्नारची आई असावी अशी त्यानाही भीति वाटू लागली; " मी सगळी व्यवस्था करीन, सोडा त्याना ! "

" पहा बरं ! आपण थोर आहात ! आपल्या वचनावर मी विसंबूं ? "

" बेलाशक ! "

" दादासाहेब ! जा ! पण थांबा ! मोटारींत असता आजच मला आपला हा ल्हानसा फोटो सापडला तो मात्र मी ठेवणार ! "

तो फोटो तिचा व दादासाहेबांचा मुंबईस पंधरा वर्षांपूर्वीचा होता.

" काय वाटेल तें कर. पण मला सोड ! "

" या जन्मीं तरी नाहीं पण कायहो ! तुम्हाला बायकांच्या सत्याग्रहाविषयीं बोलायचं होतं ना ? पण तूर्त जा ! बापूजी, आपण, महात्मा खरे ! "

पण तितक्यातल्या तितक्यात, जाता जाताही दादासाहेब ओरडले,

" सैतान कीं साधु ? "

पुस्तक दुसरें

# सैतान !

भाग २ रा

## हिंदुस्थानांतील सोशॅलिझम

"Good sentiments, ill directed, frequently lead children into vice" —confessions.

Rousseau

**ग्रंथकर्त्याची विनंती** — या भागात भागीची गोष्ट येणार आहे. या प्रसंगांत महात्मा गांधींच्या चळवळीचें व्यापक स्वरूप व त्याचें इष्टानिष्ट परिणाम वेगवेगळ्या व्यक्तींकडून कादंबरीरूपानें सांगावे, एवढाच मुख्य हेतु आहे. बारिक सारिक गोष्टींचे उल्लेख करून, त्यांना मुख्य तेवढ्या सुतांत गोवून घ्यावयाचें ठरविलें होतें. असें करण्याचें मुख्य कारण स्वकल्पमर्यादेशिवाय अन्य नाहीं. तरीसुद्धां भागीच्या द्वारें आमच्या, सुमतया अस्पृश्यतेचाच केवळ नव्हे, तर गेल्या कित्येक वर्षांतील आमच्या सोशॅलिझमचा एक लहानसा आरसा निर्माण करतां येण्यासारखा असल्या कारणानें, भागीची गोष्ट, विषयांतराची जाणीव असूनही, या कादंबरींत मुद्दाम घातली आहे. शिवाय मूळ कथानकाला ही गोष्ट साधारणपणें तरी आवश्यक होतीच; कारण, महात्माजींचें महात्म्य, फार मोठ्या प्रकरणीं व फार मोठ्या व्यक्तींकडूनच जरी कबूल करण्यांत येतें तरी त्यांत त्या मोठ्या व्यक्तींकडूनच अजून साशंकवृत्ति आहे. परंतु लहानसहान दीन गरिबांना महात्माजी साधूच आहेत, असें कां वाटतें हें व अशा कोनाकोपऱ्यांतल्या गोष्टींवरूनच दिसून येईल. इतिहासाच्या महानदीच्या महापुरांत मोठमोठे प्रसंग भराभर वाहत राहतात, परंतु गेल्यापाव्यांतले विरळे प्रसंग त्या नदीच्या गाळांत रुतून बसतात. तथापि एकदां महा पूर उतरून गेला, म्हणजे त्या गाळांतूनच इतिहासाचीं अबाधित इतिहासरत्नें सांपडण्याचा बराच संभव असतो. स्तुतिपाठक स्तोत्रें गाऊन जातात, निंदाखोर निंदाही प्रथित करून ठेवितात. परंतु साधु व कर्मयोगी यांची कामगिरी त्यांच्या या खालच्या थरांतील स्वभावछटा मनस्थितीतच दिसते. लिहिणाऱ्यांची घाई उडते; बोलणाऱ्यांची जांभई थकते, परंतु विज्ञानविशारदांचें एक मात्र आपलें पितृमातृगुरुजन अगंटन मूकभाषेनें दाखवीत असतें. तेव्हां एका तरी प्रकरणांत मी वाचकांना थेट महाराष्ट्राच्या घरांत नेऊन, तेथें या विभागाच्या शब्दांतले परिणाम दाखविले तर ते मजवर रुष्ट होणार नाहींत अशी मला आशा आहे.

---

म्हणजे सरड सापडलेच असा भरंवसा नव्हता. आणि एकदा का तें प्रकरण भिजत
पडलें तर त्यातून किती दुर्गंध सुटतील याचाही नियम नव्हता. रात्र वरीच
झाली होती. मग आणखी तास दोन तास जागरण करायलाही गांधींना
हरकत वाटली नाहीं. तथापि, काय ही महाराष्ट्रीयाची नीतिभ्रष्टता पहा!
असा एक विचार त्याच्या मनात चमकून गेलेला असावा. तथापि आपल्या
गुजराथ्याच्या मानानें पुष्कळच बरी आहे. अशी तुलनाही त्याना सुचली
असेल, कारण त्यानीं लगेच कस्तुरीच्या वडिलांच्या झोंपडीच्या दिशेनें आपली
नजर फिरवली. तें काहीं असो; त्यानीं भागीला हाक मारून बोलावलें
खचित. ती देखील तयार होताच. ती म्हणाली,

" काय बापूजी ! "

" तूं मला विचारल्याशिवाय एकदम का आली होतीस ? हें चागलं का ? "

" मला क्षमा करा, मजकडून रहावेना. त्या दांभिकाची लबाडी मजकडून
ऐकवेना. "

" पण तूं आमचं भाषण तरी का ऐकलंस ? "

" आज संध्याकाळींच मी अमदाबादेच्या रस्त्यात येत असताना, गाराचा
पाऊस पडला तेव्हा, मी काका बाबा करून, त्याच्या मोटारींत बसलें. पण तिथं
सुद्धां त्या म्हातान्यानं माझ्याशीं पाजीपणा केलाच. मला हा फोटो अगोदरच
सापडला होता, तसं मी त्या राजश्रींना तावडतोब ओळखलं, आणि जरासं गोड
बोलून ते कुठं जातात, वगैरे सगळं त्याच्याकडून काढून घेतलं, अन् मग त्याच्या
तोंडाला चागलीं पानं पुसलीं; व इथं त्याचीही अशी खोडी उडवायचं ठरवलं
होतं. "

" पाहूं तो फोटो "

भागीनं तो गांधींना दिला. त्याजकडे थोडा वेळ पाहून ते तिला म्हणाले,
" तुझा व दादासाहेबाचा संबंध कसा जमला ? त्याच्यापासून तुला—
"पण लगेच त्यानीं आवरतें घेतलें. कारण गुन्नारची तीच आई
आहे, हें फोटोवरून थोडथोडें दिसतच होतें. म्हणून ती हृदयभेदी वार्ता एकदम

ऐकण्याची त्याचीही छाती होईना ज्या पापाला आपण भीत होतों, तें पाप खरें ठरतें आहे, आपण नकळत बहिणभावाचच लग्न लावून दिलें,व तेंही भलत्याच तातडीनें, हें कठोर सत्य, त्या सत्यप्रिय महात्म्यालाही भेडसावून देऊं लागलें. जगातील कोणत्याही पापाला न डगमगणारा प्राणी आता अतर्यामीं चरकून गेला। परमेश्वरा ! आता माझी लाज तुलाच आहे ! मला साभाळ ! अशी दीनवाणीची हाक गांधींनीं मनातल्या मनात हृदयस्थ परमेश्वराला केली बरें झाले का ते दिवस भयंकर उष्म्याचे होते, नाहीं तर गांधांच्या कपाळावर घर्मबिंदूंचें खरें कारण भागीनें सुद्धा ओळखिलें असतें गांधींनीं हृदयावर बोटाच देवळाचें शिखर करून ठेऊन भागीला विचारलें,

" भागी, तुझी गोष्ट प्रथमपासूनच मला सागतेस का ? अगदीं सगळी साग !"

ठीक आहे ! " भागीनें आपली गोष्ट सागण्यास सुरवात केली " बापूजी ! नाहीं तरी आपणाला मी माझी गोष्ट एकदा सागणार होतेंच पण आपणाला वेळ सापडेना, व मलाही आपणासारख्या थोर माणसाशीं कस बोलाव, असा सकाचे होत असे. परतु परमेश्वर सगळ्याचा वाली असतो तो आपणासारखे साधुसत गरिबाकरताच या भूमीवर पाठवून देतो. आपणासारखेच थोर पुरुष टिळक होते, त्याच्या उपदेशानं—

" काय ? तुला टिळकानींही उपदेश केला होता ? "

" हो. " भागीनें उल्हसित होऊन म्हटलें " अहो, थोर ते साऱ्या बाजूनं थोरच असतात टिळकासारखा साधु तमाम दुनियेत सापडणार नाहीं. त्यानीं एकदां आमच्या घरचा सत्यनारायणाचा प्रसाद खाल्ला होता पण क्षम कशाला ? आपण माझी सगळी गोष्ट ऐकता ना ? त्यात टिळकाची गोष्ट येईलच ऐका.

" मी जातीची महारीण खानदेशात जळगावजवळच्या एका खेड्यात मी, माझी बहीण व माझा बाप असे तिघे, एका मळ्यांत झोपडी करून रहात होतों ( यावेळीं गांधींच्या हृदयाचा नकाशा काढता आला असता तर त्यात हृदयाच्या गळ्यांचें रक्तच पुरळ दाखवावें लागलें असतें. ) माझा बाप शेताचा रखवालदार असे तो अतिशय दारू पीत असे. त्यामुळें रखवालीचें काम बहुतेक आमच्यावरच

येऊन पडे. अशा रीतीनं रात्रीं भटकण्याची आम्हाला संवयच लागली होती. माझी बहीण माझ्यापेक्षा चारपाच वर्षांनीं मोठी आहे. मी आठएक वर्षांची असतानाच तिचीं कृत्यं मला राजरोस पहावयास मिळत. आमच्या मालकाच्या मुलाशींच तिची संगत झाली होती. तो तिला नाटक पाहण्यालाही घेऊन जाई. म्हणजे त्या दिवशीं मी एकटी पडे. मला मग फार भीति वाटे. एका चांदण्या रात्रीं माझी बहीण नाटकाला गेली असता मला फारच भय वाटलं. कारण त्या दिवशीं बाजारची दारू खूप पिऊन माझा बाप खूप ओरडत होता. मग मी पळून नाल्यात जाऊन बसलें. थोड्या वेळानं एक चवदा पंधरा वर्षांचा ब्राह्मणाचा मुलगा, लोटी घेऊन नाल्यांत आला. त्याचं काम आटोपल्यावर तो जाऊ लागला तसं मी त्याला काळजीनं ठेवून घेतलं आणि त्याला मी बहिणीचं कृत्य शिरवलं. त्या दिवसापासून आमची खूप गट्टी जमली. त्याचा मळा आमच्या शेजारींच होता एक दिवस आम्हाला माझ्या बहिणीनं पकडलं, व तिच्या त्या पोरानं, माझ्या पोराच्या बापाला सांगितलं त्याला तर घरीं मार बसलाच, पण मग मी देखील माझ्या मालकाला सांगून, बहिणीच्या पोराला खूप मार बसवला. पण त्याचा परिणाम वेगळाच झाला. माझ्या बहिणीकडे आमचे मालक स्वताच येऊं लागले मला पुढें समजलं कीं, त्या अटीवरच माझ्या बापाची नोकरी टिकली पण पुढें लवकरच माझ्या बापानं मलाही मालकाकडे जाण्यास सांगितलं मी तें साफ नाकारलं. कारण माझा तो पोरगा बापाचा डोळा चुकवून माझ्याकडे येत असे. आमचं एकमेकांवर खरोखरच प्रेम होतं. मी मालकाकडे जाण्याचं नाकारलं तसं मला बापानं घरातून हाकलून दिलं. मी दुसऱ्या खेड्यात राहावं, व रात्रीं माझ्या पोराकडे जावं. पण पुढें तो पोरगा कॉलेऱ्यानं मेला आणि मला माझ्या बापानं घरात घेतलं नाहीं. म्हणून मी खानदेश सोडून भटकत भटकत नगराला गेलें मध्यंतरीं मला कळलं कीं माझ्या बहिणीला एक पोरगी झाली.—

" पोरगी ! " गांधींचें सर्वांग थरारलें.

" पण ती लवकरच मेली असंही मला समजलं. ( गांधींच्या जिवात जीव आला ) माझ्या मनात तिला लुगडंचोळी करावयाची होती. "

" काय करायचं होतं ? " गावींनीं उसासा टाकून, काहीं तरी बोलायचें म्हणून विचारिलें झाले.

"आम्ही त्याला वाळंतविडा म्हणतो. "

" अस्सं ! आणि पैसे कुठून आणले असते तुझ्याजवळ ? बापाचं घर सोडते-वेळीं काहीं पुंजी असेलच म्हणा. "

", मुळींच नव्हती. आपणाला खरं वाटणार नाहीं; पण पैसे मिळविण्याची कल्पना मला फार उशीरा आली. खरं म्हणाल, त्या थेरड्यानंच मला पैशाची पहिली चटक लावली. माझ्या पहिल्या मुलानं मला कधीं पैसे दिलेही नाहीत; अन् पैसे कशाला लागतात हे मला माहीत नसल्यानं मी त्याजजवळ कधीं मागितलेही नाहात. मी देवाची शपथ घेऊन सागते कीं ही पैशाची कल्पनाच नसण्याची संवय मला अजून देखील आवडतें. तिच्यामुळं मी मोठमोठ्या संकटातून अचानक वाचले आहें. पुढें बापाचं घर सोडून मी बाहेर पडलें तरी मी मजुरी करूनच, चागली घाटापर्यंत हिंडले "

" कोणता घाट ? "

" माल्कम घाट ! तिथूनच वेरूळला जाण्याची सडक आहे. मला दोन्ही वेळा खायला मिळावं, व रात्रीं एखाद्या पडक्या देवळात अगर धर्मशाळेत निजण्यासाठीं एक कामळं अंथरायला व एक पाघरायला मला मिळाल होत. नेसायला श्रीमंताच्या बायकांचीं फाटकीं तुटकीं लुगडीं मिळायचीं, व कुठून तरी सुईदोरा घेऊन मी तीं शिवून काटी. अशा रीतीनं मा एक चागलंसं लुगड अन् चागली चोळी तयार करून बहिणीला पाठविणार होतें, पण तिची पोरगीच आटोपली; तसा मीही माझा विचार सोडून दिला. "

" बरं; भटकण्यात तुला कोणी त्रास दिला नाहीं का ? "

" रगड. पण मी महावस्ताद, मी स्वताला साभाळून असे. गवडी, सुतार, मुकदम वगैरे लोक भारी वात्रट; त्याना वाटतं की, महाराच्या सुंदर पोरी म्हणजे बाजारची भाजीच जशी, पण मी त्याना असं चापीत असे कीं विचारूं नका. त्यामुळंच तर मजवर एकदा चागलाच प्रसंग गुदरला होता. एकदा मला कामा-वरून गावाच्या बाहेर जायला झाला उशीर, मी एका चुन्याच्या भट्टीजवळून जात होतें. इतक्यात आमचाच धुभार मजुर्ड आडवा झाला, तसा मी त्याला

असा एक फटकारा मारला की, तो कोलमडून भट्टीच्या तोंडाशींच पडला. मी ताबडतोब त्याला ओढलं म्हणून बरं झालं, नाहीतर राजश्री आपल्याच भट्टींत गारद झाले असते. पण पुन्हा कामावर जाण्याची सोय नव्हती. कारण मला अनुभव आहे की, पुरुषजात म्हणजे शुद्ध नाग! दश धरून ठार मारल्याशिवाय कधींही रहाणार नाहीं."

"भागी! तूं तर आमच्या शेक्सपियरवरही ताण केलीस ग!!" "स्त्रीजात तितकी अविश्वासू" असं त्यानं लिहून ठेवलं आहे, आणि आता तूं म्हणतेस की "पुरुषजात म्हणजे शुद्ध नाग!"

"आपणासारखे पुरुष थोडेच सापडतील. पण बाकीचे पुरुष शुद्ध कुत्रे! बिन—"

"पुढं काय झालं?" गांधींनीं तिला विचारिलें.

"मग मी नगरला आगगाडीनंच गेलें. मला एका गुजराथ्यानं नेलं."

"गुजराथ्यानं?"

"हो. गुजराथी तुम्ही कमी समजूं नका आपण गुजराथी आहात म्हणून मी तें गुजराथ्याचं प्रकरण सोडून देतें."

"नको, नको. सांगच तें आमचे हिंदु एकजात कसे बिघडले आहेत, हें तरी मला तुजपासून कळूं दे."

"हिंदूंनाच कशाला नावं ठेवता! मुसलमान, पाद्रि, गोरे, पाद्रिसुद्धा, भाटे, बंगाली, मद्रासी, सिंधी, कच्छी सारे एका माळेचे मणि. सगतें ना की, पुरुषजातच अत्यंत पागल म्हणून!"

"पण तू इतक्या जातींचा अनुभव घेतलास तरी कोठ कोठें?"

"माझं फक्त विलायतेंत जाणं राह्यलं आहे. पण मोठ्या लढाईत मी एकदां आफ्रिकेंत अन् एकदा बसऱ्यापर्यंत जाऊन आलें आहें. बसऱ्याला जातांना मात्र माझी स्थिति भयंकर झाली होती. मी आपणांला विकूनच घेतलं होतं. त्यालाहि कारण तोच मेला थेरडा! त्यानंच मला रोग जडवला, अन् टाकून दिलं होतं. सुरतेहून मी मुंबईच्या साऱ्या गल्ल्या हिंडलें, अन् काळ्या पल्टणीकरतां म्हणून राहिलें होत. त्यामुळंच मला पठाणाबरोबर आफ्रिकेंत जाता आलं, पण तो तिथं ल्टार्डत मेला,

तशी मी एका ब्राह्मण कारकुनाबरोबर परत मुंबईला आलें, व फिरून सुरत गाठून दादासाहेबांपाशीं कांहीं महिने होतें. पण रोग जडल्यावर—

" भागी! तूं आमच्या समाजाचीं भेसूर चित्रंच मला दाखवते आहेस, तुला चांगलं असं कोणीच कां वागवलं नाहीं ? "

" वागवलं तर ? नाहीं कसं ? मला खरोखरींच पहिला देवमाणूस म्हणजे दादासाहेबच भेटले होते. त्यांची व माझी गांठ प्रथम नगराला झाली. ज्या गुजराथ्याकडे मी बागेची रखवालदारीण म्हणून होतें, त्याच्या बैठकींतलें दादासाहेबही होते. त्यावेळीं ते तिथें इंग्रजी शाळेचे हेडमास्तर होते. मृगेंद्र त्यावेळीं तान्हा होता. "

" तूं त्याला आता ओळखशील ? " गांधींनीं जीव मुठींत धरून विचारिलें.

" ओळखशील ? अहो ओळखला सुद्धा! परवा त्याचं लग्न झालं त्याचवेळीं वाटलं कीं, त्याला कडकडून भेटावं! पण म्हटलं कीं, आपण महार लोक, आपणाला काय म्हणतील ? शिवाय मी दादासाहेबांना घाबरलें, त्यांचे मजवर एका दृष्टीनें अनंत उपकार आहेत त्यांनीं मला लिहायला, वाचायला शिकवलं, तें इतकं कीं, मी वसत्याहून आल्यावर इस्पितळांत असताना एका मडमेशीं इंग्रजी बोलत असे; घेडगुजरी इंग्रजीच तें. पण त्यामुळं मी इस्पितळांतून सुटतांच, एका मिशनरी मुलींच्या शाळेंत मास्तरीण म्हणून राहिलें होतें. "

" कुठं ? "

" नागपूर, बिलासपूर व खरकपूर या तीन ठिकाणीं. खरकपूरलाच मला बंगाली तरुणाचा अनुभव आला. "

" आता ते अनुभव तूर्त राहूदे एका बाजूला, मी ते केव्हा तरी ऐकेन. मला तुझ्या बहिणीचं काय झालं तें सांग. "

" मी खरकपूरला असताना मला दादासाहेबांचं पत्र आलं कीं, माझ्या बहिणीवर आपलीं पोर निवडुंगात टाकून देण्याची तोहमत आली आहे. "

"कुठल्या निवडुंगात ? " गांधींनीं अधीरतेनें विचारिलें.

" खान्देशाच्याच. " गांधींचा चेहरा एकदम गोरामोरा झाला. तथापि तें ग्रेटचें वीष पिण्याचे टाळण्याकरतां त्यांनीं तिला विचारिलें

" भागी ! इतक्या अवधींत तुला लग्न करता आलं नसतं का ? "

" हो. पण दादासाहेबांच्या पासून मला ही पोर झाली असताना, मला स्वतालाच तिला टाकून लग्न करावंसं वाटलं नाहीं. "

" तुझी ती पोर हल्लीं कोठें आहे ? " अखेरचा प्रश्न गाधींनीं टाकलाच.

" तेंच तर मला कळत नाहीं. एवढंच नाहीं तर तो मुलगा का मुलगी होती तेंही मला पाहूं दिलं नाहीं. दादासाहेबावर तेवढ्याकरताच तर माझा खरा राग आहे "

"गाधींच्याभोंवतीं सारी पर्णकुटी फिरावयाला आरंभ झाला. ते चटकन् उठले, व खालवर येरझाऱ्या घालूं लागले. फिरून त्याना भागीच्या इतर गोष्टी ऐकून उमज घेण्याची इच्छा झाली. त्यानीं तिला विचारिलें,

" तुला दादासाहेबापासून कोणकोणते फायदे झाले. "

" पहिला फायदा शिक्षणाचा ,दुसरा फायदा प्रवासाचा, तिसरा फायदा मातृपदाचा, चवथा फायदा देशसेवेचा.

" देशसेवेचा ! तो कसा काय बुवा ? "

" त्यानीं मला राज्यकर्त्यांविषयीं थोडथोडी माहिती करून दिली होती. व्यापार कसा चालतो हें सागितलें होते, बंगालची फाळणी रद्द कां झाली व त्याचे परिणाम कोणते झाले हें सांगितलें होते, पुढें टिळकाविषयींही ओघाओघानें माहिती करून दिली होती;—"

" हो खरंच. टिळक तुमच्याकडे सत्यनारायणाला एकदां आले होते, त्याविषयीं तूं कांहीं सागणार होतीसना ? "

" हो. बरी आठवण केलीत. मी पुण्याला असतांना–"

" तूं पुण्याला कां गेलीस ? "

" मला दादासाहेबानीं नगरहून नेलं होतं—"

" पण तूं तर इतक्यांत रागाच्या भरांत त्याना म्हटलं होतं कीं, ते पुण्याला गटारींत दारू पिऊन पडले असता तूंच त्यांना काढलंय. अन् त्यावेळीं तूं आपगाला कुमारिका म्हणून घेतलं होतंस ? तुला तर कौमार्याची कल्पना येण्याच्या अगोदरच तूं बाई झाली होतीस. "

" कोण म्हणतों ? माझं तर अजून लग्न झालं नाहीं. तेव्हा मी बाई कशी ? मी अजून कुमारिकाच आहें. "

हें ऐकून गांधी थक्कच झाले ! अमेरिकेंतल्या कुमारिका माता आणि या हिंदुस्थानातल्या महाराणी कुमारिका माता यात फरक तो काय ? शिक्षणाचा व गोऱ्या चामडीचा आणि धनसमृद्धीचा ? पण त्या तिन्ही गुणसमुच्चयाचा परिणाम एकच ना ? ही तुलना गांधींच्या मनात उभी राहिली. त्यांनीं भागीला विचारलें, " तुझी तर दादासाहेबांशीं प्रथम पुण्यालाच भेट झाली ना ? "

" भेट, म्हणजे खरी भेट. नगरला त्याचे फक्त प्रयत्न होते. पण नगरला असतानासुद्धां मी माझ्या पहिल्या पोराला विसरलें नव्हतें "

" मग तूं नगर सोडून दादासाहेबाबरोबर पुण्याला कशी गेलीस ? "

" कारण मला त्या गुजराथ्यानं भारी त्रास दिला. त्यानं एक दिवस माझ्यावर चोरीचा आळ घेतला होता. त्या दिवशीं भर कोर्टात मी त्याच्या मुस्काटात मारिली होती. कारण पैसा म्हणजे देणेघेणेचं साधन हें मला माहितसुद्धा नसताना मी त्याच्या तिजोरीतल्या नोटा चोरीन तरी कशा ? "

" तुला कैद झाली असेलच. "

" कैदेत कैद झाली. चोरीचा आळ तर शाबीत झाला नाहीं, पण मालकाला भर कोर्टात मारल्याबद्दल पाच महिन्याची सजा झाली. "

" महिन्याची ? "

" आणि सक्तमजुरीची. पुढें मला दादासाहेबांनींच सांगितलं कीं तें अयोग्य होतं. पण मला काय कळत होतं ? मी आपली तुरुंगात गेलें. तिथंही जेलरनं मजवर प्रसंग आणलाच होता, पण त्यालाही जेव्हा मुस्काटात बसल्या, तेव्हा अक्कलेच्या धाकानें त्यानं, मला फक्त तीन दिवस अंधार कोठडींत ठेवलं, पण पुन्हां मला तोंड म्हणून दाखवलं नाहीं. "

" तुझं हें मुस्काटात मारणं मला मोठं आवडलं. " गांधींनी हंसून म्हटलें. " मी लोकांना सांगतों कीं तुम्ही अनत्याचारी असा, शत्रूवरसुद्धा प्रेम करा, पण तुझी गोष्ट ऐकली कीं वाटतं कीं, आमच्या स्त्रियांनीं असेंच पाणीदार रीतीनं रहावं. "

" पण मी ती संवय इथं आल्यापासून सोडली आहेना ! " भागी विरमून म्हणाली. " आजच संध्याकाळीं मोटारींत दादासाहेबानासुद्धा मला मारतां आलं असतं पण आतां मला नक्की पटलं आहे कीं स्त्रियाना अब्रूचं रक्षण करण्याकरतां शत्रूनाही मारायलाच नको काहीं, आमची रहाणीच अशी असावी कीं, पशूसुद्धां आमच्या अंगावर धावून येण्याला धजणार नाहीं. "

" शाबास ! मुलीं शाबास ! मला तुझ्यासारख्या शंभर मुली मिळाल्या तर मी जगातल्या स्त्रियांची नीतिमत्ता खचित सुधारूं शकेन. "

" आपण मला भलताच मान देता. आपल्याच पुण्याईनें तें काम होईल, पण माझ्यासारखींच्या मदतीनं जग भ्रष्ट मात्र होईल! तिचा कंठ गद्गदित झाला. तसें गांधींनींच विषयांतर केलें.

" भागी ! तुझ्या गोष्टी ऐकून मला आमच्या हल्लींच्या खऱ्या समाजाची चांगलीच परीक्षा करतां येते. मुली घ्या, मुलगे घ्या, ल्हानपणीं तीं कांहीं वाईट नसतात. परंतु त्यांच्या कोंवळ्या बुद्धीला धावतें चळण मिळतं हेंच खरं. पण काय ग भागी ! तुला जसा पैशाचा लोभ नाहीं. तसाच पहिल्यापासून पुरुषसंगतीचा तिटकारा का नाहीं हें तुला सागता येईल का ! "

" खरं सागूं का ? मला पुरुषसंगतीचा तिटकाराच आहे तसा नसता तर, मी त्या पोरामागं पाच वर्षं तशीं काटलींच नसतीं, आणि पुढें सुद्धा माझ्यावर दादासाहेबानीं जुल्म केला नसता, तर फिरून पुरुषाला हात लावला नसता. "

" दादासाहेबांनीं जुल्म का केला ? "

" त्यानीं मला कैदेंतून सुटताच पुण्याला नेलं, कारण त्यावेळीं ते पुण्याला प्रोफेसर होते. त्यांच्या मनांतून मी त्यांच्या पैशावर रहावं. पण मी त्या गोष्टीला कबूल झालें नाहीं. त्यानीं मला शिक्षण देण्याचं कबूल केलं म्हणून मी नगर सोडून, मजुरी करूनच पुण्याला रहात होतें. गवताच्या वखारीवर मी रखवालदारी करी. दादासाहेबानीं कबूल केल्याप्रमाणं मला शिकवायला आरंभ केला, पण त्यांनीं माझा पिच्छाही पुरवला. पण मी त्याना दाद दिली नाहीं. एक दिवस माझ्या झोपडीपुढें अपरात्रीचे दादासाहेब, दारू पिऊन गटारात लोळत असताना मला आढळले. मला वाईट वाटलें मी त्याना झोपडींत घेतलं. त्यांना

नीट धुतलं, व खाटेवर निजवून मी खालीं निजलें. पहाटेस त्यानीं मजवर मी झोपेत असताना अत्याचार केला. तेव्हापासून मीं त्याच्याजवळ राहूं लागले.

" तें असो, टिळकांची गोष्ट तशीच राहिली. "

" मी वसत्याहून येऊन, इस्पितळातून नागपूरला, मास्तरीण म्हणून जाणार होतें. पण मी त्याच्या अगोदर खिस्ती व्हावें, असा त्या मडमेचा आग्रह होता. तें मला आवडलें नाहीं. परंतु त्यावेळीं मला पैशाच्या जीवनाची विषारी खोड माझ्या अंगीं मुरली होती लहानपणच्या पाकुळीचा स्वच्छंदपिणा नष्ट झाला होता. प्रवास म्हणजे पायीच, आणि जगात जणों पैसा नाहींच हीं स्वतंत्र वृत्ति नष्ट होऊन, पैसा नाहीं म्हणजे मरणच ओढवलं, आणि स्टेशनवर जायचं तरी टांगा पाहिजेच ही परावलंबी वृत्ति आली होती. मला माझ्या मुलीकरतां तरी जिवंत रहायच होतंच. तरीही मीं माझा धर्म सोडायला तयार नव्हतें. शेवटीं अशा स्थितींत काय करावं हें टिळकानाच विचारावं, म्हणून मी पुण्याला गेलें. भावाला भेटून येतें, अशी थाप मारून मी त्या मडमेजवळून अगाऊच पैसे घेतले. पैसा वाटेल तें खोटें कर्म करवतो; असो. पुण्याला गेलें खरी, पण टिळक मला कसे भेटणार ? टिळक म्हणजे काहीं दादासाहेब नव्हत कीं, त्याना मोहनी घालून भेटता येईल अशा स्थितींत दोन दिवस गेले. मला मुंबईला दुसऱ्या दिवशींच परत जावयाचं होत. पण मी दोन दिवस जास्त राहिलें. शेवटीं हताश झालें व निराशेचा भरात रात्रींच रस्त्यावरून हिंडूं लागलें. त्यावेळीं एका वाड्यात सत्यनारायणाची पूजा चालली असून तिथें टिळक बसलेले मी पाहिलें. मी एकदम वाड्यात शिरून एका कोपऱ्यांत लपून बसलें. थोड्या वेळानं मंडळी प्रसाद घेऊं लागली, तशीं मीही गेलें. त्यावेळीं आपण केवढा मूर्खपणा करतों आहोंत, याचं मला भानच नव्हतं. मला महारणीला तिथं कोण जाऊं देणार ! मला धक्के मारून घालवण्यासाठीं वाड्याचे शिपायी आले. तसे टिळक म्हणालें, तिला का मारता ? प्रसाद द्या. " टिळकापुढें कोणाचं काय चालणार, मला प्रसाद मिळाला; पण मला प्रसाद नको होता. मी टिळकाना हात जोडून म्हटलं कीं, माझ्या घरीं आपण सत्यनारायणाला उद्यां यावं अशी माझी इच्छा आहे. त्यानीं कबूल केलं, व पत्ता विचारून ठेऊन, ते बरोबर त्यावेळीं आले. "

" आणखी कोणी होते का त्याच्याबरोबर ? "

" होते. पण ते कोण होते हें मला माहीत नाहीं. मी टिळकांना प्रसाद दिला तो त्यांनी खाल्ला; व मग मी त्यांना माझी अडचण सांगितली. तशी त्यांनी त्याच मडमेला एक चिठ्ठी लिहिली. त्यामुळं मला धर्मांतर न करतांही नोकरी मिळाली."

" टिळकांनी चिठ्ठींत काय लिहिलं होतं ? "

" त्यांनी लिहिलं होतं की, स्वखुषीनं हिनं धर्मांतर केलं तरच तें खरं होईल, हें तुमच्यासारख्यांना कशाला सांगावं ? तुम्हांला धर्मांतर केल्याविना जर आम्ही कॉलेजांत प्रोफेसर्स किंवा वर्तमानपत्रांचे एडिटर्स नेमतो तर, तुम्ही तसं कां करूं नये ? तथापि आपणांस या मुलीच्या बाबतींत धर्म करतां येत नसेल तर मला कळवावं; मी तिला दुसरीकडे नेमीन. '

" वाहवा ! वाहवा ! लोकमान्य ते लोकमान्यच खरे ! " गांधी उद्गारले, " अरे पण, तूं त्यांना तुझी कहाणी सांगितली की ? "

" कां सांगणार नाहीं ? देवाजवळ नाहीं तर कोणाजवळ आपलं गाऱ्हाणं सांगावं ? "

" मग टिळकांनी तुला काय उपदेश केला ? "

" त्यांनी मला सांगितलं की, यापुढं शिक्षणाचंच पवित्र कार्य तूं कर. आपले वाईट अनुभव लक्षांत घेऊन, तसे अनुभव आपल्यासारख्या अनाथ मुलींना येऊं नयेत अशी खबरदारी घेऊन, परमेश्वराला भिऊन वागत जा. महात्माजी ! असा उपदेश करूनच ते थांबले नाहींत, तर मला त्यांनी स्पष्ट बजावलं की, जेव्हां जेव्हां तुला कसलीही व कुठेंही अडचण पडेल तर मला लिही; पण कधींही स्वतःच्या जिवाचं असं कृत्य करूं नकोस. यान्याही पत्नीकडे ते गेले होते. त्यांनी मग इशारा देऊन टेबिलावर घे, तुझं वय अजून कोवळं आहे; तेव्हां तुला जर त्या वस्त्राची अगर आसक्ति भासेल तर खास तावडतोब सांग, मी अशा भिन्नीकडे तुझा रस्ता पाहून देईन. परंतु पापवासना पुन्हा मनांत आणूं नकोस असा उपदेश करून, शिवाय त्यांनी शंभर रुपयांची एक करन्सी नोट काढून आशीर्वादपूर्वक माझ्या हातीं पर्वा करण्याचा दिली; तेव्हां मी ती न घेतां त्यांना म्हटलें, " महाराज, आतां माझे प्रत्यक्ष देव आहांत. मला आपण पूर्वीच मार्ग लिहून दिलं आहे. पैशाची भूल तुम्ही माझ्या डोळ्यांवरून काढून टाकली आहे; आणि माझा मधला रस्ता तुम्ही शिक्षणासारखं पवित्र देवमंदिराचं दार उघडून दिलं आहे.

मला वाटत नाहीं कीं, मला यापुढं लग्नाची जरूरी भासेल या शरीराच्या भोगवासना किडून यापूर्वींच मेल्या आहेत तथापि देवाच्या करणीनं जर मला नवचैतन्य आलंच तर, मी आपणास विचारल्याशिवाय या शरीराला कोणालाही स्पर्श करूं देणार नाहीं. मला आशीर्वाद द्यावा." मग मला त्यांनीं आशिर्वाद दिला. नंतर मीं १९२१ सालापर्यंत शाळामास्तरीण होतें, पुढें टिळकांचा अवतार संपून आपला झाला आणि शाळ्यात्यातीलही दिपरी घार गेल्या तीन वर्षांत जी माझ्या नासात वसली

आम्हास कळला नाहीं मागी . तू स्थं आश्रमात मोलकरणीचं काम कां करतेस ? शिक्षकिणीच का करीत नाहींस ?

" कारण शिक्षकिणीला अवश्य असणारं पवित्र मन माझं नाहीं म्हणून कोणत्याही लहान मुलीकडे पाहिलें म्हणजे मला, माझ्या लहानपणची आठवण होते. आणि मग माझ्या डोळ्यात तेंच पापी पाणी चमकतं त्यामुळं मी किती जरी उत्कृष्ट धडे शिकविले, तरी मुलींवर माझ्या धड्यापेक्षा माझे डोळेच जास्त परिणाम करितात. एकदां एका मोठ्या मुलीनं, आपल्या बरोबरीच्या मैत्रिणीला म्हटलेलं मी ऐकलं कीं, मास्तरीणबाई कशा पहातात पहा ! जसा कांहीं त्याचा नवराच त्यांना बोलवायला आला आहे. हे शब्द कानीं पडताच मला राग तर आलाच, पण आनंदही वाटला. कारण माझा तो पहिला पोरगा वारून आज बावीस वर्षे होऊन गेलीत, तरी तो मला रात्रीचा जणूं अजून बोलावतोच आहे

असं वाटतं खरं. महात्माजी ! प्रेम हें उभ्या आयुष्यांत एकदांच येतंनाहो ?"

"भागी ! तुझा प्रश्न असा आहे कीं, " गांधींनीं उत्तर दिलें, "त्याचं उत्तर देण्याला मी त्या प्रकारच्या अनुभवापासून हल्लीं फार दूर आहें. हल्लीं मला असं वाटतं कीं प्रेमाची ज्योत केव्हां जरी पेटली तरी ती अखंड चालते. देवानं लाविलेला दिवा कधींच विझत नाहीं. त्या दिव्याच्या उजेडात कधींहि कोणाचं भय उरत नाहीं. जीवमात्रावर प्रेम करावंसं वाटतं; कारण जीवमात्राच्या ठायीं त्या दिव्याचा उजेड दिसतो !" बोलता बोलतां गांधी स्वस्थ बसले. थोड्या वेळानें त्याच्या तोंडातून नरसीमेहेत्याचें पद पडूं लागलें. गांधींबरोबर भागीनेंही तें पद म्हटलें.

§ ३ गीत म्हणण्याच्या भरांत गांधी भागीला मुख्य प्रश्न विचारण्याला अजिबात विसरून गेले. वा त्याना समाधींतच उत्तर मिळून, त्याच्या जिवाला स्वस्थता वाटली ! पण ते भागीला म्हणाले "आमचं या जन्माचं काम दिसायला फार कठीण आहे; पण मला त्याचा शेवट आताच दिसतो आहे. कांहीं काळ खूपच धुमश्चक्री माजेल, दिशा धुराळ्यानं धुंद होतील, सर्व प्रकारच्या, जुलमाखालीं दडपलेल्या वृत्ति, त्वेषानं क्वचित् द्वेषानही उसळ्या मारतील, कांहीं ठिकाणीं रक्तपातही होतील. पण ध्यानात धर कीं, दास्याचे दिवस सपले, अन्यायाचें तेज पळालें, उमटपणा विलयास गेला; मूर्ख-पणाच्या मर्यादा मोडल्या, देवाचा दीप लागला; त्याचा स्वच्छ उजेड पडला आहे; तेव्हा लवकरच हिंदुस्थानचा सत्प्रेमाचा महामंत्र जगभर दुमदुमलाच आहे असं तूंहि पाहशील !

§ ४ "बापूजी ! ही तार आली आहे." एक स्वयंसेवक आत येऊन म्हणाला. गांधीजींनीं हात जोडून परमेश्वराची प्रार्थना केली, व तार वाचिली,

Complete success in Chicago. Americans do like my idea a club of senators, editors and scientists is formed to preach breaking of all Empires and substituting a world Empire with Benares as the Capital. Gulab turns up a good poetess and musician.

Mrigendra.

महात्माजींनी भागीला तार वाचायला दिली; व आपल्या " यंग इंडियां " तही छापण्याकरतां स्वयंसेवकाकडून पाठविली; नंतर ते भागीला म्हणाले; " कशी पोरं निघालीं पहा ! "

" फारच सुरेख ! गुलाबचे आईबाप कोणी तरी थोर असलेच पाहिजेत. "

" शंकाच नाहीं, मला तर वाटतें कीं तूंच तिची आई असावीस. "

" इश्श ! अन् दादासाहेब तिचे पिताजी ! झालं ! "

" कशावरून नसतील ? "

" खात्रीनंच नाहींत. कारण गुलाबची आई मला माहीत आहे. "

" कोण ! कोठें ? "

" कोठे आहे हें मला माहीत नाहीं. पण ती एका तपस्विनीची मुलगी आहे खरी. "

" सारंच विलक्षण ! तपस्विनी खरी; पण ती जात कोणती ? तिनं आपल्या मुलीला खानदेशात निवडुंगात का टाकलं ? "

" निवडुंगात ? अस्स ! आता आलं लक्षात ! माझ्या बहिणीवर तोहमत आली होती म्हणून मी मध्यें सांगितलं होतं ना ? तें हेंच प्रकरण असेल बरं का ? हें पहा, माझ्या बहिणीला मग व्यर्थ कैद झाली म्हणावयाची. गुलाब ही कांहीं तिची मुलगी नव्हे; व माझीही पण नाहीं. त्या तपस्विनीनं आपली पोर माझ्या बहिणीजवळ दिली असेल. तिनं विश्वासघातानं तिला टाकून दिलं असेल, व ती हजरीबिबीला सापडली असेल पण मलाही यापेक्षा जास्त कांहीं माहीत नाहीं. ती तपस्विनी आपल्या आश्रमात कधीं तरी आल्याशिवाय राहाणार नाहीं. आपण तिच्या शोधात असूं या. बाकीं बापूजी, एक नक्की कीं, गुलाब कांहीं सामान्याची पोर नव्हे. "

" पाहूं या. बरं आता मी निजतों. तूंही नीज जा. "

§ ५ " मिळून काय ? " गांधी निजल्या निजल्या विचार करीत होते. "गुलाबच्या जन्माविषयीं निश्चित असं कांहींच नाहीं. ती मृगेंद्राची बहिण नाहींच असंही म्हणता येत नाहीं, कीं अस्पृश्याची मुलगी असंही नक्की नाहीं. नक्की एवढंच कीं, ती या भागीची किंवा भागीच्या बहिणीची मुलगी नाहीं; असो. चला एक संकट टळलं —

## महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

इतक्यांत त्यांच्या पर्णकुटीचें दार एकदम उघडलें व आंत एक मुलगी एकदम आली; व गांधींना हात जोडून म्हणाली, " मला वांचवा हो वाचवा ! आईईईए ती मटकन् खालीं बसली; व महात्माजी दिवा मोठा करून पाहतात तों, मणिला बाळंत होऊन तिला मुलगा झाला !!! त्यांनीं तावडतोब भागीला बोलावून आणिलें व तिच्याकरवी चार पोक्त बाया गोळा केल्या. पण त्या येईपर्यंत स्वतः त्यांनींच त्या मुलाचें नालच्छेदनादि व मणिलेचीही योग्य तजवीज केली. बाया येताच कांहीं जणींनीं मणिलेला खाटेवर निजविलें; व कांहीं जणींनीं मुलाला न्हाऊं घालून गांधीजवळ दिलें. गांधी पाहतात तों मुलगा हुबेहूब दुसरा मगंद !!! आणि तो मुलगा जणों गांधींना म्हणत होता

गांधी महात्मा खरे ! पण सैतान कीं साधु ?

पुस्तक दुसरें

# सैतान !

भाग चौथा

.धींचा पहिला विजय

"—There are thousands of tall Rajputs who would like nothing better than to take up sword and buckler in defence of their patron divinity if exposed to insult, or of any other sacred institution The prophets and inspired teachers of purified Brahmanism are very numerous The saints and semi-divine personages still appear, so that, although orthodox Brahmanism may not deserve credit for all these movements, yet any one who surveys India, must acknowledge that Brahmanism, tried by this criterion is decidedly alive."—Asiatic Studies

Sir Alfraed cheyall

§१ मणिलेच्या बाळाला आज तिसरा दिवस होता. आणखी दोन दिवसांनी त्याची पाचवी पुजावयाची होती. त्याच्या पांचवीला कोण काय पुजणार होता. हें एक फक्त हरीलाच माहीत होतें. परंतु आज, तिसऱ्या दिवशींच गांधींच्या जिवाचें नुसतें रान झालें होतें. मणिलेच्या बाळंतपणाची खबर तिच्या भावाला कळविणें प्राप्त होतें; आणि तो तर आपलें सैन्य बार्डोलीच्या स्वयंसेवकांवर रोखून बसला होता! तरी देखील महात्माजींनीं त्याला जी तार पाठविली ती वाचनीय होती. ती अशीः—

Dear Captain

Dear Manila delivered a son in my cottage. Son looks very brilliant, and the wording of the Almighty on his ·palms and face shows the holiest descent. Both are in sound health. If you find time, you may come and have a look at your nephew, but Duty first! May God bless you and give you courage of a true soldier to fight out a just cause to its end

Gandhi.

ही तार हातात पडली तेव्हाच माधवरावाच्या हातात दुसरीहि तार होती. ती अशीः—

Be ready! keep calm! Waste not, haste not! No unnecessary bloodshed. Wait orders!

Goddard.

अशा दुहेरी पेचात माधवराव सांपडले होते. मणीला गांधींच्या आश्रमात कशी बाळंत झाली हेंच त्यांना कळेना. तिला अजून महिना दोन महिने अवकाश होता; आणि तोंपर्यंत आपण मुंबईस परत जाऊं अशी माधवरावांना अपेक्षा होती, व आपल्या गैरहजीरीत त्यांनीं तिला मुंबईसच एका चांगल्या संस्थेंत ठेविलें होतें, तसा आपल्या पश्चात् बाळंतपणाचा प्रसंग आलाच तर त्यांनीं एका नामांकित दवाखान्यात अगोदरच सांगून व्यवस्था करून ठेविली होती. मग हें कसें झालें?

# महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

मणीला गांधीकडे कां गेली ? कशी गेली ? कोणाला विचारून गेली ? एकटीच गेली कीं बरोबर कोणाला तरी घेऊन गेली ? आणि गांधींच्याकडेच का गेली ? दादा-साहेबाच्याकडे सुद्धां गेली असती तरी त्याला तें खपणार नव्हतें; तर प्रत्यक्ष सैतानाकडेच—

त्यानीं ती तार पुन. वाचिली. पहिल्या सटक्यात तर त्याना क्रोधानेंच पछा-डिलें होतें; पण मणिलेचा मुलगा शुद्ध बीजाचा दिसतो, असें गांधींनीं कीं लिहिलें असावें, याविषयीं आता त्याचे विचार सुरू झालें. गांधींसारखा मनुष्य, आपल्या व्यंगाचा फायदा घेऊन, आपणास केवळ टोंचून बोलण्याकरतां असें मुद्दाम खोटें लिहील, ही शंका देखील त्याच्या मनाला शिवली नाहीं. आपण त्याच्या स्वदेशभक्तीच्या एका अद्वितीय कार्याची राखरांगोळी उडविण्यास जय्यत तयार आहोंत, यामुळें तर तो आपला शत्रु, आपल्या मर्मीं हा घाव घालीत नसेलना ? अशी शंका त्याच्या मनात एकदम चमकून गेली, परंतु तिचा त्याच्या बुद्धीनेंच एकदम इनकार केला ! अशक्य ! गांधीकडूनही सूडबुद्धि चुकूनसुद्धा दाखवली जाणार नाहीं, अशी त्याची खात्री होती. मग या वाक्याचा अर्थ काय ? प्रत्यक्ष गेल्याशिवाय कसें कळणार ! आणि अशा स्थितींत कसें जाव-याचें ? त्यानीं दुसरी तार उचलून वाचिली, Be ready !

" अरेरे ! " तो शिपायी बाप्याचा हिंदू तळमळूं लागला ! " काय ही नोकरी ! काय हा पेशा ! प्रत्यक्ष मुलीसमान सख्ख्या वहिणीलासुद्धा भेटता येईना !" त्याचे डोळे डबडबले. त्यानीं शून्य मनानें समोर पाहिलें. तों काय ? शेंकडों स्वयं-सेवक व स्वयंसेविका, शुभ्र व शुद्ध खादीच्या पोषाखात, राष्ट्रीय झेंडा हातात घेऊन, राष्ट्रीय गीत गात गात, लष्करी शिस्तीनें रस्त्यावरून मिरवणुकींत चाल-लेल्या त्याना दिसल्या. अशा मिरवणुकी त्यानीं अनेकदां पाहिल्या होत्या. परंतु आज मात्र त्याना, त्या प्रचंड मिरवणुकीकडे पाहून गहिंवरून आलें ! ते गदगदून पुटपुटले !

" या तरुणापैकीं किती तरी जण आपल्या आईबापाना, भाऊ बहिणींना सोडून इथें आले असतील ! यापैकीं कित्येकांच्या घरा आज म्हातारी माणसं अन्नाच्या काळजीनं व्यग्र असतील ! यापैकीं कित्येकांच्या घरीं त्याच्या वहिणी

प्रसूतिवेदनांनीं तळतळून भावाच्या, पतीच्या, बापाच्या नावानं आक्रोश करीत असतील !—

इतक्यात त्या स्वयंसेविकांच्या पलटणांपैकीं एक तरुण मुलींची पलटण, त्याच्याच बंगल्यासमोर येऊन उभी राहिली. तिची सेनानायिका गरोदर होती. तिनें आपलें विशाल पोट तोफेच्या तोंडीं ठेवून मोठ्यानें म्हटलें, " बाळा ! आमच्या मातृभूमीच्या प्रेमामुळें आम्ही मानवजातीच्या स्वातंत्र्याकरता, आज जुल्मा-विरुद्ध शांततेनें लढत आहोंत या लढाईंत तूं जर प्रसंगवशात मजबरोबरच समरांगणीं पडलास, तर मी फिरून इथेंच जन्म घेईन, व तूं फिरून माझ्या उदरीं ये, व आपण दोघेंही फिरून ही अशीच शांततेची लढाई करूं राष्ट्रस्वातंत्र्य मिळे-पर्यंत आपण हें असेंच जन्मोजन्मीं लढत राहूं कॅप्टन माधवराव मोघे ! तुम्हीसुद्धा *आम्हास येऊन मिळाल काय ?* "

तो हृदयभेदी देखावा पाहून माधवरावाच्या नेत्रापुढें काळ्यानिळ्या रेघा दिसावयास लागल्या ! " तरवार तीक्ष्ण कीं प्रीति तीक्ष्ण ? " अर्थात् प्रीति तीक्ष्ण याची त्याना खात्री पटूं लागली " तोफेचा गोळा जिवंत कीं, भगिनीचा गोळा जिवंत ' " ह्याचें उत्तर, भगिनीचाच जिवंत, तोफेचा मृत, हेंच त्याना पटलें. त्यांनी तावडतोब धावत जाऊन त्या स्वयंसेविकेला, बंधुभावानें आलिंगिलें व प्रेमावेगानें म्हटलें, " अशा बहिणींची हाक कोणता भाऊ ऐकणार नाहीं ? भगिनी ! निदान मी तरी जिवंत असेपर्यंत, तुझ्या या गर्भाला धोका नाहीं ! " गांधी महाराज कीं जय ! एकच आरोळी आकाशात दुमदुमली. लोकमान्य महाराज कीं जय ! दुसऱ्या शेंकडों पथकांनीं प्रत्युत्तर दिलें. पाच मिनिटात सगळीं पथकें शिबिरात निघून गेलीं. कॅप्टन माधवराव मोघे मात्र एकटे तोफेच्या तोंडीं उभे राहिले.

§ २ चांगलें तें आरंभापासून देखील चांगलें असतें. निदान एशिया खंडांत तरी हा नियम सर्वमान्य आहे.

Europe is a land of paradoxes, America is a land of Libertiy अशा म्हणी आहेत पण Asia is a land of Divinity हें प्राचीन तत्त्व पुन: प्रस्थापित व्हावयाचें आहे तें लोकमान्य टिळकांच्या



११

तपश्चर्येनें व महात्मा गांधींच्या भक्तीनें आतां जगाला दृश्यमान होऊं लागलें आहे. त्या तत्त्वाच्या प्रकाशात जो सापडला त्याला तर तें तत्त्व अनुभवासही येऊं लागलें आहे. निदान कॅप्टन माधवरावांना तरी त्याच क्षणीं आले, कारण ते तोफेच्या तोंडीं असतानाच त्याना एक तार आली. ती अशी;

S nd back youı compıny to Bombay immediately No need for the present.

Go lard

तत्क्षणीं माधवरावानीं आनंदानें उडी मारिली! आपल्या लेफ्टनंटकडे तें काम सोपवून त्यानीं पाच मिनिटांत आपली मोटार साबरमतीकडे वळवळविली. ते रस्त्यानें म्हणत होते. " ही आमची सुवर्ण प्रभात होय! ".

योग्य वेळीं ते गांधींच्या पर्णकुटींत जाऊन पोंचले, तेथें पाहतात तों त्यांना मणिलेच्या खाटेजवळ गांधी, राधाबाई, नलिनी, व सुरेंद्र, व काहा भिक्षुकमंडळी दिसलीं! त्यानीं प्रथम मणिलेचे पटापट मुके घेतले, व मग ते गांधींना म्हणाले, " प्रथम मी आपले आभार मानतों. पण हें सारं कसं काय झालें व या आपल्या तारेचा अर्थ काय, सागाल काय? "

" माधवराव! आपण शात व्हा! " सुरेंद्रबाबू म्हणाला, " महात्माजींना यानंतर काहींसुद्धा माहीत नाहीं. खुद्द मणिलेलासुद्धा अजून माहीत नाहीं,महात्माजींची शुद्ध बीजाविषयीं नुसती कल्पनाच आहे—"

" नुसती कल्पनाच का? " माधवरावानीं हताश होऊन उद्गार काढिला.

" तरीपण ती दैविक स्फूर्तीची कल्पना आहे. ती अक्षरश: खरी आहे. मणिलेचा मुलगा अत्यंत शुद्धबीजाचा आहे. आई! हा बाळ तुझाच नातू आहे! घे याला!!" " नाहीं! हा माझा नातू नाहीं! " राधाबाई ओरडून म्हणाल्या. " मी लाखदां सांगितलं आहे कीं माझा मृगेंद्र तसं घाणेरडं कृत्य चुकूनही करणार नाहीं. " "आई! तुम्हंही म्हणणं बरोबर आहे. मृगेंद्रानं घाणेरडं कृत्य केलंच नाहीं त्याचा मणिलेशीं रितसर विवाहच झाला आहे! हा पहा त्याचा नंदिदुर्गातला लग्नाचा फोटो! आणि हें पहा ते तिचे भटजी! असें म्हणून त्यानें आपल्या आई जवळ तो फोटो दिला, व भटजींनाही पुढें केलें.

म्हातारीला तो फोटो तर पटलाच; पण अत्यंत वाईटही वाटलें. तो फोटो सगळ्यानींच पाहिला; व तो सगळ्यानाच पटला. गांधीनीं मात्र आपल्या हातानून दुसऱ्या कोणास तो दिला नाहीं; व त्यानींच मग त्या भटजींची साक्ष घेतली. आपण तो विवाह लावून दिला आहे, हें त्यानींही कबूल केलें मग गांधी म्हणाले,

" पण मणिले ! तूं कशी काय बोल्ली नाहींस हें ? "

" मी काय बोलणार ? " मणिला म्हणाली, " चाकराशीं लग्न लाविलें हें सांगूं ? " मृगेंद्राचा पोषाख करून तो चाकर आला. फोटोंतही खरा मृगेंद्र नाहीं. तोतया मृगेंद्र आहे. '

ती रडूं लागली. पण तरीही राधाबाईला म्हणून तिची कींव आली नाहीं. तिचें मातिप्रेम, व पातिव्रत्यापेक्षाही वात्सल्यच जास्त उसळून आलें. ती चटकन् उद्गारली, ' तरी मला वाटलच होतं असं काहीं तरी बेंड फुटणार म्हणून ! नलिनी ! तूं असं काहीं करूं नकोस हो ! आपली मजजवळ असत जा कशी नेहमीं ! "

" आई ! " सुरेंद्र गंभीरपणें म्हणाला, " मणिलेला उगीच दूषणं लावूं नकोस. ती तुझीच सून आहे. ती मृगेंद्राचा पोषाख घेतलेल्या त्या चाकराचीच बायको आहे, पण तो लबाड चाकर मात्र दुसरा तिसरा कोणी नसून तुझा हा धाकटा सुरेंद्रबाबूच आहे ! " मणीले ! माझ्या सगळ्या अपराधाची मला क्षमा कर ! माधवराव ' आपल्या वडिलाच्या निधनाची सारी जबाबदारी या दादासाहेबाच्या धाकट्या मूर्ख सुरेंद्रावरच आहे !

त्याच्याकडून पुढें बोलवेना. तो खालीं पाहून रडूं लागला. तसे महात्माजी उठले व त्याला पोटाशीं धरून म्हणाले,

" बाबू ! पश्चात्तापासारखं अन्य प्रायश्चित्त नाहीं ! झाल्या गोष्टी होऊन गेल्या. यापुढें आपल्या पत्नीबरोबर सुखानं संसार कर व परमेश्वराला स्मरून कर्तव्यतत्पर रहा. माधवराव ! घ्या याला पोटाशीं ! "

" मणिलेचं मार्थं उजळ झालं " माधवरावाच्या आवाजात कणखरपणा आला; " म्हणून एका डोळ्यात आनंदाश्रु गाळणं मला जरी भाग आहे, तरी असल्या पोरकट लीलाच्या पायीं आमचे वडील मेले हें मात्र खोटं नाहीं. "

" माधवराव ! " सुरेंद्र निवळून म्हणाला. " तुमचं म्हणणं अक्षरशा खरं आहे. पण माझा पेंच आपण निदान ऐकून तरी घ्यावा, व नंतर मला वाटल्यास क्षमा करावी, "

पण तिकडे राधाबाईंना वात्सल्याची कळ सोसवेना. तिनें मणिलेचे पटापट मुके घेतले, व आपल्या नातवास घेऊन ती त्याला खेळवूं लागली ती गांधींना म्हणाली, " याचं नाव काय ठेवायचं ? "

" मृगेंद्र " गांधी म्हणाले.

" बरोबर आहे " सुरेंद्रबाबू ओरडून म्हणाला, "त्याचं नाव मृगेंद्रच ! कारण काय ? तर आता माझी गोष्ट ऐका म्हणजे समजेल. "

§ ३ " महात्माजी ! " सुरेंद्रानें आपल्या विवाहाची गोष्ट सांगण्यास सुरुवात केली, " मी नुकताच आय. सी. एस् होऊन, व प्रोबेशनचं वर्ष पुरं करून बेदनूरला प्रान्ताधिकारी झालों होतों. त्यावेळीं मी २१ वर्षांचा होतों. अण्णा, मृगेंद माझ्यापेक्षा तीन वर्षांनीं मोठा; असो मला बेदनूर मुक्कामीं दादाचं पत्र आलं कीं, " जनरल मोघे यांची अशी इच्छा आहे कीं, मणिलेचा तुझ्याशीं विवाह व्हावा. तेव्हा तुला जर तिच्या स्वभावाची अगर आवडीनावडीची पारख करावयाची असेल तर तूं मधूनमधून नंदिदुर्गाला जात रहा. जनरल साहेब तिथं स्वता वारंवार नसले तरी त्याची विश्वासाची माणसं तिथं असतात, शिवाय मणिला ल्हान असली तरी हुषार मुलगी आहे असें जनरलसाहेब म्हणतात. त्यांचा व माझा विशेष स्नेहसंबंध आहे. तरीपण नोकरीमुळं आमच्या मुलाबाळांची ओळख होऊं शकली नाहीं. तथापि तुमचें वधूवरांचें प्रेम जुळलें तर जनरलसाहेबाशीं नजिकचा संबंध होणार आहे; व त्यामुळं मला केव्हाही आनंदच वाटेल. " या पत्रानंतर मी पंधरावीस दिवसांनीं, फिरतीवर असताच, सहज मोटारनें नंदिदुर्ग ला जाऊन आलों. जनरल मोघे भेटले नाहींत. पण मणिला भेटली. तिला पाहून तीजविषयीं माझं मत चागलं झालं. नंतर तशाच तीनचार भेटी घेऊन माझं अनुकूल मत मी दादांना लिहिणार होतों, व तशा भेटी घेतल्याही. पण शेवटल्या भेटीला मला असं दिसून आलं कीं, 'आईच्या, किंवा तशा कोणा वडिलधाऱ्या माणसाच्या अभावी मणिलेच्या ठायीं अल्लडपणा जरा जास्तच आहे. त्याचं मला इतकंसं वाटलं नमतं. पण तिला चाकरमाणमाशीं जरा जास्तच सलगीन खेळणं

आवडतं, हें मला आवडलं नाहीं. त्यातून जनरलसाहेबाच्या नावान खडे फोडणाऱ्या नोकराशीं तिनें तसं सलगीनं रहावं हें चमत्कारिक होतं. शिवाय मी आणखी एक चमत्कारिक गोष्ट पाहिली. ती अशी कीं, ती मला मृगेंद्रच समजत होती. मृगेंद्रावर तिचं प्रेम असावं अस स्पष्टच होतं कारण तिनं एकदा त्याला पाहिलं होतं, व त्याच्या भेटीच्याच ती आवडीनं गोष्टी सांगे. तिचा तो समज मला सहज दूर करून मजविषयींची तिची भावना ओळखता आली असती परंतु तिची चाकराशीं असलेली सलगीची वर्तणुक, पुढें मागें मृगेंद्रालाही नडणारी होती. तथापि त्या सलगीचाही भलताच अर्थ होऊं नये, म्हणून तिची परीक्षा घेण्याकरता, मी तिच्या वर्णनाप्रमाणं मृगेंद्रासारखा पोषाख केला, व तिजकडे गेलों. तिला वाटलं कीं मी, मृगेंद्रच असून तिला भेटायला आलों मी थाप मारली कीं, मी मृगेंद्रच असलों तरी नोकरी करता आलों आहें, अशी बतावणी करणं भाग आहे तिनं मला ठेवलं, आणि नंतर अवघ्या चार दिवसात आमची भलतीच सलगी झाली आज इतक्या दिवसाच्या मन.संतापानंतर अक्षरश: कबूल करतों कीं ती सर्वस्वीं माझी एकट्याची चूक होय पधरा सोळा वर्षांच्या मातृविहीन बालिकेची ही अशी परीक्षा घेणं व त्यात ती पडली म्हणजे तिला संकटात लोटणं भयंकर पापच होय. परंतु, माधवराव शांत चित्तानं ऐका, कीं माझंही वय त्यावेळीं किती ल्हान होतं बरं? शिवाय नंदिदुर्गाची ती कामोद्दीपक वनश्री, हवा, पाणी, आमचं वय, मणिलेची अरक्षित स्थिति, माझं विलायती शिक्षण, माझं गृहशिक्षण, वगैरे लक्षात घ्या, व मला क्षमा करा. एवढंच नव्हें, तर मला क्षमा करण्यासारखी मी एक गोष्ट ही केली आहे ती अशी कीं, दुसऱ्या दिवशींच मला पश्चात्तापाची लहर येताच, तिचा फायदा घेण्याच्या सदिच्छेनें मी तावडतोब मणिलेशीं प्रत्यक्ष विवाह चालवून घेतला, एवढंच नव्हें, तर चटकन् बेंगलूरला जाऊन हा आमचा फोटोहि काढून घेतला. अर्थात्च मी सुरेंद्र आहें, मृगेंद्र नव्हें, हें माझ्या बायकोला मला सांगता येईना. मी मृगेंद्रच हें मान मी तिला, ती वश होईना, असें पाहून मागितलं होतं. मी मृगेंद्र असून, चाकराच्या मिषानं तुजकडे एवढ्याकरतां आलों आहें कीं, माझ्या धाकट्या भावाशीं म्हणजे सुरेंद्राशीं तुझा विवाह ठरला आहे, तो अज्ञानंच

खात्रीनें मोडेल अशी मी तिजजवळ वतावणी केली, ती चांगलीच फलप्रद झाली. पुढें आपणांला भेटायला येतों तो सुरेंद्र आहे, मृगेंद्र नव्हे, खरा मृगेंद्र तो हा आपला चाकर, अशी खात्री पटतांच, अथवा भूल पडतांच, तिनं वडिलांना कळविलं कीं, सुरेंद्राशीं आपणांला लग्न करायचं नाही. आपलं मृगेंद्राशीं लग्न झालं आहे हें मात्र तिनं कळविलं नाहीं; कारण मीच तें गुप्त ठेवण्याची तिला ताकीद दिली होती."

" ही आजदेखील "ब्हिलनी"च नाहीं कां होत ? " गांधींनीं विचारलें.

" हें ठरवण्याचें काम मी एकट्या मणिलेवरच सोंपवतों. "

" आता ती आपल्या पतीला खलपुरुषच कशी म्हणेल ? "

" मला वाटतं कीं तेव्हां सुद्धां हिनं मला तसं ठरवलं नसतं कारण मी हिला विवाहानंतर लवकरच विचारलं होतं कीं, " तुझं सुरेंद्राशीं लग्न लागलं असतं तर कसं झालं असतं ? तेव्हां हिनं उत्तर दिलं कीं, " मला आपण आवडता याचं कारण आपली ल्हानपणची ओळख. सुरेंद्राचा स्वभाव देखील गोड आहे; पण तें मला थोडेसें मत्सरी वाटतात. तसंच म्हणाला तर संशयी माणसाशीं लग्न करून त्याला वठणीवर आणावं असं वाटतं. पण आपणांवर माझं प्रेम आहे खरं" यावर मी म्हटलं कीं, " मणिले, माझ्याशीं ( म्ह० मृगेंद्राशीं ) लग्न करून तूं उलट्याच काळजींत पडशील. तुला सवत सोसावी लागेल. " तेव्हा तिचं रूप पाहाण्यासारखं होतं. दुसरें अनंतराव मोघे ! तेव्हा मात्र मला वाटलं कीं, हिला अप्पाचा वाङ्निश्चय माहीत नाहीं हेंच बरं आहे. आता, मणिले, तूंच सांग कीं, मी ब्हिलन् होतों का, व आताही आहे का ? "

" आपण एक खचित आहात. आपण मृगेंद्राचे वडील आहांत ! "

ह्या चाऱ्ही बाजूंनीं सणसणीत टोला ऐकून सर्वांनाच समाधानाचें हंसू आलें. पण सीनियर ( मोठ्या ) मृगेंद्राचे वडील ( दादासाहेब ) हजर असते, तर त्यांना काय वाटलें असतें हें राधाबाईनाच जास्त माहीत. कारण त्या तावडतोब उद्गारल्या, " बरं झालं कीं, हें ऐकायला मोठ्या मृगेंद्राचे वडील इथं नाहींत. "

" पण काय हो बाबूराव ! " माधवराव म्हणाले, ' हें गुप्त प्रकरण परवांपर्यंत गुप्त ठेऊन आपणांला काय मिळालें ? "

" मणीलेचा स्वभाव चागलाच पारखतां आला. आतां मला सासरा उरला

नाहीं खरा. परंतु माधवराव! खरंच सागतों कीं, त्याच्या हार्टडिझीजची, व तापट स्वभावाची मला मुळींच माहिती नव्हती. शिवाय ते दादाच्याकडे गेले केव्हा, त्यानीं मणिलेला घेऊन बार्डोली गाठली केव्हा, व तो अनिष्ट प्रकार घडला केव्हा याची मला खबर कळली. ती एकदम वर्तमानपत्रातच, आणि त्यावेळी गौप्यस्फोट करणें म्हणजे माधवराव, तुम्हालादेखील, रागाच्या भरात, बहिणीला स्वहस्तें वैधव्य देण्याची संधी देणेंच होतें. आणखी असं कीं, मी बेदनूरहून एकदम अमदाबादला आलों व नंतर एक विलक्षण कल्पनेनं एकदम, वडिलाना न विचारताच, ज्युडिशियल् लाइन् घेतली."

"कोणती कल्पना बाई!" मणिलेनें विचारलें, "क्षेमकल्याणी घराणं म्हणजे A house of new ideas दिसतं!"

ह्या टोंकेमुळें गाधींना झालेला आनंद गाधींनाच माहीत.

"मला, मणिले, तुझी फार भीति वाटत होती." सुंदर म्हणाला.

"माझी?"

"हो. मला असं वारंवार वाटाव कीं, तूं आपलं अथवा गर्भाचा काहीं तरी बरं वाईट करून घेशार."

"इश्श! माझं लग्न झालं होत, ही तर माझी खात्री होतीना!"

"खरं, पण हें जग आहेना? या जगात प्रत्यक्ष पापपुण्याच्या खरेपणापेक्षा लज्जेची अथवा डागोऱ्याचीच जास्त किंमत असते. म्हणून तर मी लाईन बदलली. हेतु हा कीं, तसं काहीं झालंच तर मी तरी त्या केसचा जज्ज असावा. शिवाय आणखी एक ड्रॅमॅटिक सीन मला करता आला असता!"

"कोणता?"

"हॉल् केनच्या master of man नामक कादंबरींतल्या नायकासारखा, भर कोर्टात, जजानं आपणच तो गुन्हेगार हे सागण्याचा."

"शाबास" गाधी म्हणाले, "आम्ही हिंदू न कळत कसें पाश्चात्याच्या घातुक वळणावर जात आहोंत हें यावरूनही सिद्ध होत नाहीं का? मुळात आमच्या समाजात कुलशील पाहूनच विवाह लावण्याची चाल ही कोर्टिंगपेक्षा चागली नाहीं का? कोर्टिंगमध्यें जें वधूवराच्या ओळखींचं तत्त्व आहे तें आमच्या

## महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

चालींत सहजासहजी घडून येतं, व कोटिंगचा हा असा घातुकपणाही उरत नाहीं. टॅम् टॉमिंग हें पाश्चात्यांचं जणूं रहस्यच आहे; व सहजपणा हा आमच्या रोमरोमीं भिनला आहे. बाबूराव ! तुमची मग मणिलेनं भलतीच निराशा केली म्हणायची ? मणिले, तुझं याच्याशीं कसं जुळणार ? "

" उलट विचारलं पाहिजे. माझं मणिलेशीं कसं जुळणार ? "

" का बुवा ? "

" एक तर मला या सरकारी नोकरीचा इतका तिटकारा आला आहे कीं विचारूच नका. "

" इतक्या लवकर ? "

" फक्त पंधरा महिने. पण मणिलेला नऊ महिने जसे भयंकर कष्टात गेले तसेच ते महिने मलाही गेले. मणिलेला पाळत ठेवण्याचं राहो, तिच्या हालचाली सुद्धा माझ्या फिरतीच्या धागडधिंग्यानं मला समजेनात. "

पण आता ज्युडिशियल लाइन् आहे ना ? "

" तिचं विखारी पाप आपणच इतक्यात सांगितलं ना. शिवाय बरोबर इच्या सारखीच एक केस मजपुढें आली होती. तिच्यात केवळ पुरावा मिळाला नाहीं, म्हणून मला त्या मुलीला शिक्षा ठोठावावी लागली त्यावेळीं मी मनात ठरविलं कीं, आपला गौप्यस्फोट करावयाचा. पण महात्माजी ! आपण थोर आहांत ! आपल्याच कृपेनें तें नाटकी गौप्यप्रदर्शन न होता हें असं शांतरसप्रधान झालं ! अतां मणिले, मी जर नोकरी न करता " महिला• जनसेवा " केली तर तुला चालेल ना ? आई ! तुझं काय म्हणणं आहे ! मृगेंद्र पहा, कशी राष्ट्रसेवा करतो ! आणि मी ? आई ! तूं मला शांततेची देशसेवा करायला नाहीं म्हणशील तरी का ? '

"कशी म्हणेन ? अरे तिकडून झाली तेवढी सरकारी नोकरी, व रावबहादुरी फजिती पुरे झाली. तूं बेलाशक नोकरी सोड व देशभगिनींची खरी सेवा कर. "

" सासूबाई ! मणिला म्हणाली, मीसुद्धां करीन हो."

" कर हो बाळ ! माझा बाळकृष्ण तुम्हाला उदंड आयुष्य देवो ! अन् बच्चा मृगेंद्रा तूंरे ? तूं काय करशील ? "

" तो माझा भाचा ! तो माझा आजच चक्काचूर करणार ! " माधवराव हंसून म्हणाले, तो सांगतो कीं, मामा सोडा ही लष्करी तोफ, व स्वयंसेवकच

द्या." असें म्हणून माधवरावांनीं बार्डोलींतल्या त्या गरोदर स्वयंसेविकेची गोष्ट सांगितली, व म्हटलें " महात्माजी, ज्या बार्डोलींत हा मी मूर्ख कॅप्टन मोघे राष्ट्रभक्तावर तोफा डागून तयार होतों, त्याच बार्डोलींत, त्याच तोफांच्या तोंडाशीं मला राष्ट्रसेवक म्हणून मरावयाचं आहे. मला परवानगी द्या." " माधवराव ! " राष्ट्रसेवा करण्यास परमेश्वराची सुद्धा हरकत चालायची नाहीं, तर मी नकार कसा देऊं ! "

सुरेंद्रबाबू व माधवराव यांनीं लवकरच, दुसऱ्याच दिवशीं सरकारी नोकरीचे राजीनामे दिले. हें सांगणें नकोच परंतु ही बातमी दादासाहेबांना कळताच, ते मोठ्यानें ओरडले;

गांधी महात्माजी खरें ! पण सैतान कीं साधु ?"

“ Therefore, it is unnecessary for a prince to have all the good qualities I have enumerated; but it is very necessary *to appear to have them*. And I shall dare to say this also, that to have them and always to observe them is injurious, and that *to appear to have them is useful*; to appear merciful faithful, humane, religious, upright, and to be so, but with a mind so framed that should you require not to be so, you may be able and know how to change to the opposite. ”

—The Prince

*Nicolo Machiavelli*

## दादासाहेबांचे डाव

§ १ महात्मा गांधींनीं आपल्या संसाराचा पुरा फन्ना उडविला, अशी दादा-साहेबाची रोजच्या रोज जास्त जास्त खात्री पटत जावी. आपले दोन्ही कर्ते मुलगे आपणापासून हिरावून घेतले. त्याच्या लग्नाच्या बाबतींत प्रत्यक्ष बापाचे हक्कदेखील तो गारुडी बळकावून बसला, आणि त्या नीच कृत्याना साळसूपणाचा मुलामा देण्याकरताच कीं काय, आपल्या भोळ्या बायकोचेंही त्यानें मन फित-विलें. कॅप्टन माधवरावासारखा श्रीमंत आजन्म स्नेही, त्याला देखील त्या बनि-यानें मोहनी घालून आपल्या पक्षाला मिळवून घेतलें— अरेरे ! लग्नाच्या बाजा-रात पोटचे गोळे कवडी किंमतीचे ठरवले ! रावबहादुरीला, पोळाच्या बाशिंगाचें हसें चिकटवून तर गांधीनें आपणाला, बिळात दडून बसलेल्या चिचुंद्रीसारखें क-पदार्थ करून टाकिलें, गांधी कोठें व मी कोठें ? गांधींना धड हिंदुस्थानचा सुद्धा इतिहास माहीत नाहीं, अर्थशास्त्रातील अ आ इ ई सुद्धा त्याना कळेना; भगवद्गीतेचें संस्कृत तरी समजत असेल कीं नाहीं, याची शंकाच आहे; जगात समाजशास्त्राची नुकतीच वाढ होत चालली आहे, हें त्याना कोणी तरी जाऊन सांगायला पाहिजे पण, माझ्याशीं, तोंडाला फेस येईपर्यंत बोलला, पण काय बोलत होता, हें त्याचें त्याला तरी कळत होतें का ? मला म्हणतो कीं रूसोचीं confessions वाचा, पण रूसोनंतर आज दोनशें वर्षें जग पुढें गेलें आहे, हेंही दिसत नाहीं— तरीपण त्यालाच आज जगात मान आहेना ? त्याला आज माझा हा एवढा मोठा संसार जाळता आलाना ? तें काहीं नाहीं; त्याचा बंदोबस्त. हा मीच केला पाहिजे, अशी दादासाहेबाची विचारमालिका होती.

पण अशी मालिका करूनच स्वस्थ बसणारे गृहस्थ दादासाहेब क्षेमकल्याणी नव्हते. ते तसे असते तर, खरोखरच एक उत्कृष्ट लेखक झाले असते. कोणत्याही गोष्टीचा यथातथ्य विचार करण्याला जी एक प्रकारची बुद्धितीक्ष्णता लागते, ती त्यांच्या ठायीं खचीत होती. परंतु तशा बुध्दीला त्यानीं राजकारणात घातलें नसतें, किंवा केवळ राजकीय मीमांसेचे ग्रंथ लिहिण्यांत जरी त्यानीं त्या बुध्दीला खर्ची घातलें असतें, तरी दादासाहेबाची चांगली बाजू जगाला दिसली असती. त्यांचीं पत्रें, किंवा त्याचे रिपोर्ट (दादासाहेब एक दोन कमिशनमध्यें होते)

अथवा त्यांचे इंग्रजी व मराठी लेख पाहता, त्यांनीं राजकीय पक्षांपासून अलीप्त राहून, आपल्या लेखणीचीच सेवा राष्ट्राच्या पदीं अर्पण करावयाची होती, असें त्याचे स्नेही सुद्धा त्यांना सांगत. परंतु एक तर त्याचा स्वभावच भारी खटपट्या होता. आपले विचार अर्धे कच्चे ठेवूनच, त्यांनीं आपल्या 'प्रागतिक' ( 'जहाला'-च्या सापेक्षतेनें 'मवाळ' ) पक्षाचीं अनेक महत्वाचीं कामें करण्याचा, व करवून घेण्याचा चंग बांधला. अर्थातूच, त्यांना कर्त्या पुरुषाचा मान मिळे व त्याचा पक्ष, अनेक वेळा सरकारप्रिय असल्यामुळें, त्यांना कीर्तीबरोबर संपत्तीही मिळे, दादासाहेबांना संपत्ति नको होती, अशातला भाग नाहीं उलट, आपली वडिलोपार्जित जिंदगी सोडवून घेण्याकरता संपत्ति हवीच होती, त्यामुळें संपत्तीकरताही त्यांनीं, आपल्या स्वाभाविक बुद्धितीक्ष्णतेला, व्यवहार्य राजकारणांत अडकाविलें. असें म्हटल्यास, तेंही साधारच होतें. वास्तविक पन्नाशीपर्यंत त्यांनीं आपलें उद्दिष्ट कार्य संपविलें होतें आणि ती वेळही अशी होती कीं, त्यांनीं केलेल्या सगळ्या खटपटी खटपटी लोक विसरून गेले असते १९०७ च्या सुरतेच्या बखेड्यांत जे मवाळाग्रणी चमकून गेले त्यांत दादासाहेब खेमकल्याणी म्हणजे मोठेंच प्रस्थ होतें. परंतु १९१६ च्या कॉंग्रेसमध्यें जेव्हा टिळकपक्ष ( "मवाळांच्या सापेक्षतेनें" जहाल पक्ष ) घुसला, तेव्हा जरी दादासाहेबांनीं जगाची माळ हातीं घेतली असती, तरी त्यांच्या नावाचा बोज राहता, नव्हे, त्यांना त्यांच्या बुद्धिप्राविण्यानें तसें देवध्यानीं सहजगत्या लागूं दिलें नसतें तरी, सर्वोत्कृष्ट वाङ्मयाची पैदास त्यांना खास करता आली असती. दोन्ही मुलगे त्यांच्या पेक्षाही जास्त हुषार होते, बायको अत्यंत सालस होती, नाशिकास व सुरतेस घनचक्कर इस्टेही होत्या, प्रचंड लायब्ररी होती, विद्वान् स्नेही होते, श्रीमंतांच्या मुली मुलग्यांना मागून येत होत्या, स्वतःच्या मुलीदेखील चांगल्या ठिकाणीं पडल्या होत्या, कै. सर फिरोजशाहा मेथा यांच्यासारख्या, आणि कै. ना. गोखले यांच्यासारख्या "ऑल्इंडिया रेप्युटेशन"च्या पुरुषांकडून त्यांना " शाबासकी " मिळाली होती, प्रोफेसरीमुळें म्हणा की विद्वत्तेचें काम मनोभावें केल्यामुळें म्हणा, " रावबहादूर " ही राजमान्य पदवी मिळाली होती, परमेश्वरानें स्वभाव देखील चांगलाच रंगेल दिला होता; इंग्रजी, संस्कृत, मराठी व गुजराथी या चार भाषांचें ज्ञान तळहातावरील आवळ्यासारखें, त्यांना ज्ञान होतें; आवळ्याएवढें असें म्हणण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. सुधारक

म्हणून, मोठमोठ्या सुधारकानाही झाडण्याची कीर्ति मिळाली होती, काँग्रेसच्या त्यानीं नियमानें वाऱ्या केल्यामुळें व कांहीं ' रोमान्सेस ' मुळे प्रवासही पुष्कळ झाले होते, खरी असो वा खोटी असो, त्याची अशी कीर्ति असे कीं, एखादी सुंदर बाई त्याना आगगाडींत दिसली कीं, ती ज्या स्टेशनवर उतरेल त्या स्टेशनवर दादासाहेब हटकून, रात्रीं बेरात्रींसुद्धा उतरत; समजले, त्याचे दिवसच असे होते. विलायतेंत सफर झाल्याविना मनुष्यकोटींत गणना होतच नाहीं, अशा त्याच्या खनाऱ्या कल्पनेप्रमाणेंही, याच्या पश्चिमयुरोपातील सर्व राष्ट्रांत प्रवास व सवडीप्रमाणें "रोमान्सेस "ही झाले होते, आणि इतकें असूनही " गलितेंद्रियता" कशी ती त्याना माहीत नव्हती; आणखी काय पाहिजे होतें अशा मत्सरणीय सुखस्थितींत दादासाहेबानी आपल्या लायनरींत, खन चा असा एकतरी ग्रंथ लिहून ठेवावयाला नको होता का ? पण नाहींच. हाडाना जें वळण मिळालें तें हाडाबरोबरच जातें म्हणतात, त्याला अपवाद होण्याची दादासाहेबाची कुवत नव्हती हेंच खरें.

तें दुसऱ्या दिवशीं सकाळीं, " ॲपॉइन्टमेन्ट " करुन कलेक्टरला भेटलेच' आपणाकडे तें का आले, हें मि स्ट्रॉंगसेन्स, याना माहीत नव्हतें, हो मापाच खोटी. पण त्यानीं आश्चर्य दाखवून दादासाहेबाना विचारिलें,

' दादासाहेब, आज तातडीनं मुद्दाम आलातसे ? "

" तातडीनं नाहीं आलों " दादासाहेबानीं कलेक्टराचें वय ओळखून म्हटलें, " आपणास दुसरीं कांहीं कामं असतील तर, मी सायंकाळीं येईन. उद्या येईन हवं असलं तर मला आपणाला फक्त येवढंच सांगायचं होतं कीं, बॉम्बे गव्हर्नमेंटनं गांधींशीं फार त्वरेनं नमतं घेतलं "

एवढंचना ? अहो. पुढें काय अन् आता काय, मारखंच. पण काय करावं, दादासाहेब, तुमच्या पक्षाची आम्हाला कांहीं मदत नाहीं. आजचे प्रागतिक देखील जहाल आहेत. डॉम्पेक्रानिकल हें, फेरोजशहा मेथानीं स्थापन केलेलं पत्र हें तुम्ही तरी आज म्हणूं शकाल काय ? तसेंच डेक्कन मधलं ज्ञानप्रकाश पत्र, केसरीपेक्षाही केव्हा केव्हा जहाल भाषा वापरतें अलिकडे " केसरीच " पुष्कळ चांगला निघतो. त्याची शेरटी ज्वळ जवळ पाताळ गेली आहे पण त्या दिवटीचा प्रकाश केव्हा केव्हा भलताच भाजून काढतो! मित्रांनीं जर आम्हाला सोडलं तर आमचा आम्हालाच मार्ग पाहिला पाहिजे. "

" बाकी तुम्ही कांहीं म्हणा; " दादासाहेबांच्या अंगांत राजकारण शिरूं लागलें; "तुमचंच पुष्कळसं चुकत नाही का ? तुम्ही जसा पूर्वी आमच्यावर विश्वास ठेवीत होता, तसा आतां ठेवतां का ? मला नक्की आठवतं कीं, मोर्ले त्यांनीं आमचं एक करा असं म्हटलन्, तें लॉर्ड सिडेन्हॅम् साहेबांनीं केलं नाहीं असं कधीं झालं नाहीं. अहो, तुम्हांला जर पैसाच पाहिजे असेल तर लागत हवे शिक्षणाला जास्त द्या आणि दारूवर जादा कर ठेवा."

" पण त्यामुळें आमचे जातभाई तिकडे रागावतात ना ? आणखी असं पहा कीं, आमची हल्लींची स्थिति "अमेरिकन् वॉर ऑफ् इंडिपेंडन्स"च्या वेळेसारखी झाली आहे. म्हणजे पूर्वी त्यांचं संरक्षण करण्याकरतां आम्ही फ्रेंचांच्या विरुद्ध लढलों ! आणि त्या सात वर्षांच्या युद्धांत जो खर्च झाला तो देखील अमेरिकेनं दिला नाहीं; आणि मग त्यांनीं चहाचीं जहाजं समुद्रांत उपडीं केलीं काय, अन् युद्ध केलं काय ! काय नाना फेर केले तसा प्रसंग हिंदुस्थानचा आज आहे. साम्राज्याच्या रक्षणाकरतां आम्हीं अब्जोगणती पौंड खर्च करून, नवीं कर्जे देऊन व काढून. गेल्या महायुद्धांत अखेर विजय मिळविला; आणि जरा पुढं उगीच पैकं

" जरूर पाहिलं पाहिजे. आणि आता तर मी स्वतः जास्तच बारकाईनं पहाणार आहे. मी या आर्थिक प्रश्नाचा फार खोल्वर विचार केला आहे, आणि माझी तर खात्री होऊन चुकली आहे की, अशा आणीबाणीच्या प्रसंगी जर हिंदुस्थानानं आपला जबाबदारीचा बोजा उचलला नाहीं, तर नंतर साम्राज्यातल्या स्वयंशासित वसाहतींचे हक्क मागायला त्याला तोंड रहाणार नाहीं; व भोगायला ताकदही होणार नाहीं. या राष्ट्राचं आर्थिक बल मोठं, तें राष्ट्र बलवत्तर असा या हिशाच्या शतस्मातला pro-war सिद्धांतच आहे. "

" अगदीं खरं आहे. पण हें सर्व पुढाऱ्यांनीं जनतेला समजावून सांगितलं पाहिजे दादासाहेब! हल्लीं तुमचा पक्ष अगदीं दुबळा झाला आहे. यावेळीं गोखले अमावस्येचे होते. खरा राजकारणाचा अभ्यासी व साम्राज्याचा कनवाळू, त्याप्रमाणेंच स्वराष्ट्रभक्तही तोच!" "कबूल आहे. पण आजदेखील, नामदारशास्त्री, नारायणराव जोशी, गोपाळराव देवधर वगैरे प्रागतिक पक्षाचे पुढारी महाराष्ट्रात आहेत कीं."

"आहेत, पण ते सगळे एकांडे शिलेदार आहेत. शास्त्री आपल्या वक्तृत्वातच चूर असतात; व त्यांनीं आपली आफ्रिका आणि अमेरिकाच धरून ठेविली आहे. शिवाय त्यांच्या व गोखल्यांच्या स्वभावातही फार फरक आहे. नारायणराव जोशांनीं आपला लेबर प्राब्लेमच उराशीं धरला आहे; आणि देवधराना मेनास दनापलिकडलं जग दिसलच तर कोऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायट्यांचंच दिसत. चतुरस्त्र कोणी चिरा असा गोखल्यासारखा एकही नाहीं. Gokhale was a genius अहो! फार कशाला, आम्हाला आज टिळक सुद्धा खपले असते; पण ही गांधींची लंगोटीचलवळ नको! अहो एकदम भिकारी! अगदींच फटिंग! बरं त्याची पूर्वीची कीर्ति इतकी मोठी की, आज वेडा म्हणून इस्पितळात ठेवण्याची सोय नाहीं! अमेरिकेनंतर त्याला सीजस स्राइस्ट्च करून टाकलं आहे! महायुद्धात आम्हाला कमालीची मदत ह्या एकट्यानं केली; अमृतसरच्या कॅंग्रेसमध्यें टिळकांशीं गृहस्थ भांडला; अन् जालियनवाला प्रकरणापासून—

" बाकीं, तुम्ही काही म्हणा;" दादासाहेबांचें हिंदी रक्त थोडें तरी गरम झालेंच. " तो प्रकार खरोखरच अमानुष झाला. निःशस्त्र पोरांची कत्तल करायची म्हणजे काय?" "झाली खरी चूक;" मि स्ट्रॉंगमेन्स यांनीं एकदम पडतें घेतलें;" "पण आपण सर्वांनीं मिळून तीं सुधारली असती. आम्ही कां रोमन लोक आहोंत, आणि तुम्ही

का त्येविअन्स आहात ? एखादा माथेफिरू निघतोच, आणि त्याला देखील शिक्षा केलीचना ? ईश्वरान देखील त्याला या जन्मींच प्रायश्चित दिल्ना ? पण त्याच्या आणि शेतसाऱ्याचा काय संबंध ? गांधी म्हणतात कीं, change of heart पाहिजे. म्हणतों कीं हें दोघाचही व्हायला पाहिजेना ' तुम्हीच जर उठल्या सुटल्या आमच्या हेतूबद्दल शंका घ्यायला लागला, तर आम्हींही सावध का नसाव ? धर्मांत हात घालू नका म्हणून आम्हाला सक्त ताकीद देऊन ठेवावयाची, आणि मुसल्मानाना डोकीं फोडलीं म्हणजे, सरकारनं तमाशा मात्र पाहिला अस ओरडत सुटायच आता अस्पृश्याना आम्ही, शिक्षण मोकळं करतों तर, तिकडूनही भ्रष्टाकार करता म्हणून गुरगुरायच. खर सांगूं तुम्हाला दादासाहेब, ही प्रेमपॉवर तुम्हांला आमच्या खेरीज कोणी सुद्धां शिकवली नसती, कीं घेऊं पण दिली नसती. आज गांधी जें इथं बोलतात, तें त्याना म्हणावं, इंग्लडमध्यें तर बोलून पहा, म्हणजे तिथलं सरकार राहो, पण आमचे लोकच त्याना चिडवून चिडवून अर्धमेलें करतील माझी फार इच्छा आहे कीं गांधींनीं या लंगोटीच्या वेषांत धर्नेडशॉपुढें जावं "

दादासाहेब मनापासून हंसले नतर थोड्या वेळान म्हणाले, " तें होईल तेव्हां होवो, पण मला वाटत कीं, सरकारनं आता प्रेम ॲन्ड् फिरून सुरू करावा."

" No ! Emphatically no ! " मि० स्ट्रॅंगसेन्म ओरडून म्हणाले ' जमिनीच्या तुकड्याच्या एकीकरणानें गरीब शेतकऱ्याचे हाल वाचतील, पण श्रीमंताना साऱ्याच्या मोठ्या रकमा भराव्या लागतील. म्हणून श्रीमंत दोनचार व त्याच्यावर पोसलेले वकील, संपादक व देशभक्त उगाच आमच्या विरुद्ध गिला करतात.

मुस्कटदाबी करणं हें अस्सल ब्रिटिशाला पहावत सुद्धां नाहीं. उलट आमचं म्हणणं असं आहे कीं, तुम्ही आमच्या राज्यपद्धतीवर बेलाशक टीका करा कीं ! पण भ्रामक कल्पना लोकांच्या डोक्यांत शिरवून, आमच्याविषयीं त्यांच्या मनांत अप्रीति कां उत्पन्न करता ? त्यांत त्या गरिबांचंच नुकसान होतं. आतां ही शेतसाऱ्याचीच चळवळ पहाना ! मला नक्की माहीत आहे, या वाढत्या शेतसाऱ्यान मोठमोठे शेटजी मरणार ? गरिबांचं त्यांत कांहीं नुकसान नाहीं पण हें गरीब शेतकऱ्यांन,

सांगतं कोण ? आणि त्याना पुढें करून हे सावकार व त्याचे स्नेही हे गांधी, आपलं हित साधून घेत आहेत! बार्डोलींतून आम्ही माघार घेतली नाहींच, पण तोफापुढें उभे राहिलेल्या, वहकलेल्या गरिबान्कडे पाहिलं आहे. "

" Right you are, Mr. Strongsense ! " दादासाहेबानीं आपली पसंती दाखविली; व नंतर कांहीं वेळ विचार करून म्हटलें, " मला यातून एक दोन उपाय सुचतात. पहिला उपाय अस्पृश्योद्धाराचा कारण माझी खात्री आहे कीं, तो कलंक जोंपर्यंत आम्हाला चिकटला आहे तोंपर्यंत आम्ही स्वराज्याला लायक नव्हत, गांधींनीं त्या विचाऱ्याना तुर्त सोडून दिलं आहे. मी त्याना यापुढें मदत करणार ! "

" जरूर करा. आमची तुम्हाला सक्रिय सहानुभूति आहे. बरं, दुसरा उपाय ? "

" दुसरा उपाय नेहरू कमिटींत जाऊन, मायनॉरिटीज्च्या हक्काचं संरक्षण करायचं. मुसलमान व शीख, तसेच खिश्चन व जैन हे देखील आमचेच आहेत. ' दादासाहेब गंभीर चेहरा करून म्हणाले.

" अर्थात् ! हा सुद्धा उपाय मला आवडला, आणि मला वाटतं कीं या दोन्हींत तुम्हाला चागलं यश येईल कारण संपूर्ण स्वातंत्र्याचे भोक्ते कॉंग्रेसमध्यें अजूनही थोडेच आहेत. By the bye दादासाहेब, तुमचा, मृगेंद्र म्हणे रशियात गेला आहे ! सांभाळा हो तें कॉम्युनिस्टांच आम्हाला एक भयंकर संकट आहे. आम्ही सर्व कॉम्युनिस्टाना, सापाच्या पिल्लाप्रमाणं लेखतों. Take care ! "

" Mrigendra be damned ! " दादासाहेब ओरडून म्हणाले, त्याला तुम्ही फांसावर जरी टांगला तरी, मला आता वाईट वाटणार नाहीं."

" तसं काय होतं म्हणा ? All right ! जास्त काहीं ? "

" कांहीं नाहीं. Good morning ! "

" Good morning पुन्हां केव्हां भेटणार ? केव्हांही या ? "

§ २ दरम्यान बार्डोलीच्या विजयाचा परिणाम ठिकठिकाणीं होऊं लागला. गांधींच्या कायदेभंगात खरोखरच पुष्कळ दम आहे, अशी सर्व मोठमोठ्या पुढाऱ्याची खात्री होऊं लागली, व त्या अहिंसात्मक हत्याराचा प्रत्यक्ष उपयोग

## महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

करून दाखवून गांधींनीं कौंटलिओ टॉल्स्टॉयपेक्षांही फार मोठी कामगिरी करून दाखविली, व एकंदर मानवजातीचें त्यामुळें कोटकल्याण होणारच होणार, अशी त्यांची जगभर स्तुति होऊं लागली, कोणी अहिंसेच्या मीमांसेवर, तर कोणी गांधी व टॉल्स्टॉय, गांधी व टिळक, गांधी व ख्राइस्ट् अशासारखे अत्त्युत्तम लेख लिहूं लागले, कवि कविता करून व शाहीर पोवाडे रचून ठिकठिकाणीं स्वमुखानें गाऊं लागले, ल्हान मोठे वक्ते शहरातून, कोपऱ्या कोपऱ्यावर, बाजारांतून, नाटकगृहातून व पटांगणातून भराभर व्याख्यानें देऊं लागले. त्यामुळें जनतेची स्वराज्याची भावना जागृत झाली व त्याना आपल्या राजकीय हक्काचें ( जबाबदारीचें मात्र तितकेंसें नाहीं. ) ज्ञान झालें. कॉंग्रेसकडे सगळ्या राष्ट्राचें फिरून लक्ष लागलें, व १९२२ नंतर जे महात्माजी '' सायडिंगवर '' पडले होते, तेच कॉंग्रेसचे फिरून कर्णधार झाले.

हा दुसरचा परिणाम झाला. बार्डोलीला लागूनच नाशिक जिल्ह्याचा जो '' बागलाण '' तालुका, तेथल्या सारावाढीवर, नाशिक जिल्ह्यातील प्रधान, मराठे, देशपांडे, गद्रे, अभ्यंकर नरहरशेट नागपूरकर वगैरे पुढाऱ्यांनीं व वकिलांनीं, संपादकानीं आणि वकीलांनीं तसेंच स्वयंसेवकांनीं नव्हे प्रोफेसरांनींसुद्धा बार्डोली-सारखीच जोराची व जुटीची चळवळ करून, बार्डोलीसारखाच विजय मिळविला बागलाणच्या शेजारीं मालेगाव व मालेगावला लागून असणारा पूर्व खानदेशा-तला चाळिसगाव तालुका, येथेंही वरील प्रयोग यशस्वी रीतीनें करण्यांत आले तेव्हां नरसोपंत केळकर, धुळ्याचे देव, वगैरेंनींही बार्डोलीच्या सरदारासारखी धमक दाखविली. त्यावरून सुद्धा गांधींना मनात आनंद होत होता. कारण बार्डोलींत जे स्वयंसेवक होते, त्यात मराठी रक्ताचे, पण गुजराथेंत राहिलेलेच, किती महत्त्वाच्या कामीं होते हें ते ओळखून होते तथापि मराठी रक्ताला अहिंसा पचावयाची नाहीं हें देखील गांधी जाणून होते इतर प्रान्तासारखे महाराष्ट्रीय जिल्हे गांधींचें अंधानुकरण करणार नाहींत, मात्र त्याच्यात फाटाफुटीच्या बऱ्याच भेगा अजून आहेत, व लोकमान्य टिळकासारखा खंदा पुढारी नसल्यामुळें तूर्त तरी त्या भेगा लवकर भरत नाहींत, त्यातल्यात्यांत ब्राह्मणब्राह्मणेतर या भेगेपेक्षा अस्पृश्यतेची भेगच मोठी आहे; हें, दादासाहेबांसारखे दुरचे मराठी गृहस्थसुद्धां अभ्यासून होते

अर्थात्च दादासाहेबाना गुजराथ सोडून मुंबई, पुणें व नाशिक या शहराकडे आपला अस्पृश्योद्धाराचा मोर्चा फिरवला.

या अस्पृश्योद्धारात दादासाहेबाना प्रथम साधारणच यश आलं, कारण गांधींनीं जरी तिकडे, पूर्वीसारखें लक्ष पुरवलें नव्हतें, तरी त्याचे वर्ध्याचे पट्टशिष्य शेट जमनालाल बजाज यानीं, आपल्या स्वतःच्या मालकीचें मंदिर अस्पृश्याना खुलें करून दिलें होतें त्यामुळे दादासाहेबाना विशेष कार्य करता आलें नाहीं. तथापि ते एक दिवस पुण्याला गेले असताना, पर्वतीच्या टेकडीवर सहज गेले होते, तेथें कांही अस्पृश्य विद्यार्थी फिरत होते, आणि आपणास या देवळात जाऊन देवदर्शन का घेता येऊं नये, असा त्याच्यात प्रश्न निघाला. बोलता बोलता त्यानी ठरविले कीं, आपण आताच जाऊन पाहावयाचें त्याप्रमाणें ते वर चढूं लागलेही. दादासाहेबाचें स्वाभाविकपणेच त्याच्याकडे लक्ष वेधलें, व ते त्याच्या मागोमाग हळुहळूं चढूं लागले वृद्धापकाळामुळें त्यानीं अर्थातच देऊळ गाठण्यास वेळ लागला. तोंपर्यंत तीं मुलेंही देवदर्शन घेऊन परतलीं होतीं. त्याना स्वाभाविकपणेंच आनंद वाटत होता पण त्याना दादासाहेबानीं मध्येंच हटकून म्हटलें.

" काय हो! देवदर्शन करून आलात ? "

" हो. " एका विद्यार्थ्यानें अशा ऐटींत उत्तर दिलें कीं, आपण जणो रोजच देवदर्शन घेतों असें त्या वृद्ध गृहस्थाला वाटावें पण ते वृद्ध गृहस्थ कोणत्या मासल्याचें गुढ होते, हें त्याला माहीत नव्हतें दादासाहेबानीं, नंतर, त्याला हंसून, तरी त्याच्या मनात, आपल्याविषयीं आदर उत्पन्न होईल अशा अवाजानें विचारिलें, कीं, " असं उगाच, चोरून दर्शन काय कामाचं ? राजरोसपणं घेता आलं पाहिजे, वास्तवीक आपण सगळेच हिंदु एक आहोंत. पण आम्हा ब्राह्मणात अजून, नसता अहंकार आहेना ? तथापि, चला, मजबरोबर वर परत चला. मी पुजाऱ्याला तुमची जात सागून तुम्हाला देवाच्या पायावर डोकें ठेवण्यास सागतों. येता का ? "

दादासाहेबाच्या बोलण्याचा जरी त्या विद्यार्थ्यांना विषाद वाटला तरी, त्यांच्या मऊभाषणानें त्याना लगेच बरेंही वाटलें. त्यानीं परत देवदर्शनाची तयारी दाखविली. तें सगळे पर्वतीवर गेले, व तडक महादेवाच्या देवळाच्या गाभ्यात शिरले. तेथल्या पूजाऱ्याची सायंकाळची आरती चालली होती; यांनींही पण सगळ्यानीं

आरती म्हटली शेवटीं मन्त्रपुष्पांजलीच्यावेळीं दादासाहेब म्हणाले, " थोडे थांबा! पुजारीबुवा ! मला आपणास स्पष्ट सांगायचं आहे कीं, हे सगळे विद्यार्थी जातीनं महार आहेत—

" मग तू आपल्या या मुलांना घेऊन कशाला आलास ? " पुजारी, दादासाहेबांनासुद्धां महार समजला, व त्या सर्वांना हुसकून देण्यासाठीं शिपायांना बोलावूं लागला परंतु शिपायी येण्याच्या अगोदरच एक गमतीदार प्रकार झाला त्या चार विद्यार्थ्यांपैकीं एकजण मल्लाच्च सुजा होता तो पटकन् पुजाऱ्याच्या पायामधून निघून पिंडीजवळ गेला व त्यानें आपल्या हातांतलें फूल पिंडीवर टाकून " बम् भोलानाथ ! " अशी एकच गर्जना केली, व तोंडानें घुमटांत घुमविणारा आवाज काढिला. त्याचा तो आवाज, ती कृति, त्याची ती मूर्ति, सगळेंच इतकें विलक्षण होतें कीं, दादासाहेबांना व त्या विद्यार्थ्यांना तर कशाला, प्रत्यक्ष शिपायांना व पुजाऱ्याला सुद्धा त्याचें हसूं आलें, नव्हें, त्याचें त्यांना कौतुक वाटलें, अशा त्या पोराचें वर्णन केल्यास तें कधींही वायां जाणार नाहीं. खरें सांगायचें म्हणजे, दादासाहेबांनीच या प्रसंगाचें तें वर्णन केलें आहे, आणि स्पष्टच कबूल केलें कीं, रूसोनें आपल्या Confessions मध्यें ( गांधींच्या शिफारसीनें चिडून म्हणा, किंवा स्वतःच्या विद्याभिरुचीनें म्हणा, अथवा दोन्ही कारणामुळें असो, दादासाहेबांनी रूसोचें तें पुस्तक अमदाबादेलाच विकत घेऊन वाचून टाकलें होतें. ) सायमन जज्ज मेसरचें वर्णन आहे, तेंच हुबेहूब त्या मुलाला लागू पडतें. आमच्या वाचकांपैकीं सगळ्यांनाच तें पुस्तक विकत घेऊन वाचायला मिळेल असें नाहीं किंवा सगळ्यांनाच इंग्रजीचें ज्ञान आहे असेंही नाहीं म्हणून तें वर्णन आम्ही येथें दिल्यास कांहीं वाचकांना तरी करमणुकीचें होईल या गोष्टीकडे लक्ष देऊन तज्ज्ञांनी या मोठ्या उताऱ्याबद्दल आम्हाला क्षमा करावी, आणि तें वर्णन जर त्या चुणचुणीत पोराला त्यांनी लागू पडलें नसलें तर आम्ही दिलेंही पण नसलें हेंही गृहीत, असो.

दादासाहेब म्हणाले, " तो अवघा बारा वर्षांचा मुलगा दोन फूट कांहीं उंच नव्हता. परंतु तेवढ्या उंचींतसुद्धां त्याचे पायच उंच, किडकिडे, आणि गाठाळ होते. कांहीं जणांची उंची त्यांच्या फेंगाडेपणामुळें कमी होते, पण त्या पोराची

उंचीच कमी होती. त्याचा कोथळा तंगड्याच्या मानानें असता तर तो मुलगा उंचच दिसला असता, पण तो कोथळा उभ्यापेक्षां अडवाच जास्त होता. त्यामुळें तो मुलगा उघडा असला म्हणजे टोळासारखा दिसे. त्याचें डोकें मात्र त्याच्या वयाला शोभणारें होतें; आणि चेहराही एकंदरीनें, चांगलाच होता असें म्हणतां येईल, विशेषेंकरून त्याच्या डोळ्याकडे पाहून आपणांला ( दादासाहेबांना ) कोणत्या तरी माणसाची ओळख पटावी, इतके ते पाणीदार होते. थोडक्यात सांगायचें म्हणजे, त्या वेडेंविद्रें धुड त्या सुंदर मस्तकाला मुळींच शोभणारें नव्हतें. खालचें शरीर टोळाचें व वरचें पोराचें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

" पण शरीरापेक्षा त्याचा आवाजच फार विलक्षण होता. तो दोन अगदीं वेगवेगळ्या प्रकाराचा होता. एक प्रकार अत्यंत गोड, घुमणारा व गंभीर होता, तर दुसरा हत्तीच्या आवाजासारखा चीत्कार करणारा दीर्घ व कर्णकटु असा होता. पण विशेष मौज अशी कीं, तो मुलगा बोलूं लागला कीं, त्या दोन्ही आवाजाची सरमिसळ व्हावी. पहिला आवाज डोक्याचा व दुसरा कोथळ्याचा होता असें दिसलें. तो जेव्हां शांतपणें, अथवा विनोदानें अगर प्रेमानें बोलत राही, तेव्हां साधारणतः डोक्याचाच आवाज पुष्कळसा उमटे, पण त्याची चित्तवृत्ति यत्किंचित् जरी बेताल झाली, कीं त्याचा तो कोथळ्याचा आवाजासारखी खोली निनादून टाकी

" त्याचे स्नेही सांगतात कीं, अशा स्वरूपाचा तो पोरगा विद्यार्थिणींना फार आवडत होता. एक तर कुतूहलबुद्धीनें तो त्यांचें मन आकर्षून घेई, व दुसरें असें कीं, तो बेटा अत्यंत हुषार होता. वय बारा वर्षांच, उंची एक फूट साडेनऊ इंच पण शिकत होता इंग्रजी पाचवींत ! आणखी त्यानें आपल्या कोथळ्याच्या आवाजाला अभ्यासानें असें वळण लाविलें होतें कीं, तो त्या आवाजांत, बरोबर बायकासारखा बोलूं शके ! या अनेक गुणामुळें त्याची अस्पृश्यता तर जवळ जवळ नष्टच झाली होती, पण त्याला माडीवर येऊन खेळतांना पाहियावरून बक विद्यार्थिणींना शाळेंत व घरींही दंड भोगावें लागत.

" एकदा नव्या मास्तरची भारी फजिती झाली. सख्याहरीनें ( त्याचें नांव सखाराम हरि असें होतें ) एकदा त्या आवाजांत मास्तरची नक्कल केली. ताबडतोब मास्तरला विद्यार्थिणींचा संशय येऊन, त्यांनीं, गुन्हेगार शोधण्याची खट-

पट केली. अर्थातच ती सिद्धीस गेली नाहीं. शेवटीं मास्तरनें सगळ्या विद्यार्थिनींना, आपल्या तासात त्या दिवशीं गैरहजर राहाण्याचा हुकूम केला. गरीब बिचाऱ्या, उठल्या व जावूं लागल्या. तसे हे राजश्री उठले, व त्यांनीं आपला गुन्हा सप्रयोग कबूल केला; तसे मास्तरसुद्धा हंसले।

" थोडक्यात असें कीं, सत्याग्रहींकडे पाहून प्रथम जरी हंसूं आलें, तरी ओळखीअंतीं त्यावर प्रेमच करावेंसें प्रत्येकाला वाटे. "

अशा वर्णनाच्या त्या महाराच्या पोरानें जेव्हा पुजाऱ्याच्या पायाखून जाऊन, पिंडीवर मंत्रपुष्पांजलि घातली, व आपल्या गोड आवाजानें तो गाभारा दुमदुमवून टाकला, तेव्हा सगळेजण हंसले, यात नवल नाहीं. तथापि तेवढी विनोदलहरी निघून जाताच, पुजाऱ्याच्या सांगण्यावरून शिपायी, दादासाहेबांसुद्धा सर्वांना तेथून हटवून देऊं लागले. तसे दादासाहेब ओरडून म्हणाले, " अरे! या महारापोराचं तूर्त राहो; पण तुम्ही मला ब्राम्हणालाही हटवता ? "

" अन् इथं कोण महार आहे हो ! " सत्याग्रहीनें चित्कार केला ! " माझा बाप ब्राह्मण होता. "

या बदललेल्या आवाजानें, आणि त्याच्या त्या भाषणानें पुन्हा सगळे हंसले. मग दादासाहेबांनींच त्याला विचारिलें, " आणि तुझी आई रे ! "

" अं. ! ती असेल महार ! मला काय तिचं ! "

" तिचं नाव काय रे ! " दादासाहेबांनीं घाबरतच विचारिलें.

भागी. "

दादासाहेब काळ्या मातीच्या ढेकळासारखे काळे पडून निपचळले, पण थोड्या वेळानें जुजता आवेश आणून त्यांनीं विचारिलें,

" आणि बापाचं नाव काय रे ! "

" तेंच तर माहीत नाहीं. तें कळतं ना – तर काय पण मौज होती बघा ! "

" काय मौज झाली असती ! "

" अहो, मग याची काय टाप लागली असता मला महार म्हणण्याची ! "

" अरे पण महार होणं वाईट कीं काय ! "

" तें नाहीं मला माहीत. ब्राह्मण असणं चांगल हें खरं. पण मी ब्राह्मणच आहें. "

" वेडा आहेस ! आजकाल ब्राह्मण असणच वाईट आहे ब्राह्मण सर्वांच्या डोळ्यांत खुपतात जसे ! "

" ब्राह्मण असून दुसऱ्याच्या डोळ्यांत खुपणं चांगल, पण महार महार म्हणून प्रत्येक ठिकाणा हार खाण वाईट आता माझे डोळेच पहाना ते तुमच्या डोळ्यांत कसे पण खुपतात ! "

याउपर तेथें उभें राहाण्याचें अवसान दादासाहेबांना उरलें नाहीं ते आपण होऊन डागर उतरू लागले व ते तरुण असल्यामुळें दादासाहेबाच्या अगोदर उतरून दिसेनासे झाले दादासाहेब मात्र मधल्या एका बाकावर बसून उद्गारले

गांधी महात्माजी खरे ! पण सैतान कीं साधु ?

"I would compare what is happening to the human species with what happens to an insect that undergoes a complete metamorphosis Man was a species living in detached and separated communities, he is now being gathered together into one community He is becoming one great co-operative interplay of life which is replacing a monotony of individual variations He is changing in every social relationship, and devoloping a new world of ideas and mental reaction, habits of mind and methods of feeling and action, in response to the appeal of the new conditions Nature, I take it, is impartial and inexorable He is no specially favoured child If he adapt, he passes on to a new phase in the story of life, if he fail to solve the riddles he faces now he may differentiate, he may degenerate, he may die out altogether One thing Nature will not endure of him that he stays as he is "—The world of William clissold.

*H G. Wells*

# मृगेंद्राचीं पत्रें

§ १ पुण्याच्या पर्वतीवर दादासाहेब क्षेमकल्याणी, सख्याहरीच्या विनोदी उत्तरांनीं चकीत होऊन बसले होते. त्याचवेळीं साबरमतीच्या आपल्या आश्रमांत महात्माजी मृगेंद्राचीं पत्रें वाचीत, सचिंत होऊन बसले होते. त्याच्यापुढें मृगेंद्रानें, काळजी करण्यासारखे, इतके कोणते प्रश्न टाकले होते, तें आपणास तीं पत्रें वाचल्याशिवाय कसें कळणार ? नाहीं तरी आपणालाही मृगेंद्राला व त्याच्या बायकोला सोडून पुष्कळ महिने झाले आहेत. तेव्हा आपणाला त्याच्या पत्रातूनच त्याची खबरबात कळेल.

## पत्र पहिलें

वॉशिंग्टन

कृ. सा. न. वि. वि. २३ सप्टेंबर १९—

प्रथम या पत्रासोबत मी सात हजार डॉलर्सचा चेक् पाठविला आहे, त्याबद्दल आपण मजवर रोष करणार नाहीं, अशी आशा आहे. मी व माझी पत्नी याच्याकरिता आपण जो खर्च केला, तो मी परत करीत आहे, असें आपण मनात सुद्धा आणणार नाहीं, अशीही माझी खात्री आहे. पण अमेरिकेजवळ आज रावण राज्यपिशाही अलोट संपत्ति आहे;व आमचा हिंदुस्थान देश एकंदरीनें अधिकाधिक भिकारी होत आहे, तेव्हा आर्थिक समतोलपणा राखण्याकरता, आम्हीं योग्य मार्गानें, अन्य राष्ट्रातून मिळेल तेवढें द्रव्य घेतों व आपणाकडे पाठवितों; यात चूक होत नाहींना ?

प्रथम प्रथम मी व्याख्यानाकरता, आणि गुलाब काव्यगायनाकरता मिळत असलेली फी घेत नव्हतों, आमचें आगगाडीचें भाडें देखील घेणें आमच्या जिवावर येई. परंतु आमचा हा उदारपणा नसून कंगालपणा आहे अशी येथल्या लोकांची कल्पना होऊन, आमच्या गुणावरही त्याचा परिणाम होऊं लागे; असें पाहून आर्थिक समतोलपणाची कल्पना अमेरिकेंतील कांहीं जणानींच मला मागितल्यामुळें, व मला ती पटल्यामुळें, आम्हीं आमची फी घेऊं लागलों. प्रथमारंभीं ती फार अल्प होती; पण आता शेवटीं ती बेसुमार वाढली आहे. येथून मी शेवटचे न्यूयॉर्कचें व्याख्यान देऊन दक्षिण अमेरिकेंत जाणार आहे. आतापर्यंतची सगळी रक्कम जर आम्हाला आपणाकडे पाठविता आली असती तर ती अर्ध लक्ष डॉलर्स पर्यंत जाती. परंतु आमच्या नाशिकाला जसें दक्षिणेचे पैसे वाचफंड, दुष्काळफंड, स्वराज्यफंड,

वगैरेकडे पानांवरून परभारेंच जातात, किंवा हिंदुस्थानसरकार जसें पगारातून परभारें शेंकडों कर वसूल करून घेतें, त्याप्रमाणें येथेंही एक ना अनेक संस्था, आमच्या फीमधून परभारेंच वर्गण्या वसूल करून घेतात. तरी पण, माझ्या स्वतंत्र कल्पनेप्रमाणें कार्य करणाऱ्या ज्या संस्था स्थापन झाल्या आहेत, त्यांनाच आम्ही भरपूर आश्रय देतों. गुजराथी बनियाला आवडणाऱ्या हिशेबी भाषेंत सांगावयाचें झाल्यास दर दहा डॉलर्समागें चार आमच्या संस्थाना चार इतर संस्थाना, व दोनच आम्हाला; असें प्रमाण पडतें. आमच्या दोन डॉलर्समधून एक तरी परत भेटी थिएयटर गोइंग, ट्रिप्स्, पिक्निक्स, इत्यादिकांत जातो. आम्ही पोषाखांत व आमच्या खाण्यापिण्यांत अगदीं दक्षणी ब्राह्मणांसारखेंच राहतों. त्याची काळजी नसावी उलट मीच या इथल्या लोकांना साध्या रहाणीची महति शिकविणारा आहे. पण पुढें केव्हा तरी.

आता आमच्या कार्याविषयीं. साधारण ठोकमानानेंच लिहितों. कारण बारिक-बारिक गोष्टी लिहावयाच्या म्हणजे एक सुंदरसें पुस्तकच होईल. आणि मी तसें लिहावें, अशी मला मागणीही पण आली आहे. आणि मी लिहिणारही पण आहें. एका कंपनीचा ॲडव्हान्स पण मी घेऊन ठेविला आहे. माझ्या नोट्स् तयार आहेत. अहो! एवढेंच नाहीं, मी आपणांस पत्रें पाठवितों तीं सुद्धां प्रसिद्ध करण्याबद्दलही माझ्या मागें अनेक कंपन्यांचें एकसारखें टुमणें लागलें आहे. पण माझ्या पत्रांचा मी मालक नव्हे, गांधीच आहेत, असें मी त्यांना सांगून माझ्या मागचा त्रास चुकविते अर्थात् आपल्या मागें तीं भुतें लागलीं असतीलच.

मी येथल्या प्रत्येक संस्थानांतील मोठमोठ्या शहरीं व्याख्यानं देऊन माझी मानवी संस्कृतिसाम्राज्याची कल्पना विशद करून सांगितली. माझी अपेक्षा होती कीं, मला इथले बुद्धिमंत लोक तरी प्रश्न विचारून बेजार करतील. परंतु आतां इतक्या ठिकाणच्या अनुभवानंतर मला सांगतां येतें कीं, अमेरिकन लोक नव्यानव्या कल्पनाचे, केवळ नाविन्याकरतांच, भोक्ते आहेत. स्वामी विवेकानंदाच्या व्याख्यानानंतर इथं अनेक आश्रम स्थापन झाले आहेत; परंतु त्या आश्रमांचा उपयोग नाविन्याची जाहिरात होण्यापलीकडे होत नाहीं, असें मला मोठ्या कष्टानें सांगावें लागतें. अमेरिकन ग्रंथरत्यांवरदेखील स्वामीजींच्या शिकवणीचा इत-

परिणाम झाला नाहीं, आणि कोठेंही गेलात तरी, असामान्य ग्रंथकाराची राहणी नेहमीं साधीच असते एडिसनकडे पाहिलें तर त्याच्या पोषाखाकडे आणि खाण्यापिण्याकडेंही दुसरे पाहतील तेव्हा त्याना शुद्ध येते, म्हणून ग्रंथकाराच्या राहणावरून एकदर लोकाच्या राहणीचा विचार करता येत नाहीं विचाराची दिशा विचारवतावरून, व राहणीची दिशा एकदर जनतेवरूनच ठरवावी लागते तसें पाहता इथली जनता निव्वळ पागल आहे बहुतेक शहरातून यत्रागारें असल्यामुळें मूठभर श्रीमत भाडवलवाले व बाकीचे सारे भुकेवगाल, परावलबी, ठोंबे आणि खुनशी आहेत Upton Sinclair च्या व त्यांच्या इथ लोकप्रिय असल्या तरी अमेरिकेंत सोशॅलिझमची धार विशेष तीव्र नाहीं, याचें कारण एकच सगळेच अमेरिकेन् नाविन्याचे भोक्ते आहेत हें तें कारण नाविन्याच्या ल्हरींत संपत्तीचे झरे खालच्या वर्गांतून मधून मधून वाहू लागतात आणि हल्लीं गृहस्थाश्रमाचा इथें नुसती खेडी उडाली असल्यामुळें कुटुंबपोषणाची चिंता कोणाच्याच मागें नाहीं त्यामुळें दोन वेळा तुकडे मिळाले, रात्रींचा निवारा मिळाला, आठड्यातून एकदा पाच पचवीस मैलाचा प्रवास करायला सापडला, आणि एखादी दुसरी ' सेंसेशनल नॉव्हल् ' वाचून फेकून द्यायला मिळाली कीं, सामान्य अमेरिकन मनुष्य, स्त्री अथवा पुरुष, खुष असतो " सेंसेशन " हा अमेरिकेचा जबरदस्त रोग आहे त्या रोगान माझ्या सस्कृतिसाम्राज्याच्या कल्पनेलाही पछाडले आहे, असें पाहून, मला निराशा होणें अत्यत स्वाभाविक आहे आणि आता विशेषच बारकाईनें पाहता सस्कृतिसाम्राज्य हें अमेरिकन साम्राज्यच, असें त्याना वाटतें असें मला आढळून आलें, म्हणून तर मला अतोनात दु खच होत आहे

आता त्याची अमेरिकन साम्राज्याचीसुद्धा कल्पना लक्षात घेतली पाहिजे त्याची साम्राज्याची कल्पना भूगौलिक राज्यविस्ताराची नाहीं, तर निव्वळ व्यापारी तत्त्वाची आर्थिक आहे सर्व जगातले देश आपणास व्यापार करण्यास मोकळे पाहिजेत एवढीच त्यांची इच्छा आहे डॉलर्सशिवाय त्याना दुसरें काहीं दिसत नाहीं एका सिनेटरनें तर मजजवळ बोलून दाखविलें कीं, हिंदुस्थानचें राज्य साभाळण्याची अनुमात्र जबाबदारी न घेताही, तो देश आम्हास व्यापाराला मोकळा आहे, म्हणूनच आम्हास ब्रिटिश लोक हिंदुस्थानचे राज्यकर्ते असलेले चालतात उद्या हिंदी लोक स्वत च आपलें राज्य हाकू लागले आणि आम्हाला

त्यानीं आपला देश इतरांप्रमाणेंच मोकळा ठेविला तरी आम्हांस आनंदच आहे. लेव्हीं एकंदरीनें अमेरिकन साम्राज्य म्हणजे आर्थिक साम्राज्य होय; आणि माझ्या कल्पनेंत तें येऊं शकतें म्हणून त्याना माझ्या कल्पनेच्या आड येण्याचें कारण दिसत नाहीं. मात्र आर्थिक प्रश्नाला संस्कृतीच्या मानानें यथायोग्य स्थान मी देताच, डॉलर्स व संस्कृति हे भिन्न नाहींतच-असें ते म्हणतात.

तथापि हीं ऐट फक्त डॉलर्सच्या मालकाचीच आहे. बहुजन समाजाला मात्र डॉलर्स म्हणजे प्राण होऊन गेले आहेत. मिळून आर्थिक उन्नति म्हणजे सर्वांस खाण्यापिण्यालेण्यास भरपूर मिळावें, अशी जरी सामान्य जनतेची कल्पना असली तरी, त्या कल्पनेपलीकडे तेही जाऊं शकत नाहींत. त्याना मात्र अमेरिकेनें आपला व्यापार वाढवावा असें मुळींच वाटत नाहीं. कारण त्यांनाही आतां महायुद्धानंतर कळून चुकलें आहे कीं, अमेरिकेची संपत्ति युद्धपूर्वकालापेक्षा १२० पटींनीं जरी वाटली असली, तरी आपल्या खिशातला एक सेंट देखील त्यामुळं वाटत नाहीं. म्हणून त्याना आहे त्याच संपत्तीची योग्य वाटणी पाहिजे आहे. आणि यालाच सोशॅलिझम म्हणतात. मी वर म्हटलेंच आहे कीं, एकंदर अमेरिकन लोकाच्या नाविन्याप्रियतेमुळें ही सोशॅलिझमची आग इथें फारशी पेटत नाहीं. तथापि माझ्या कल्पनेला जर इथें कोणी खरोखर पोषक होत असतील, तर ती गरीब जनताच होय मी अजून इथल्या खेड्यातून हिंडलों नाहीं; पण दुसऱ्या फेरींत हिंडणार आहें. तूर्त भाडवलवाले मला डॉलर्स देतात, एवढाच मला त्याच्या फायदा दिसतो.

हे झाले माझे अनुभव. गुलाबचेही जवळ जवळ तसेच आहेत. तिनें ठिकठिकाणी जों कवितागायनें केलीत, त्याबद्दल तिलाही भाडवलवाल्याकडून शेंकडों डॉलर्स मिळाले. पण गोविंदाग्रजांच्या "राजहंसा"ला ते हंसले. वाल्मिकिच्या शरणाने मात्र त्याना आराम वाटला. परंतु सोनाळकराच्या सत्प्रेमाचा त्याना काहीं सुद्धा बोध झाला नाहीं; आणि तिवारींच्या " झांशीवाली"ची तर त्यानीं हुर्योच उडविली. उलट माधवज्यूलियनचा ताजा "सुधारक" त्याना अतोनात आवडला. निफाडकराच्या "सतींच्या शापानें" तर त्याना "देवल" का रडली, तिचे खिजर खानाशीं झालेल्या लग्नात वाईट तें काय झालें, हेंच त्याना कळेना. गिरीशाची 'अभागी कमल' त्यानंतर

भलतीच गबाळी व रडकी वाटली. ही गोष्ट झाली भाडवलवाल्याची तीच सामान्य जनतेला गिरीशांची ताजी " आंबराई " सुद्धा अतोनात आवडली; बालकवि तर त्याना इंग्रजी वेषात लवकरच हवा. सोनाळकराना तर त्यानीं महाराष्ट्राचा रवींद्रनाथ टागोरच म्हटलें, गोविंदाग्रजाच्या राजहंसानीं व निफाडकराच्या देवलनें त्याना रडवून सुखवलें, आणि यशवंताचीं Pastorals तर त्याना फारच फार आवडली. मात्र ते माधवज्यूलियनच्या कविता ऐकून घेण्याला तयार नाहींत. असा हा खालवरच्या घरात फरक पडला आहे. रे. टिळकाची कविता मात्र येथें सर्व लोकाना प्रिय झाली आहे, असो. मी आपणाला काहीं ठळक कवींचीं उदाहरणें दिलींत. गुलाब खानदेशाची असल्यामुळें तिला स्वाभाविकपणेंच तेथले कवि व त्याचे स्नेही आवडतात. तिचें गुजराथी वाचन फारच थोडें आहे. असो एक मात्र गोष्ट खरी कीं, आमच्या मराठी कवींना जें आम्ही कमी समजतों, ती चूक आहे. स्वतंत्र देशात त्या कविता फारच फार परिणाम करतात. मी स्वत: गुजराथी कवींच्या कविता म्हटल्या त्याही त्याना आवडल्या. पण त्याना निव्वळ सेंटिमेंट आवडत नाहीं हेंच खरें.

अशा रीतीनें आमचा दोघाचाही अनुभव असा आहे कीं, अमेरिकेंतल्या सामान्यजनसमूहात पुष्कळ काम करता येण्यासारखें आहे. माझ्या जागतिक संस्कृतिसाम्राज्याच्या कल्पनेनें प्रेरित होणाऱ्या प्रत्येक हिंदी मनुष्यास इथें कार्य करण्यास भरपूर जागा आहे तो तेजस्वी असेल तर त्याला पोटापाण्याची अगर प्रवासाचीही काळजी करण्याचें कारण नाहीं गबाळा मात्र भुकेनें मरेल.

येथपर्यंत आमच्या कार्याचा अमेरिकन लोकावर काय परिणाम झाला हें सागितलें आहे. आता आमच्यावर त्याचा काय परिणाम झाला तें सागतों —

मी युरोपात पुष्कळदा हिंडलों आहें. पण अमेरिका फक्त एकदा पाहून परतलों होतों. आता तीन महिने झाले, मी या राष्ट्रात आहें. प्रथम मला असा विचार सुचला कीं, ही यंत्राची प्रगति वाईट कीं चागली ? आरंभीं तर मला तुमच्या सारखेंच वाटलें होतें कीं, यंत्रें म्हणून जगात नकोतच. पण आता असें पटूं लागलं आहे कीं, यंत्रें हीं तर मानवीजातीच्या मोठेपणाची साक्ष आहे. मात्र त्याचा उपयोग सर्वांना सुलभ व समान प्राप्तीचा झाला पाहिजे. यंत्रें झालींत तर मनुष्य

म्हणे चांगला होईल; थोडा होईल, व आळशी होईल. हें कशावरुन तर म्हणे श्रीमंताकडे पहा. जणों , श्रीमंत हा मनुष्यच आहे ! एक तर, जरूर असून सुद्धां सामान्य माणसाना प्रवास करण्याला सवड मिळत नाहीं, व ती मिळाली तरी त्याजजवळ प्रवासखर्चापुरते पैसेही नसतात. अमेरिकेंतलें रेल्वेबोर्ड कंडक्टर्सची तक्रार आहे कीं, तिथें सुद्धां मनुष्यें अजून फारसा प्रवास करीत नाहींत. त्यांची तक्रार खरी आहे. कारण तिथें दर माणसाच्या प्रवासाची सरासरी वर्षाला तीन हजार मैलांची असली तरी त्यापैकीं अडीच हजार मैलाची भरपाई भांडवलवालेच करितात ! गरिबांना काय वेरुळच्या लेण्या पहाव्याश्या वाटत नाहींत ? कीं त्याना आल्प्सची हवा नको असते ? जगभर प्रवास करून शहाणपणा मिळवावा असें गरिबाना वाटत नाहीं कीं काय ? मग त्यानीं काय पायीं फिरावें ? महात्माजी, आपण मला क्षमा करा, पण आपली यंत्राची द्वेषबुद्धि मला राजकीय दृष्टीची अतएव संकूचित वाटते. एक संस्कृतिसाम्राज्य घरा, कीं यंत्रांची उपयुक्तता व जरूरीही पटेल. मला तुम्ही हंसाल, पण मला आशा वाटते कीं, यंत्राच्या सहाय्यानेंच आम्ही इतर ग्रह जिंकूं. पण इतकी कविदृष्टि सोडून दिली तरी,. संस्कृतिसाम्राज्याच्या कल्पनेलासुद्धां जसा यंत्रामुळेंच आरंभ झाला, तशी तिच्या साधनसामुग्रींतही यंत्राचीच फार मोठी थोरवी आहे, असो.

दुसरा अनुभव ग्रंथकर्त्यांचा आहे. येथें एकंदरीनें तात्विक विवेचन करणारे थोडेच ग्रंथकार आहेत, व आहेत ते देखील सामान्य आहेत युस्टन सिंक्लेअर सारखे स्पेशॅलिस्ट फारच थोडे आहेत, पण त्याना युरोप इतकेंही येथें हल्लीं महत्व नाहीं. सामान्यें करून येथल्या ग्रंथकाराची प्रवृत्ति संप्रदायात्मक आहे. स्वतंत्रता जर कोठें दिसत असेल तर ती फक्त शास्त्रीयशोधातच. परंतु एडिसनसारख्या शास्त्रसंशोधकाच्या मागें भांडवलवाले इतके लागलेले असतात कीं, त्याचे शोध चटकन् व्यवहारात येतात. त्यामुळें त्या शोधाना आर्थिक रूप येतें, व तें कायम रहावें म्हणून त्याचें " प्रोटेक्शन " होतें, म्हणजे त्याचें लवकरच " संहारात्मक" रूपांतर होतें. अमेरिकेंत " मन्रो डॉक्ट्रिन '' ला अजून थोडासा मान आहे, म्हणून अमेरिकेची संहारशक्ति युरोपच्या त्या शक्तीइतकी तापदायक होत नाहीं. इवढल्या कादंबऱ्याना Dry goods म्हणतात, म्हणजे त्याचें प्रयोजन " सेंसेशन " उत्पन्न करण्यापलीकडे फारसें नसतें त्याना Dry हें विशेषण एवढ्या.

वरता लाविलेलें दिसतें कीं, समुद्राच्या फेसासारख्या त्या मानवी स्वभावाच्या पाण्यात राहून, विशेष मानवीसुखाचें कार्य करीत नाहींत, अगदींच हलक्या असतात Whitman नंतर इकडे नाव घेण्यासारखा कवि दिसत नाहीं नाट्या-करिता तर शॉ, बॅरी गॅल्सवर्दी इत्यादि युरोपियन नाटककाराकडेच त्याना पहावें लागतें. पण नाटकापेक्षा सिनेमाचेंच येथें जास्त महत्व आहे, पण तें हल्यारही ऐहिक संपत्ती वाढविणारें धाडस दाखवण्याकडेच वापरलें जातें एकंदरीनें नॉव्हे-ल्पियायीं अमेरिकेला जागतिकल्याणाकडे लक्ष देववत नाहीं आपणच त्याना तें शिकविलें पाहिजे.

शेवटीं इतकेंच लिहावयाचें कीं, आम्ही दोघेंही सुखी आहोंत. आमचा पर-स्परावरील विश्वास व प्रेम पाहून अमेरिकन लोक प्रथम हंसले, पण आता बऱ्या धेंडानाही आमचा हेवा वाटतो. या हेव्यातूनच त्याचें लक्ष हिंदुसंस्कृतीकडे जाईल अशी आशा आहे, असो. एकदा मला गुलाब म्हणाली, कीं इजराबिबि म्हणाली कीं गुल्नार काहीं माझी मुलगी नाहीं तेव्हा माझें कुळ जर हीन निघालें तर आपणास वाईट वाटेल या काळजीनें मला फार दु ख होत आहे तेव्हा मी तिला सांगितलें कीं माझा गुलाब मूळचा जरी सोनखतातून निघालेला समजला तरी तो मला अत्यंत पवित्र आहे महात्माजी The woman thou gav-est me is a pearl on my breast !

आपला पुत्रतुल्य.

**मृगेंद्र.**

§ २ या पत्रानें महात्माजींना काळजींत लोटण्यास सुरुवात केली होती मृगेंद्र यंत्राच्या व यंत्रोत्पन्न नव्या व राक्षसी उन्नतींत सापडतो कीं काय अशी त्याना चिंता उत्पन्न झाली मृगेंद्राच्या बुद्धिमत्तेचें त्याना कौतुक वाटावें, त्याचप्रमाणें, एका दृष्टीनें गुलाबच्या कुलशंकेविषयीं ही त्याची काळजी दूर झाली, परंतु पाश्चात्यावर हिंदुसंस्कृतीचा शिक्का मारण्यास पाठविलेलें तें जोडपें, पाश्चात्यां-चाच आधुनिक ठसा घेऊन येतें कीं काय, असा त्यांच्या जिवाला घोर उत्पन्न झाला पाश्चात्यांकडून स्वदेशीं पैसे आणून आर्थिक समतोल्पणाचें आपलें तत्व त्या तेजस्वी पोराच्याही डोक्यात घोळत होतें, हें पाहून जरी त्याना एकदा समाधान वाटलें होतें, तरी मानवानीं खूप भटकत रहावें, कारण नटून सुद्धा

शहाणपणा प्राप्त होतों, हा त्या पोराला भ्रम उत्पन्न झाला असेच त्याना वाटलें. वेरुळच्या लेण्या न पाहताच मनुष्य मेला तर तो काय नरकांत पडतो, आणि लेण्या पाहून मेला तर काय त्याचें स्वर्गारोहण होतें, अशी गांधींची विचारमालिका होती. निसर्गनिर्मित पायानीं चालावें तेवढें चालावें, निसर्गतः लागेल तेवढेंच खावें, व जरूर तेवढेंच त्यावें, अशी त्यांची जीवनमीमांसा १९०८ सालच्यीच होती, असे नाहीं, तर ती त्याना अगदीं वेंबीच्या देठापासून अजूनही आवडे, ते स्वतः खूप फिरत हें ते विसरत नव्हतें, पण त्यावद्दल आपणास अतीव दुःख होतें असें त्याना बोलून दाखवलें त्याचप्रमाणें इतराच्या कल्याणाकरता जर दीर्घ प्रवास करणें जरूरच असले तर ते जरूर करावेत, असें त्याचें म्हणणें होतें, पण ते सुद्धा जर पायींच झाले तर त्याना हवे होते. यंत्राची त्याना अगदीं अंतःकरणापासून शिसारीच होती मनुष्याच्या शरीरसंरक्षणार्थ लागणारीं सर्जिकल हत्यारें किंवा त्याचें ज्ञान वाढविणारे आब्झरव्हेटरींतलीं ' ॲपरेटस् ' त्याना पाहिजे होतीं पण कापडाच्या गिरण्या, दळणाच्या गिरण्या, तेलाच्या गिरण्या, आगगाड्या, मोटारी, विमानें, जहाजें, तोफा, बंदुका वगैरेंची त्याना स्मृति सुद्धा सहन होत नव्हती. अर्थात्‌च त्याना मृगेंद्राच्या, वॉशिंग्टनच्या पहिल्याच पत्रानें समाधान झालें नाहीं, असो आता,

### पत्र दुसरें.

दि ओ–डी–जानीरो
२३ नोव्हेंबर १९

कृ. सा. न. वि. वि—आज दक्षिण अमेरिकेंतला प्रवास सपवून, मी युरोपात जाण्यास निघणार. या खंडाधांत मी, जॉर्जटौन व्हॅलेंसिया, बोगोटा, क्विटो, पुमा, ट्रिनिदाद, सॅन्टिआगो, ब्यूनॉसेरीस, कॉडावा, मॉन्टेव्हीडिओ, पर्नाम्बुको व मारोजो या शहरीं व्याख्यानें दिलीत, व गुलाबनें काहीं मराठी कवींच्या, काहीं इंग्रजी कवींच्या व काहीं स्वतःच्या मराठी व गुर्जर भाषेंतल्या कविता म्हटल्या. आज आमचा इथला प्रोग्रॅम आहे. तेवढा आटोपला की दक्षिण अमेरिका संपली

या पत्रात मी प्रथम अशी एक अत्यंत महत्त्वाची सूचना करतों कीं, या खंडाधांत, आपण हिंदूंनीं शक्य तितक्यादा येऊन प्रवास करावें, व जमल्यास काहीं जणानीं वसाहती करूनच रहावें. त्यातल्या त्यात आमचा जो भिक्षुक वर्ग हिंदु

त्यानात मंडूकासारखा पडला आहे, त्यानें तरी इंग्रजी, फ्रेंच व स्पॅनिश भाषांचा तात्पुरता अभ्यास करून येथें येऊन, आपल्या संस्कृत विद्येचा प्रसार करण्यास अवश्य रहावें. त्याचप्रमाणें बंगाली व महाराष्ट्रीय कवींनीं तर येथलें अलौकिक देखावे आणि येथली संस्कृतिमिश्रता अवश्य निरखावी. पंजाबी व मद्रासी लोक वसाहती करायला नालायक आहेत अशी माझी समजूत आहे. विशेषतः येथें कलानिपुण आणि स्पष्टोक्तींच्या कवींना फार मोठें कार्य आहे. ब्रिटिश बेटांत आज वेल्स आणि शॉ. हे जसे आत्मप्रत्ययी आणि हुशार लेखक आहेत, तसल्या धिटाईचे हिंदु लेखकाची येथें फार मोठी वाण आहे. master minds पाहिजेत. Slave minds इथें येऊन उलट नुकसान करतील. आत्मपरीक्षा करणारे व ती वेळप्रसंग जाहिररीत्या लिहिणारे लेखकपुंगव पाहिजेत. चव्हाटी लेखक नकोत. एकवार लस्टी चालतील, पण दांभिक नकोत. सामाजिक व्यंगें चव्हाट्यावर मांडणारे, पण परगुणाच्या परमाणूला पर्वतप्राय करणारेही ते असावे. पूर्वजांचे अभिमानी हवे, पण गतानुगतिकांची इथें काहीं डाळ शिजणार नाहीं.

इतका आग्रह कां, तर येथलें निसर्ग अत्यंत रमणीय, विशाल आणि बहुरूपी आहे आमचा हिमालय तर आम्हीं हृदयीं खोदावाच; पण येथला अँडीज पर्वतसुद्धा पदतलीं घालावा. गंगेचें पावित्र्य गंगेलाच खरें, पण ॲमेझॉनचे दोन्ही तीर, मंदिरें, मशीदी व चर्चेस यांनीं खुलूं द्या. मंदिरामुळें जुन्या जगात, ( आता उत्तर अमेरिका देखील जुन्या जगातच मोडते ) रक्तपात होतात, दुःखाची गोष्ट आहे, पण या ब्राझिलच्या विशाल अरण्यातून तरी माणसाची एकच प्रार्थना, परमेश्वराच्या घरीं पोंचूं द्या, मग ती कोणत्याही भाषेंत अगर कोणत्याही स्थळीं केल्यास चालेल. येथें मूळचे लोक व मुसल्मान आणि खिश्चन यांच्या संस्कृतींचीं मिश्रणें आहेत तरीसुद्धां, पेरू, चिली व ब्राझिल यांतल्या गवती कुरणांतून हिंदूंची संस्कृती चिन्हें सापडतात. महात्माजी, प्रार्थना करणारे मानव जरी मरून जातात, तरी त्यांच्या प्रार्थनांचे निनाद दऱ्याखोऱ्यांतून, जंगलापहाडातून, नद्याझऱ्यांतून, झाडाझुडपांतून, हजारों वर्षे घुमतात. जगदीशचंद्र बोस यांनीं झाडांची भाषा अवगत करून घेण्याचा प्रयत्न चालविला आहेच; तशी जर पहाडांची भाषा मानवांना कळली तर, कितीतरी हजारों वर्षांपासूनचें मानवी इतिहास आपणांस कळतील. छे. छे. आपण मानव अजून

फारच बाल्यावस्थेत आहोंत, पण हें जर प्रत्येकाला कळलें, तर आपण आपलीं भाडणें सोडून देऊं, बाल्यपणीं व तरुणपणीं भांडलेंच पाहिजे हें नीलगिरी पशुची आहे. मानवाच्या बाबतींत तीं कबूल करायला कोणत्याही शास्त्राचा आधार नाहीं.

या पत्रात मी काव्यापासून आरंभ केला याचें कारण तरी हेंच कीं,येथें सस्कृति-मिश्रणाची क्रिया व तिचे परिणाम उत्कृष्ट दिसतात गटेनें एका कवितेंत असें लिहिलें आहे, नवराबायकोंत भाडणें होऊन तिचे गाल फुगले, व त्याच्या कपाळाला आठ्या बसल्या कीं, त्याला पाठवावा उत्तर ध्रुवावर, व तिला धाडावें दक्षिण ध्रुवावर म्हणजे थोड्या वेळानें तीं दोघें इक्वेटरवर एस्मेराम विलगतील ! सर्व सस्कृतीविषयीं आता तसेंच झालेलें मला दिसतें. स्वास्तिक, क्रॉस आणि चाद याना आता आफ्रिकेच्या अरण्यातच प्रेमानें भेटू या. कारण इथें खूप मोठीं मैदानेंच आहेत असें नाहीं, तर इथलीं प्रजासत्तक राष्ट्रेंही नवीन व स्वतंत्र आहेत मोठालीं रानें व वाळवटें आफ्रिकेंतसुद्धा आहेत, पण त्या सटाला युरोपनें पुष्कळच गिळून टाकलें आहे इथें माझी सस्कृतिसाम्राज्याची कल्पना ऐकून प्रथम पुष्कळ लहानमोठे लोक दचकलेच त्याना वाटलें कीं ही काहीं तरी ब्रिटिशाचीच कारवाई आहे हिंदी मजुराना जसें पूर्वी दक्षिण आफ्रिकेंत त्यानीं नेलें होतें, तसेंच आता दक्षिण आफ्रिकेत पाठविण्याची काहीं तरी ही नवी शक्कल असेल. पण त्याची जेव्हा मी खात्री पटवून दिली कीं, मी अगदीं स्वतत्ररीतीनें संस्कृतिसाम्राज्याची कल्पना सागण्याकरताच केवळ आलों आहें. तेव्हा ते नीट ऐकून घेऊ लागले. तथापि युरोप, उत्तर अमेरिका व एशिया या तीन खडानीं वरीलप्रमाणें चालविण्याचें कबूल केलें, तरच दक्षिण अमेरिका त्या जागतिक सस्कृतासाम्राज्यात सामील होईल, नाहीं तर फार झालें तर हिंदी प्रवास्याना विशिष्ट अटींवर व्याख्यानें देण्यास परवानगी तेवढी देऊं असें त्याचें म्हणणें आहे कार्य कर्त्यांना आरंभ करण्याला तितकेंही पुरें होईल

दक्षिण अमेरिकेमवधी तूर्त इतकेंच पुरें. प्रत्यक्ष भेटींत जास्त बोलता येईल.

आमचें दोघाचें उत्तम चाललें आहे काळजी नसावी. गुलाबची कवितांची वही फुगत चालली आहे.

घरीं आईला व सुरेंद्रादि भावावहिणींना सांगावें कीं, मृगेंद्र व त्याची पत्नी आनंदात आहेत. कळावें.

आपला पुत्रतुल्य
**मृगेंद्र.**

§ ३ या दुसऱ्या पत्रानें महात्माजींना असें वाटलें कीं, मृगेंद्राला तायडतोब हिंदुस्थानांत परत बोलवावें; कारण संस्कृतीचा लढाच जर घुमवावयाचा तर तो घरींच जो चालला आहे, त्यात मृगेंद्रानें भाग घ्यावा हें राष्ट्रहिताच्या दृष्टीनें उचितच होतें. शिवाय आता म्हणिलेलें प्रकरण निकालात निघालें होतें आणि दादासाहेबांचा निदान अस्पृश्योद्धाराचा डाव तरी उघडकीला येत होता. अशा-वेळीं मृगेंद्र व त्याची पत्नी यांचीही त्यांना मदतच होणार होती. तथापि तो परदु:ख जाणणारा महात्मा लगेच त्या विचारापासून परावृत्त झाला. मृगेंद्राची जर खरोखरच स्वतंत्र कल्पना आहे तर तिचा प्रयोग त्याला करूं देण्यास काय हरकत आहे ? आपल्या मोठेपणापायीं नवीन पिढीच्या जातिवंत कल्पनांना मुर्दा-तन गुडून टाकणें त्याना मुळींच रुचत नसे. आपल्या मनांत तरी ती दुष्ट कल्पना कशी उद्भवली, त्याचें त्यांना दु:ख झालें, व त्या पापाबद्दल त्यांनीं परमेश्वराजवळ क्षमा मागली; असो.

## पत्र तिसरें.

लंडन, हर्टफोर्ड हौस. वेस्ट एन्ड्.
२० जानेवारी १९—

कृ. सा. न. वि. वि.

दक्षिण अमेरिका सोडून मी प्रथम जेव्हां युरोपमध्यें लिस्बनबंदरीं ज्यानिवार पाय ठेवला, तेव्हां आपण ज्वालामुखींनीं मागलेल्या गंडांनच आलो आहोंत, यानी मला पूर्ण जाणीव होती. विद्यार्थीदशेंत मी सर्व युरोपभर हिंडलों होतोंच; आणि हिंडतांच, माझी संस्कृतिविषयाची कल्पना तयार होत गेली होती. परंतु कल्पना तयार होणें वेगळें; आणि तयार झालेल्या कल्पनेचा प्रसार करणें वेगळें, विद्यार्थी वेगळा व दूरदर्शी वेगळे. पूर्वीची माझी जिज्ञासा त्या संस्थांनीं पुरवली, तरी मडळी आतां मात्र कार्यनिर्माण इत्यादि ही आशा मोठी होती. पूर्वीचे स्नेही आतां कोठे गेले नाहीत तर

नवल, अथवा पूर्वी स्नेह दाखवला हेंच आमचें चुकलें असें द्रोहाचें उलटें माप आमच्या पदरांत त्यांनीं घातलें नाहीं, म्हणजे मिळविलं, अशी माझी मनाची मी तयारी करून ठेविलीच होती. आता दुज्ज असलेली कल्पना सागणें म्हणजे ती पार पाडण्याची योजना देखील तयार पाहिजे हें उघड आहे आणि ज्या खंडात गुप्त तऱ्हांचें गुर्मे जाळें पसरलेलें असतें, त्या या युरोपात अगदीं उघड योजना सागणारा बावळटच ठरणार होता, हें मला माहीत होतें तथापि व्हॅल्कनोचीही आग खाऊन टाकण्याचें सामर्थ्य जसें वायूत असतें, वडवानलालाही उदरीं सांठवण्याची ताकद जशी सागराला असते, त्याचप्रमाणें आपणही सत्याच्या प्रखरतर धारेनें या राक्षसी खंडाचा रजोगुण प्रथम ताब्यात आणू व नतर जर परमेश्वरकृपेनें आखिल जगत्सभा भरलीच, तर सत्प्रेमात तो रजोगुण प्रवृत्ति मिसळवून देण्यास मदत करू अशी खूणगाठ बाधून मी लिस्बनशहरापासून व्याख्यानाना सुरुवात केली.

पोर्तुगीज लोकांनींच प्रथम हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर पाय ठेविला होता, या ऐतिहासिक सत्याची त्याना एकच बाजू माहीत होती पण मी त्याना दुसरीही दाखविली ती अशी कीं, ज्या, मूरलोकानीं त्यांच्यावर तिनशें वर्षें राज्य केलें होतें, त्या मूरलोकावर सुद्धा, आमच्या हिंदुसंस्कृतीचा परिणाम झाला आहे त्याचें मूळचें वसतिस्थान जें मध्यआशिया, त्यात आम्ही आर्य प्राचीनकाळीं अनेक शतकें राहत होतों, शिवाय हिंदुस्थानातूनही पणि नावाचे व्यापारी समुद्रमार्गानें खाल्डिया, बॅबिलोनिया, असिरिया, मिसर वगैरे देशात वसाहती करून राहिले होते त्यानींच आमची हिंदी संस्कृति पसरवून दिली होती ती पाझरत सिथियन व मंगोलियन लोकातूनही कालांतरानें उद्भुत झाली ख्रिश्चनिटीचीं, जन्म, उदय, अभ्युदय वगैरे सर्व रुपांतरें अभ्यासिता, आमच्या हिंदुधर्माचींच तीं ठिकठिकाणीं लावलेलीं आणि लागलेलीं रोपटें होतीं असही मी त्याना थोडक्यात पटवून देण्याचा प्रयत्न केला ही धर्मैकता आज, वाहनाच्या सोयीमुळें प्रथम लक्षात आली व अभ्यासकानीं ती गोष्ट सप्रमाण सिद्ध केली आहे, ही काही खोटी गोष्ट नाहीं, मात्र आजमितीस जें काहीं भेद दिसतात, त्याला मुख्य कारण कीं, धर्माच्या ऐहिक बाजूपैकी राजकारणाला अवास्तव महत्व दिलें गेलें आहे. त्यामुळें दृष्टिकोनच चुकत आहे, आणि ही ढोबळ चूकच अत्यंत

प्राणघातक आणि सर्वस्वविनाशक होत आहे, लढाया, युद्धें, व्यापारी चटाओढ, गुप्ततह, राष्ट्रसंघ वगैरेंनीं अशीं प्रत्येक राष्ट्राचें नुकसानच होत आलें आहे नीति मत्ता विघडली, कला मेली, ग्लानी आली, बुद्धि थकली, व शेवटीं झोंप आली, व अशीं नाश झाला, असाच सगळ्या प्राचीन साम्राज्याचा इतिहास, त्याचीच तुम्ही युरोपियन राष्ट्रें पुनरावृत्ति करीत आहात, हें मी त्याना विशद करून दाखविलें, आणि आता आपल्या मानवजातीची अशी स्थिति आली आहे कीं, जिंकायला जग उरलें नाहीं म्हणून जसा शिकंदर रडला म्हणतात, तसें भांडायला बळ उरलें नाहीं, म्हणून वेट लागण्याची, निदान युरोपला तरी पाळी आली आहे मी त्याना स्पष्टच बजाविलें कीं, सत्त्वगुणाची हेटाळणी करून, भौतिक शास्त्राच्या जोरावर पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं ज्या ज्या शक्तींचा शोध लाविला आहे, त्या सर्व विवक्षित राष्ट्राच्या स्वार्थी महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्याकडे उपयोगात येत असल्यामुळें, त्याच्या भस्मासुरी वृत्तींनीं अखिल मानवसमाजाचें कसें नुकसान होत आहे हें गेल्या महायुद्धात चागलेच निदर्शनास आलें आहे आज त्या भस्मासुरी शक्तींचा उपयोग इतर राष्ट्राच्या नि पाताकडे जरी करण्यात येत आहे, तरी चित् शक्तींचा दुरुपयोग ईश्वरीसंकल्पाविरुद्ध असल्यामुळें हीच भस्मासुर शक्ति आपल्या जनकराष्ट्राचाही नि पात केल्याशिवाय राहणार नाहीं परमे श्वरी शक्ति जरी तुमच्या तूर्त लक्षात येत नसली तरी एक तर पहाल किनई कीं निसर्गाचीं सकटें माल सपलीं नाहींत, किंबहुना तुम्ही पोर्तुगीज किंवा जपानचे जपानीज याना तर धरणीकपाचे जबरदस्त धक्के बसून तुमचा चुटकीसरसा सहार होतो तुमची अशा का कल्पना आहे कीं, तुमचा सहार पाहून, आम्हा बाकी राष्ट्राना आनद होतो तसें तुम्हाला वाटत असेल तर तें अगदीं खोटें आहे. मानव अजून खाचित इतका निर्दय झाला नाहीं कीं, तो शत्रूलाही अपघातानें जमिनींत गाडलेला अगर आगीनें भाजलेला पाहून आनद मानील नव्हें नव्हें, तो उलट निवळेल, नतर प्रसगोपात् तो शत्रूशीं भाडेल, पण त्यावेळीं तरी तो आपल्या शत्रूलाही खड्ड्यातून काढील कत्तलखान्यात रोज शेंकडों गायी मार णारा खाटिकसुद्धा, रस्त्यावर गाडीखालीं सापडलेल्या कुत्र्याला वाचविण्याची पराकाष्ठा करितो दया, माया, प्रेम या मनुष्याच्या नेहमींच्या भावना आहेत मनुष्य खरा असा क्वचित्च रागावतो, आणि अत्यत तापट मनुष्यसुद्धा चोवीस तासा-

तून दोन मिनिटेंसुद्धा रागवत नाहीं. मनुष्य कोमल भावनांत जितका वेळ राहूं शकेल त्याच्या शंभरपट कमीच निष्ठुर भावनेंत राहील. मत्सर करण्याची संधि तर हजारांतून एकाद्यालाच मिळते. लोभ हा विकार मात्र मनुष्याच्या मागें झोंपेंतसुद्धां लागलेला आहे, परंतु प्रेम करूनच आपणास अंतीं जास्त किफायत होते, अशी जर मनुष्याची खात्री झाली तर, लोभ ही वृत्तिसुद्धा मायेचीच दुसरी वाईट बाजू आहे, व ती सहज बदलवता येईल हें त्याला दिसूं लागेल, सुष्टदुष्ट भावनांचा लोभ हा कॉमन प्लॅटफॉर्म आहे. तेव्हां त्यावर जाणून सवरून शोक-पर्यवसायी नाटकेंच कां करावीं हें मला समजत नाहीं. शोक मानवीस्वभावांतून जाणें शक्य नाहीं हें कबूल, पण त्या गाळाला स्वभावसागराच्या तळातच राहूं देण्यास काय हरकत आहे ? अशा तऱ्हेनें निसर्गाचे नियम जर मानवांना सारखेच असतात, तर मानवांचेच नियम मानवांना विपरीत कां असावे, अशी शंका मनीं काढून, त्याना सांगितलें कीं आत्मैक्यता ठेवूनही, धर्मभिन्नता, जातिभिन्नता रीतिभिन्नता, वेषभिन्नता व भाषाभिन्नता यांच्या द्वारें सद्भावना विकसित करिता येतात. मात्र शरीराला योग्य तीच किंमत दिली पाहिजे. आतां धनसंचय, अन्नसंचय, व अस्त्रसंचय याचे दिवस राहिले नाहींत. आतां चांगल्या मनोवृत्तींवर प्रभुत्व पाहिजे म्हणजे शास्त्रशोध करून आपणास चंद्रावर व मंगळावर जातां येईल, व येथें पृथ्वीवर मानवजातीचा, एका संस्कृतिसाम्राज्यांत अंतर्भाव करून तरी शांतता व सौख्य याचा स्वर्ग उत्पन्न करतां येईल, असा माझ्या व्याख्यानांचा गोषवारा आहे व्याख्यानें देतांना इतर राष्ट्रांप्रमाणें हिंदुस्थानवरहि टीका करतों. पण दोष दाखवण्यापेक्षां राष्ट्राराष्ट्रांचें गुणस्तुतिच दाखविणेंच मला आवडतें

माझ्या अपेक्षेप्रमाणें, युरोपियन राष्ट्रांतील आवेशाग, आमचेरिकन इति-हस्यांतच माझ्या प्रत्ययाला येऊन प्रथमप्रासे मक्षिकापात. माझ्या अनुभवाला आला. माझी अमेरिका रांडांतली व्याख्यानें आहेर झालीं होतींच. आणि आधुनिक वर्तमानपत्रकारांच्या, सुधारलेल्या (!) मताप्रमाणें, कोणतीहि बातमी, व्याख्यान, अगर लेख, आपल्या राष्ट्रास कसा उपयोगी पडेल, या दृष्टीनें शब्दाचा, सर्वांच माझीं व्याख्यानें, वर्तमानपत्रांत, युरोपांत विरुद्ध दृष्टींत प्रसिद्ध झालीं होतीं. अमेरिकेंत असतांनाच मी दाखल

तक्रार केली होती, पण एका वर्तमानपत्राविरुद्ध दुसऱ्या वर्तमानपत्रात तक्रार केली तरी, तें दुसरें वर्तमानपत्र पहिली चूक न सावरता आणखी दुसरीच करून ठेवी, व अशारीतीनें प्रत्येक ठिकाणीं चुक्याचेंच जाळें होऊन त्यात मूळचें आपण अगदींच विपरीत रूपात दिसें मी तुमचें ( गांधींचें ) राजकारण लढवायला, व जमल्यास अमेरिकेची मदत मागण्याकरता आलों आहे, असें माझ्याच तोंडीं एका वर्तमानपत्रानें कोंबलें, तर दुसऱ्यानें मी हिंदू महासभेच्या, चढाऊ हिंदुत्वाचा, प्रचारक आहें असेंही मी सांगितल्याचें भासविलें आहें एका महाविद्वान् संपादकानें तर बेलाशक माझ्या व्याख्यानात आपलेंच मत ठोकून दिलें आहे कीं, ब्रिटिश सत्तेला टाळून आम्ही ख्रिश्चनसुद्धां होतों, पण आम्हास ब्राझिलमध्यें वसति पाहिजे होती ! अशा विपरीत जाळ्यात सापडलेला मनुष्य भांबावून जातो, व त्यानें आपल्या इतर व्याख्यानातून या अनिष्ट प्रकाराचा कितीही निषेध केला, तरी एक तर व्याख्यानास आलेला श्रोतृवर्ग लहान व वर्तमानपत्राचा वाचकवर्ग खूप मोठा म्हणून आपला निषेध जवळजवळ लगडा पडतो, आणि त्यातही युरोपातले श्रोते तर व्याख्यात्याच्या निषेधापेक्षा संपादकाच्या रिपोर्टांनाच खरे मानतात, सबब, निषेध करणारे आपण निषिद्ध ठरतों. युरोपातल्या आणि अमेरिकेंतल्या मॉन्स्टर मीटिंग्ज् पोलिटिकल अथवा फ्युनरल असतात माझ्या व्याख्यानाला एका संपादकानें मोठें विनोदी नांव दिलें आहे. रिलिजिओ, पोलिटिकल, सोशॅलिस्टिक फिलॉसॉफिकल स्पिरिच्युलिझम्चीं माझीं व्याख्यानें असतात असें तो म्हणतो, असो.

तसाच प्रकार माझा पोर्तुगाल व स्पेनमध्यें झाला, आणि दक्षिण अमेरिकेंत त्यान्याच रक्तानें मिश्रण मोठ्या प्रमाणात असल्यामुळें मला आरंभीं आरंभीं धाकदपटशा देखील देण्यात आला. परंतु युरोपातच माझें शिक्षण झालें असल्यामुळें मला या संपादकाची सुल्तानशाही माहीत होती, आणि तिलाही तोंड देण्याची योजना मी अटलांटिक महासागरात असतानाच करून ठेविली होती या बाबतींत मला दोन मार्ग नेहमीं बरे वाटतात एक सत्याचा व दुसरा सत्याभासाचा पहिला आम्हा हिंदूंचा, व दुसरा बर्नार्ड शॉसाहेबाचा. मला जेव्हा पोर्तुगीज लोकानीं धर्मैक्यतेंत फुलेरेनें अडविलें तेव्हा Religion now is a bombarded force ( धार्मिक तेज आता फुटून

विझलें ) असा एकदम बाँव टाकिला मग तुम्हीं इथ कशाला आला असें ते आपण होऊन विचारूं लागलें, व मग मीं त्याना सागूं लागलों तसे ते नीट ऐकूं लागलें ! एका मायेफिल्नें मला धमकी दिली कीं तुमचा एखाद वेळीं खून होईल ! तसें मीही पटकन् सागितलें कीं, By my death, you will learn that I love you the more for it ( तुम्हीं मला मारिलें तर माझ्या मृत्यूमुळेंच, माझी तुमच्यावरची प्रीति तुमच्या लक्षात येईल ? )कशी? म्हणून त्यानें विचारिलें, व मग तो माझें स्पष्टीकरण ऐकूं लागला अशा रीतीनें मी माझें कार्य दणकून चालविलें आहे, व आज A very formidable preacher of love प्रेमाचा दाडगा पैगंबर अशी माझी यानीं ख्याति केली आहे फार चागलें ! मिळमिळित शहाणपणापेक्षा दणदणित मूर्खपणा पुष्कळ चागला मी तर सबध युरोपात अशाचि गोड दाडगाई चालविण्याचें ठरविलें, असो आयबेरियात माझी कल्पना प्रस्तुत झाली, एवढाच माझा फायदा झाला आहे एक मात्र अगदीं खरें कीं, आम्हीं भारतीयानीं लवकरच कूपमडुकत्व सोडावें रविंद्रनाथ म्हणतात तेंच खरें, सर्व प्रकारचें ज्ञानकिरणें आत घेण्याकरता आपलें घर मोकळें ठेवा, मी त्याच्यापुढें जाऊन म्हणेन पाहिजे असल्यास काहीं कारणाकरता घरें बद करा, पण मग घरात म्हातारी कोतारीं माणसें ठेवून सुवकाना बाहेर जगात फेका आमच्या त्र्यबकजा डेंगळ्यानें दक्षिण आफ्रिकेंत शिवाजी महाराजांचें साम्राज्य पसरवलें असतें पण घरीं तुरुगात कुजून मेला तरी क्लाइव्हपेक्षा त्र्यबकजी लाखपटींनीं हुषार होता पण माझ्या शेंकडों व्याख्यानानीं होत नाहीं तितका फायदा गुलाबच्या मजुळ काव्यगायनानें होतो बुवा ! महात्माजी ! मुसलमानांच्या अगोदर सर्व जगातून कवि लोक का बरें फिरत नाहींत ? गुलाबनें काहीं स्पॅनिश सॉंगचें भाषातर केलें आहे महाराष्ट्रीय कवींपैकीं माधव ज्युलियन याना स्पॅनिश कवि-तेचें वळण फार उपयोगी पडेल असें तिचें मत आहे पुढील खबर पुढील पत्रीं लिहीन कळावें

जा. म गुलाबचीं, " ब्रॅझिलची शोभा " ही कविता स्पॅनिश लोकाना फार आवडली.

आपला पुत्रतुल्य
**मृगेंद्र**

§ ४ या तिसऱ्या पत्रात महात्माजींना एक नसतीच काळजी करण्यासारखें असें होतें कीं, आपल्या अनत्याचारी असहकारितेचा मृगेंद्राच्या सफरीमुळें वेगळाच डागोरा पिटला जातो. इतर काय. म्हणतात हें जाणण्याची त्याची इच्छा नव्हती तीं राष्ट्रें जर आम्हाला क पदार्थ समजतात. तर आम्हीं तरी त्याच्या बोलण्याकडे सर्वस्वीं दुर्लक्षच का करू नये ? असें त्याना वाटे. रवींद्रनाथ टागोराच्या परमत मान्यतेला, म्हणूनच गाधी मान्यता देत नव्हते. पण आता मृगेंद्राच्या पत्रामुळें त्याना तें ऐकून घ्यावें लागत होतें, व ही पीडा आपणच आपल्या हातानें ओढवून घेतल्यामुळें तर त्याना स्वत शिवाय दुसऱ्या कोणालाही दोष देता येत नव्हता.

ते अशा चिंतेत असताना, कस्तुरी त्याच्याकडे आली. दिवस उन्हाळ्याचे असल्यामुळें, ती खादीच्या जाड पातळानें आलेल्या घामानें डबडबली होती ती त्याना म्हणाली,

" बापूजी, कसली चिंता करतां ? "

महात्माजींनी तिला मृगेंद्राचीं पत्रें वाचण्यास दिलीं. यापूर्वी तिनें कधीं पत्रें वाचण्यास मागितलीं नव्हतीं, व महात्माजींनीही तिला आपण होऊन दिलीं नव्हतीं. तिच्या हृदयाची खोली गाधी चागलीच जाणून होते. आज त्यानीं तीं आपलीं सहजच पुढें केलीं. कस्तुरीही घाम पुसत तीं पत्रें वाचूं लागली तिला पुन्ह पुन्हा घाम यावा व, तिनें तो पुन्हापुन्हा पुसावा. पण एकदां मात्र गाधींनीं तिच्याकडे अत्यंत बारकाईनें पाहिलें, व काय असेल तें असो, त्याचा चेहरा दुःखानें व्याकूळ झाला. तें कस्तुरीच्या लक्षात आलें कारण तीही मधून मधून त्याच्याकडे पहा होतीच. तिनें महात्माजींना दु खाचें कारण विचारलें, पण महात्माजींनीं टाळलें शेवटीं तिनें अतिशय दुराग्रह केला, व त्या महात्म्याला खोटें बोलणें माहीत नसल्यामुळें, त्यानीं तिला पटकन् पोटाशीं

थम्म, तिच्या कानांत तें कारण सांगितलें. तशी ती दीनकुमारी एकदम रंगली. पण महात्माजींनीं तिला धीर दिला; व तिच्या दुःखाचा वहर कमी झाल्यावर ते झोपडींतून निघून गेले. यमुरीच्या अंगावर पडिलांच्या रोगाचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. औत्सुक्यभावानुरूप तिनें स्वाभाविकपणेंच मनांत विचारून म्हटलें,

"गांधी महात्मा खरे ! पण सैतान कीं साधु ?"

पुस्तक दुसरें

# सैतान !

भाग सातवा

मेल्हण्याचें महाराष्ट्र.

She said to her husband, "This is not the children's tragedy. This is my tragedy. These were not the children's faults. These were my transgressions. Life is sacrifice. I never sacrificed. Sacrifice is atonement. This Freedom !

*A. S. M. Hutchinson*

राज्यविस्तार शक्तीबाहेर गेला, आणि उत्पन्नाचा बहुतेक भाग लष्करी खात्याकडे अडला जाऊन न्याय लोकशिक्षण वगैरेंना अत्यावश्यक कामाकडे दुर्लक्ष होऊं लागलें, म्हणजे राज्यास उतरतीकळा लागल्याचीं चिन्हें दिसावयास लागलीं असें आजपर्यंतच्या इतिहासावरून सिद्ध झालें आहे.

निबंध-संग्रह भाग २ रा

गोपाळ गणेश आगरकर.

§ १ सुरेंद्र आणि माधवराव याच्या राजनाम्यापैकीं, मधवरावाच्या राजनाम्याची गोष्ट सोपी नव्हती. लष्करी खात्यातला राजीनामा असा सहजासहजीं मान्य होत नाहा. त्याला बराच अवधी लागतो; शिवाय तो मान्य होईपर्यंतच्या मुदतींत आधिकाऱ्याच्या अवकृपेंत दिवस कठावे लागतात. तथापि त्या दोघा मेव्हण्यानीं आपआपल्या ध्येयांकडे इतकें सुरेख लक्ष दिलें होतें कीं, त्याच्या त्या मधल्या काळात, काहीं विशेष अशा गोष्टी घडल्या नाहींत. आणि हें लिहिताना दुसरी बाजूही तितक्याच निस्पृहतेनें सागितली पाहिजे कीं, वरिष्ठ आधिकाऱ्याकडूनही त्या दोघाना त्रास झाला नाहीं. वरिष्ठ आधिकाऱ्यानीं याच्या भेटी घेऊन, राजीनाम्याविषयीं साधकबाधक बोलणें केलें असेल, पण तें करणें हें त्याचेंही कर्तव्यच होतें. तें त्यानीं केलें नसतें तर त्याच्याही वरिष्ठ आधिकाऱ्यानीं त्याना दूषण तर दिलें असतेंच, पण त्या पराचा लोकाग्रणींनीं दसपट तर लोकानीं शंभरपट, कावळा केला असता. सरकार व प्रजा याच्या भाडणात सत्य सर्वांशीं एका बाजूकडेच असतें असें कदापि म्हणतां येणार नाहीं. त्यातल्या त्यात सरकार जर विदेशी असलें तर त्याना दोषाचाच आहेर करण्याकडे प्रजेची दृष्टि बहुधा असते. उलट विदेशी सरकारला प्रजेच्या आकांक्षेची कल्पना, बहुतकरून बंधुद्रोह्याकडूनच मिळालेल्या माहितीवरूनच करावी लागल्यामुळें, ती हटकून चुकते व त्या चुकीचें प्रायश्चित्त त्या लटपट्या मध्यस्थाऐवजीं सरकारलाच भोगावें लागतें. सबब सर्व जगातील राजनीतिनिपुण ग्रथकाराचें असें म्हणणें आहे कीं, परकी सरकार हें कधींच नसावें. याचाच मृगेंद्रासारखें संस्कृतिसाम्राज्याचे भोक्ते असा अर्थ करितात कीं, ही स्वकीयपरकीयत्वाची कल्पना आता मानवजातीला शोभेनाशीं झाली आहे एकजागतिक साम्राज्य करावें, त्यात धर्म, जाति, रीती वगैरे भेदवाचक मनुष्यसंघाना, दुसऱ्यांना अपाय होणार नाहीं, अशा पद्धतीचें पूर्ण स्वातंत्र्य असावें, वाटेल त्या संघानें राजा ठेवावा, अगर पार्लमेंट राहूं द्यावें, अगर आपणास इष्ट ते फेरफार करीत रहावें. पण दुसऱ्या मानवसंघाना काहीं अक्कल नाहीं, तें रानटी आहेत, त्याना आपला साभाळ करिता येत नाहीं, त्याचा धर्म हीन आहे, अगर त्याना धर्मच नाहीं, जे आहे ते फक्त आम्हींच आहोंत, अशा संकुचित व क्षुद्र बुद्धीची यापुढें शरम वाटली पाहिजे, अशी मृगेंद्राची संस्कृतिसाम्राज्याची कल्पना. असो.

§ २ राजीनामे स्वीकारले गेल्याबरोबर महात्माजींच्या सल्ल्यावरून ते मेहुणे महाराष्ट्रात आपापल्या कार्याला बरोबर बाहेर पडले. सुरेंद्राला महाराष्ट्रीय महिलाची तेजस्वी प्रतिष्ठा वाढवावयाची होती; आणि माधवरावाना महाराष्ट्रीय तरुणाना शिस्त लावावयाची होती. सुरेंद्राला वाटे कीं मराठी स्त्रियाना जगातल्या संस्कृतिरार्क्षाची काहीं माहिती नाहीं, ती त्याना करून द्यावी आणि माधवरावाना वाटे कीं, मराठी तरुणांना आपण काय करतों आहोंत याची बरोबर कल्पना नसल्यानें ते मध्येंच गळतात; नाहीं तर त्याची पावसाळी पक्षहीन सुरवंटामारखी शोचनीय स्थिति होऊन, ते स्वत ज्या वृद्ध मातापित्याना अर्धाच्चची भाकरी मिळविणारे व्हावयाचें, त्यानाच उलट भारभूत होऊन, समाजालाही तापदायक होतात, सबब त्याना जर शिस्त लाविली तर तमे यारा, शिस्तीचे तरुण, हल्लींच्या बाराशें बाजारबुणग्यापेक्षां जास्त कार्यकारी होतील, अशी माधवरावाची खात्री होती, नव्हे, त्याचा तसाच अनुभव होता.

राष्ट्रकार्यात एखादवेळेस अशी मौज पहावयास सापडतें कीं, काहीं घराणी एकदम विलक्षणतेनें डोळ्यात भरतात. नेहरू पिता, पुत्र, माता, स्नुषा, त्याचप्रमाणें गांधींचेंही सर्व घराणें, आणि महाराष्ट्रात टिळकाचें घराणें, त्याचप्रमाणें मुसल्मानात अलीबंधु व त्याची माता, अशीं उदाहरणें दाखवता येतील. या घराण्यातील सर्व वर्त्या स्त्रीपुरुषाचीं कार्यें राष्ट्रहिताम पोषक होतात, अशी प्रस्तुत लेखकाची खात्री आहे. टिळकपुत्राचीं विशिष्टप्रणाचीं कृत्यें राष्ट्रास घातक आहेत, अगर अलीबंधूंची शिथीलता अयोग्य आहे, असें म्हणण्याचें धार्ष्ट्य या ग्रंथकाराकडून करवत नाहीं. परमेश्वराचा गुप्त हात यावरून अनिष्ट दिसणाऱ्या कृत्यातून नेहमीं चागलेंच कार्य करीत असतो, अशी याची निष्ठा आहे. ज्याना कोटी लोकांनीं पाहिलें त्याला देवानेंच निवडलें आहे, व तो कधींहि वाईट कृत्य करीत नाहीं अशी याची पूर्ण श्रद्धा आहे. हें एवढ्याचकरिता सागायचें कीं प्रस्तुत कादंबरीचें क्षेमकल्याणींचें घराणें असेंच दोन चार वर्षांत एकदम पुढें आलें. दादासाहेबाची मनोरचना साधारणपणें गांधींच्या विरुद्ध तर सुरेंद्राचा महात्माविषयीं सर्वांत ज्यास्त जिव्हाळा असूनहि, त्याचा मार्ग आपला एकदम वेगळाच होता दादा साहेबाचा विरोध गांधींना जास्त विघातक, कीं सुरेंद्राचा स्नेहभाव जास्त विध्वंसक हें ठरविणें कठीण आहे. तथापि त्या पितापुत्राचें कसेंही असो, सुरेंद्र,

मणिला व माधवराव हीं तिघें मात्र एकदम गांधींच्या निशाणाखालीं कार्य-प्रविण झालीं खरीं. एकानें आपल्या बायकोसह राष्ट्रीयशिक्षणाची उत्तम बाजू साभाळली, व दुसऱ्यानें दुसरी शिस्तीची बाजू साभाळली, खुद्द गांधींसारख्या थोर विभूति लोकमान्यासारख्याच, ज्याचें जे तेज, तें त्यानें राष्ट्राला अर्पण करावें, इकडेच पहातात. खरें खोटें, लहान मोठें, असा भेदाभेद ते थोर पुरुष ओळखून मनातल्या मनात ठेवितात. असो.

सुरेंद्र व माधवराव यानीं नागपूरपासून आरंभ करून रत्नागिरीपर्यंत तीन महिन्यात दौरा संपविला. सुरेंद्राच्या मनातून जाहीर व्याख्यानें द्यावयाचीं होतीं, पण माधवरावाचा व्याख्यानापेक्षा तज्ज्ञाशीं वादविवाद करण्यावरच जास्त विश्वास होता. त्या दोघानाही महाराष्ट्राची फारशी ओळख नव्हती. ते महाराष्ट्राची मनोरचना वर्तमानपत्रावरूनच ओळखून नागपूरला गेले होते. मणिला शिकलेली पण लाजाळू असे. तिला विद्यादानाशिवाय दुसरें कांहीं करता येण्यासारखें नव्हतें. ती स्त्रीमंडळींत देखील बोलण्यास धजत नसे. त्यातून तिच्या लग्नाची गोष्ट चागल्या रूपात घेण्याची महाराष्ट्रीयाची दिलदार मनोरचनाही नव्हती, हें तिला नागपूरलाच समजून चुकलें. माधवराव दाडगा आणि हुषारही मनुष्य होता, आणि सुरेंद्राची वैखरी बापाभावाप्रमाणें प्रस्फुरित होती. म्हणून मणीलेचा थेटपर्यंत निभाव लागला आणि पुण्याला गोपाळराव देवधर व धोंडोपंत कर्वे याच्यासारख्याचा पाठपुरावा मिळाल्यापासून तर, तिला आपण चागलेंच राष्ट्रकार्य हातीं घेतलें आहे असा विश्वास पटूं लागला.

सुरेंद्र व माधवराव याना नागपूरलाच जो अनुभव आला त्यावरून त्याना कळून चुकलें कीं, महाराष्ट्रात पहिल्या प्रतीच्या पुढाऱ्यामध्यें दुफळी आहे, व जनता दुय्यम पुढाऱ्याच्या दर्जाच्या मार्गें लाजेकाजेनें, नाहींतर, हमरीतुमरीनें जात आहे. अशा वेळीं दुय्यम दर्जाच्या पुढाऱ्याशीं पत्तें घेऊनच कार्य करणें माधवरावाना इष्ट वाटलें, तरीपण मोठमोठ्या पुढाऱ्याना टाळता येणेंही शक्य नाहीं. कारण प्रतिष्ठित वर्तमानपत्रें त्याच्या हातात होतीं, व त्याच्याच सूत्रानें अनेक संस्था चालत होत्या. त्याची इभ्रत व दुय्यम पुढाऱ्याची करामत या दोहोंचाही त्यांनीं आपल्या कार्याकडे उपयोग करून घ्यावयाचा होता आणि तसें

करताना त्यांना त्पडाव अथवा आतल्या गाठीं मुळींच ठेवावयाच्या नव्हत्या No reserved mentality अशी गांधींची त्यांना स्पष्ट इशारत होता, म्हणून त्या दोघानीं या पहिल्या दौऱ्यात जरी व्याख्यानें अशीं कोठेंच दिलीं नाहात, तरी सर्व प्रकारच्या पुढाऱ्याची नाशिकला मुद्दाम एक बैठक भरविली, व तींत पुढील प्रश्न विचाराकरता ठेवले

( अ ) टिळक विश्वविद्यालयाला अखिल महाराष्ट्रात शाखाचें जाळें पसरण्या इतकें व्यापक व सुसघटित रूप देता येईल कीं नाहीं ?

( आ ) देता आल्यास कसें द्यावें ? प्रान्तिक स्वरूपाचें कीं भारतीय स्वरूपाचें अगर मिश्र रूपाचें ?

( इ ) देतां येणार नाहीं असें ठरल्यास आशावादी कार्यकर्त्यांना मोकळे मार्ग देखण्यास मोठमोठे पुढारी तयार आहेत काय ?

हे तीनच प्रश्न भरपूर व्यापक होते ते पुढें माडताना सुरेंद्रानें लहानसेंच भाषण केलें तो म्हणाला,

"आम्ही दोघे महाराष्ट्रीय असलों तरी आमच्या पूर्वीच्या एकदोन पिढ्या गुजरायें-तच होऊन गेल्या आहेत त्यामुळें आम्हास आजच्या महाराष्ट्राची विशेष ओळख नाहीं तथापि महाराष्ट्रीयाच्या अगदी काटकपणा, तिखटपणा व प्रमर्गी उत्पन्न होणारा राष्ट्राभिमान, म्ह० स्पष्ट सागतों कीं, प्रान्ताभिमान हे तीनही गुण आम्हास आदरणीय वाटतात आता या विसाव्या शतकात त्या प्रान्ताभिमानाला भारतीय राष्ट्राभिमानातर्गत असेंच स्थान देणें योग्य होईल परतु ज्यांचा प्रान्ता भिमान पूर्वेतिहासानें उज्ज्वलित झालेला आहे आणि त्याला भारतीय राष्ट्रा भिमानानेंच वाढीला जागा आहे, नाहींपेक्षा तो परस्परातच दुहीची आग पेटवून सर्वांना जाळून टाकण्यास' कमी करणार नाहीं असें ज्याना कळलें, अशाच महाराष्ट्रीयाकडून भारतीयराष्ट्रसेवा व तिच्या पोटात महाराष्ट्रायसेवा होणें शक्य आहे, इतराच्या हातून दोन्ही प्रकारची सेवा होणें कदापि शक्य नाहीं आम्ही नागपूर ते रत्नागिरीपर्यंत हिंडलों, व महाराष्ट्राची स्थिति अवलोकिली, तींत आम्हाला असें दिसलें कीं, लोकमान्य टिळकांच्या पश्चात् त्याच्या शिष्यवर्गात दुही माजली आहे, व गांधींचें राजकारण जसें चढेल वा पडेल, तसे लोक केळकराना मिळतात अथवा गांधीभक्त अशा पुढा

त्यांना मिळतात. प्रत्येक प्रांतांत, इतर स्वतंत्र राष्ट्राप्रमाणेंच दुय्यम पुढारी असतात तसे येथें महाराष्ट्रांतही आहेत, व त्यांपैकीं बरीच मोठी संख्या गांधीमतानुयायी आहे. त्यामुळें जनतेंतही जे सुशिक्षित व अशिक्षित, म्हणजे स्पष्टच बोलायचें झाल्यास इंग्रजी येणारे व इंग्रजी न येणारे असे भाग असतात, त्यांपैकीं सुशिक्षित कोणालाच न चिकटतां अलग राहिले आहेत. त्यांच्या गांधी टोपीनें व खादी वापरण्यानें ते गांधी मतानुयायी आहेत असें म्हणतां येत नाहीं. उलट अशिक्षित जनता गांधींच्या चळवळींत भाग घेते. परंतु तिला आपण काय करतों आहोंत याची बरोबर कल्पना नसल्यामुळें ती लाजेकाजेनें अथवा हमरीतुमरीनें चळवळींत पडते, व ही चळवळच अशा स्वरूपाची आहे कीं, येथें आत्मबलच पाहिजे. आत्मबलाचा सरळ अर्थ हाच कीं, चळवळींत पडणें म्हणजे स्टीमरोलर खालींच सांपडणें. आपण आप्तेष्टांना मुकलों व आप्तेष्ट आपणाला मुकले हीच एक सत्यवाणी इथें आहे. पण ही अत्यंत कठिण आहे. महाराष्ट्र गरीब आहे. नव्हे कंगाल प्रांत आहे गुजराथ श्रीमंत आहे; शिवाय त्याला महात्माजींसारखा असामान्य पुढारी लाभला आहे, म्हणून चळवळींत भाग घेणाऱ्याच्या मागें त्याच्या पोराबाळांची तजवीज होते. या जाणिवेनें तेथें बायादेखील चळवळींत सामील होतात. महाराष्ट्रांतील स्त्रियांची चळवळ फक्त प्रभातफेरीपुरती अगर व्याख्यानापुरतीच असते. बंगालची गोष्ट महाराष्ट्रापेक्षा पुष्कळच चांगली आहे. तेव्हां या चळवळींची जी आर्थिक बाजू आहे तींत महाराष्ट्र लंगडा प्रांत आहे. म्हणूनच अशिक्षित जनता जेव्हां कच खाते तेव्हां तिच्यावर रागावण्याचें कारण नाहीं, आणि दुय्यम पुढारी फंडाचा हिशेब बरोबर देत नाहींत, तेव्हां त्यांनाही बोल लावितां येत नाहीं.

स्थिति दिसली ती आम्हांला अशी दिसली पण यापलीकडे आमची दृष्टि गेली आहे. अशा कंगाल महाराष्ट्रांत जितक्या नाटककंपन्या व सिनेमा-थिएटरें, त्याचप्रमाणें खासगी शाळा, कॉलेजें, सेवासदनें, वर्तमानपत्रें, स्त्रियांची युनिव्हर्सिटि, वाङ्मयमंडळें, व क्षेत्रें आहेत, व त्या सगळ्या संस्था जितक्या सुसंघटित रीतीनें चालल्या आहेत, तितक्या संस्था अगोदर इतर प्रांतांत नाहींत, व आहेत त्याही इतक्या उत्तम पद्धतीवर चालल्या नाहींत. बंगाल महाराष्ट्राला हें कसें साधलें? आम्हांला याचें उत्तर असें आढळून आलें आहे कीं, महाराष्ट्रांत सामान्य जनत

# महात्मा गांधी-सैतान कीं साधु ?

जरी भयंकर दारिद्री असली तरी महाराष्ट्रातले देवधर, कर्वे, भाडारकर, प्रतापशेट, खाडिलकर, केळकर, पागारकर, भोगले, अजगांवकर, बालगंधर्व, शंकरराव देव, वासुदेवराव दास्ताने, गंगाधरराव देशपांडे, गिरीश टेंभुर्णीकर, निफाडकर, तटणीस, अधिकारी, वासुदेवराव जोशी, दादासाहेब खापर्डे त्यांचे चिरंजीव बळवंतराव खापर्डे, त्र्यंबकराव कुलकर्णी, अच्युतरावजी कोल्हटकर वगैरे संस्था चालक आप आपल्या संस्थाकरितां मनोभावें कार्य करून, द्रव्यसहाय्य मिळवूं शकतात, व पदरचा मोडही करितात. तेव्हा असें जर द्रव्यसहाय्य होतें, व कार्यकर्ती माणसेंही येथें आहेत, तर त्याच्याकडून, टिळकविश्वविद्यालय महाराष्ट्रभर पसरण्याइतकें कां मोठें होऊं नये ?

याचेंही उत्तर मिळतें. आश्रयदात्यापैकी संस्थानिकांनी सरकारच्या धाकामुळें टिळकविश्वविद्यालयाला मदत करतां येत नाहीं व दुसरें ' उत्तर पुढाऱ्यातच गांधींच्या चळवळीमुळें फूट आहे ठीक आहे द्रव्याश्रयाचा प्रश्न कार्यकर्त्यांना भिववीत नसतो, गांधींनीं जर महाराष्ट्रातूनही लाखांचे फंड गोळा केले, टिळकांना जर महाराष्ट्रातूनच यथान्याय पर्सेस मिळाल्या, तर टिळकांच्याच स्मारकाला काय महाराष्ट्र द्रव्यसहाय्य करणार नाहीं ? आज करीत नाहीं याला कारण पुढाऱ्यातली फूटच होय. ही फूट श्रीपुढाऱ्यात देखील सापडतें !

पुढाऱ्यात फूट कां होते, का झाली, हें पाहणें सोडून देऊं या. लोकमान्याच्या मृत्यूमुळें शिष्यात कांहीं काल भ्रम उत्पन्न झाला म्हणून फूट झाली, व तीच पुढें वाढली व आजही आहे, हें खोटें असें म्हणणें म्हणजे टिळकांना शिष्य निवडण्याची अक्कल नव्हती असेंच म्हणण्यासारखें आहे. टिळकांचे शिष्यही कांहीं सामान्य नाहींत. शिवाजीमहाराज व श्रीसमर्थरामदास यांच्यामागें असेंच झालें होतें हा ऐतिहासिक दाखलाही लावा पडेल, कारण त्याच्या हयातींतच भांडणें होतीं. तशींच टिळकांच्या हयातींतच भांडणें होतीं. तीं पुढें फुटली. ही गोष्ट लपवून ठेवण्यांत हशील नाहीं. महाराष्ट्रात तसेंच टिळकांनासुद्धा स्वजनाशीं भांडावें लागलें तेव्हां भांडणें हा महाराष्ट्राला रोगच आहे, शिवाय परप्रांतीय मोठ्या माणसाचा बाहेर हेवा करता येत नसता, तरी तो महाराष्ट्रात येताच त्याची टर उडवावयाची ही एक आत्मघातकी खोडही महाराष्ट्राला आहे ती टिळकापर्यंत

च्या महाराष्ट्राला पचली, पचली म्हणजे संकटें ओढविणारी झाली नाहीं. कारण ती मत्सराची खोड आणि तो भाडबुद्ळपणा याच्या पलीकडे जाऊन आपल्या स्वयंभु गुणसमुच्चयानें तेज पाडणारा असामान्य नरपुंगव महाराष्ट्रांत टिळकापर्यंत निपजत गेला, ती परंपरा थाबताच ते दुर्गुणही फलें धरीत गेले गाधींच्या तोडीचा पुढारी महाराष्ट्रात आज नाहीं, व आजचें युग असें आहे कीं, जरी यापुढें निघाला समजा, तरी तो कोता प्रांताभिमान उरीं बाळगून त्याला ती परंपरा राखता येणार नाहीं. कारण प्रांताभिमानानें प्रेरित व्हा अगर अगदीं अल्प अशा कुटुंबाभिमानानें कार्य करा, तो तुमचा अभिमान स्वार्थमूलक असेपर्यंत कधींहि तेज पाडणार नाहीं. संपत्तीचा स्वार्थ मी लक्षात घेतच नाहीं कारण कंगालाचा सांपत्तिक स्वार्थ तो कितीसा असणार ? परंतु मानपानाचा स्वार्थ मात्र रतिभरसुद्धा चालायचा नाहीं. अलीकडे तर रावबहादुरादि सरकारी पद व्याची लकाकी आजिबात गेली. पण पुढारपणाची मात्र हौस महाराष्ट्रात भरपूर आहे. आणि स्पष्ट बोलतों याची मला क्षमा करा, ही दिमाखाची घाण, नेमकी जेथें बसावी तेथेंच आहे टिळकाच्या शिष्यात नसावी पण तेथेंच आहे. उलट शाळाच्या आणि वाङ्मयाच्या संस्था पहा, महिलाच्या संस्था पहा, तेथें हा खोटा भाव नाहीं. मी तर या घाणीचें एक बिनचूक लक्षणच सागू शकेन. जेथें कार्य कणखर आहे, मग त्याचा फारसा विस्तार नसेना का, तेथें ही घाण नाहीं, पण जेथें पूर्वीच्या विभूतीच्या कार्याचा विस्तार मात्र आहे, पण कार्याचा दणगटपणा मात्र नाहीं, उलट शाब्दिक लफडाव मात्र भरपूर आहेत, तेथें ती घाण अलवत येते—

**एक सभासदः**— ही वैयक्तिक टीका आहे

**माधवराव** — हो, आहेच ज्याना बोचेल त्यानें ओरडावें

**दुसरा सभासद** — अशानें आपलें कार्य होईल का ?

**सुरेंद्र** —होईल! व असेच झालें पाहिजे कसें होत नाहीं हें आम्ही पाहूं हें बघा. आम्ही जेव्हा हे प्रश्न चर्चेला माडले, तेव्हाच ठरविलें कीं, आम्ही कार्य हें करणारच आम्हाला मान नको, पैसा नको, फक्त सोधा रस्ता पाहिजे आहे ज्याना कार्य करायचें नाहीं, त्यानीं कृपाकरुन दूर सरावें ज्याना कार्य करायचें आहे त्यानीं टिळकविश्वविद्यालयात शिस्तीनें काम करावें तुम्ही टिळकविश्वविद्या-

ल्याचीं दारें बंद कराल ही गोष्टच खोटी. कारण आजचे दुय्यम पुढारीच स्वार्थत्यागी आहेत. उच्च दर्जाचे पुढारी जर स्वार्थत्याग करणार नाहींत तर त्यांना शरम वाटेलसें आम्ही अलौकिक कार्य करून दाखवूं, शरम न वाटण्याइतके बेशरम खास नाहींत. आम्ही स्पष्ट सांगतों कीं, आम्ही टिळक विश्वविद्यालयात असें शिक्षण देणार आहोंत कीं तेणेंकरून विद्यार्थी पोट भरण्यास सार्थानें समर्थ होईल, व त्याला राष्ट्रसेवेचेही नाना मार्ग खुले राहतील. राजकारणाची सेवा तीच राष्ट्रसेवा असा आमचा समज नाहीं सरकारचें आमच्या शिक्षणाकडे व आरोग्याकडे कितपत लक्ष आहे हें दिसतेंच आहे. आपल्या आगरकर टिळकांचें भांडण आम्ही जमेस धरीतच नाहीं. पण त्यांची शिक्षणविषयक एकवाक्यताच आम्हीं लक्षात घेऊन चालणार आहोंत. आम्हाला सरकारी कैंचीचा पैसा नको; व गरीब अशा जनतेचाही नको. द्रव्याची गोष्ट आम्हीं आपल्याजवळ काढीतच नाहीं. फक्त प्रश्न एकच विचारतों. पहिले तीन प्रश्न आता कृपा करून विसरा. आता एकच प्रश्न. आमच्या कार्याची खात्री पटेपर्यंत आपण कृपा करून आडवे पडणार नाहाना ? आणि खात्री पटल्यानंतर आपण आम्हास शक्य तितकी मदत करणार ना ?

एक **स्वराज्य पक्षवाला** –गांधींचें राजकारण आमच्यावर लादणार नाहीं तर ? **सुरेंद्र**:— ( हंसून ) समजा लादलें. तर तुम्ही कसें आडवें पडणार सांगा? सरकारकडून त्रास देववून देशद्रोही खास बनणार नाहीं. आम्हाला पैसा नको. मनुष्यबळ माहाराष्ट्रांतून आम्हाला मुबलक मिळेल. आपण मोटमोठे पुढारी लोकहो, आपण खरोखरच बुद्धीमान् आहात. आम्हाला आपली बुद्धि द्या. तुम्हाला ती कोणाला तरी दिलीच पाहिजे. बुद्धि स्वस्थ कधींच बसणार नाहीं. आम्हाला दिली नाहीं तर सरकारला द्याल मग आम्हालाच का देत नाहीं. सरकार तुम्हाला पैसे देत असेल तर आम्हींही देऊं. पण उघडपणें देऊं

हें पहा, आता बौद्धिक लपंडाव चालायचे नाहींत. आम्ही देखील कसेंही झालों तरी महाराष्ट्रीयच आहोंत. आम्हाला आपल्याच माणसाचे लपंडाव कळतात. आम्ही या बाबतींत खरोखरच घरभेदे झालों आहोंत. आम्ही आमच्यातले लपंडाव ओळखून बेलाशक चव्हाठ्यावर मांडणार, पण तें करूनही पोट भरण्याचें, शिस्तीचें व राष्ट्रीयसेवेचें शिक्षण अगदीं टिळकविश्वविद्यालयांतून देणार.

महाराष्ट्राची अप्रतिम बुद्धि वाया जाऊ देण्यास, अगर तिच्या भोंवतीं वृत्रासुरासारखें अडविणारें स्वार्थी वर्तुळ राहूं देण्यास आम्हीं तयार नाहीं गांधींचा राजकारणाचा प्रयोगच आम्ही घेऊ असेंही नाहीं पण गांधींची सत्यप्रियता व मनोधैर्य, याची जोड लोकमान्याच्या कणखर व बुद्धिप्रवीण अशा महाराष्ट्राला मिळवून देण्यालाही आम्ही भिणार नाहीं परमेश्वरी उत्क्रान्ति हेतु लक्षात घेऊन आम्ही आपल्या महाराष्ट्रीय राष्ट्रशीलाची पुनर्घटना करणार तो हेतु परमेश्वराच्या घरीं केव्हांही रुजू असल्यानें आम्हाला परमेश्वराचेंच सहाय्य होईल आमच्या कार्याची प्रगती थोपवून धरण्याचें सामर्थ्य, परमेश्वराच्या सामर्थ्यापुढें टिकाव धरणार नाहीं. प्रान्ताभिमानाला, राष्ट्राभिमानाच्या मार्गाला आम्ही लावणारच लावणार तेव्हा बोला, आमचा तुम्ही उपयोग करणार कीं आम्ही तुमचा उपयोग करून घेऊ ?

**एक संपादक**—आम्हाला तुमची घटना दाखवा

**माधवराव**—घटना प्रत्यक्ष कार्य करताना दिसेल टिळकांची शिकवण अशीच आहे कीं, विचारातच वाफ गमावू नका कार्याला लागा कार्य व विचार बरोबरीनें चालू द्या.

**सुरेंद्र**—शिवाय, आणखी घटना कोणती पाहिजे ? जें कार्य सरकारला करण्याची इच्छा नाहीं तें देखील कार्य आम्ही करणार का तुम्हाला अध्यक्ष उपाध्यक्ष चिटणीस खजिनदार कोण हें पाहिजे ? अथवा तुम्हाला अगोदर द्रव्यनिधि दिले पाहिजेत ? का तुम्हाला विचार करकरून मेंदु यकण्याइतकी खूप नियमोपनियमाची जत्री पाहिजे ? एक प्रथम सांगा कार्य करायचें आहे का ? करायचें असेल तर तुम्ही आम्ही बसून घटना करू या घटनेनेच कार्य करून व तें प्रसिद्ध करून, हातांशीं येईल तेवढा द्रव्यनिधी बळकावयाचा असेल—

**कांहीं समासद**—शेम ! शेम टु यू !

**सुरेंद्र**—शेम कोणाला ? कार्यारंभ करून कार्य न करण्याला कार्य दाखवा, टाळ्या घ्या नुसतें शेम शेम करून ओरडण्याऱ्याचीच मान शेम बाहेर पडते, असो असा जुनापुराणा व्यवहार आता नको

**एक वृद्ध तपस्वी**—आपण कार्य करण्याच्या उद्देशानेंच घटना करूंया त्याप्रमाणें निवडक मंडळींची एक कमेटी नेमली तिचें कार्य योग्य वेळीं सांगण्यात येईलच, पण नाशिकच्या वरील बैठकींत एक स्वराज्यपक्षीय सभासद कुजबुजला, " गांधी महात्मा खरे ! पण सैतान कीं साधु ? "

पुस्तक दुसरें

# सैतान !

भाग ८ वा

## सख्याहरिला बाप मिळाला !

"–पतित, दुराचारी, दांभिक कोठेंही आढळला कीं, त्याला ठोकायला तुकोबांनी कमी केलें नाहीं. ब्राह्मणांतही जे दुराचार, लबाडया, ढोंगें; दुष्टपणाचे प्रकार त्यांना आढळले त्यावरही त्यांनीं यथान्याय कोरडे ओढले आहेत; व त्यांबद्दल कोणाही सद्ब्राह्मणाला बिल्कुल विषाद वाटत नाहीं; व वाटेल तर तो ब्राह्मणच नव्हे." तुकारामचरित्र.

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर

§ १ रा. ब दादासाहेब क्षेमकल्याणांना, पर्वतविरच्या एका बाकावर तें विचार करीत बसले असताना, आपण सोडलें होतें. पण आता त्याना शोधावयाचें तर ते पुण्यातसुद्धा सापडणार नाहींत; घरीं सुरतेला तर मुळींच सापडणार नाहींत कारण एकतर त्याना जणों नवतारुण्यच लाभल्यासारखें होऊन, ते अस्पृश्योद्धारासारखें पवित्र सामाजिक कार्य, व नेहरू रिपोर्टासारखें पवित्रतम राष्ट्रकार्य करण्याकडे तनुमनें — धनें नव्हे — लागले होते. पुण्याचा सख्याहरचा प्रसंग ते आता आजिवात विसरून गेले होते अस्पृश्याचा उद्धार कसा करता येईल याविषयीं त्यानीं चर्चा, व्याख्यानें व सरकारी अधिकाऱ्याच्या भेटी यासारख्या मार्गाचा अवलंब केला होता. त्यामुळें त्याना सुरतेला फारसें रहाताही येईना. शिवाय आता त्यांचें म्हातारपणींच वायकोशीं पटेना. आपलीं पत्नी गांधींच्या गोटात दोघा मुलींना व एका सुनेला घेऊन शिरली व आपणास तिनें मनानें तरी सोडलें अशीं त्याची आदी होती. वास्तविक राधाबाई, गांधीआश्रमातून परत आल्यापासून घरींच, सुरतेला येऊन राहिल्या होत्या मणिलालाही मुलासह — म्हणजे छोट्या मुग्यासह ( मृगेंद्राचें ल्हानगें रूप ) — त्यानीं घरीं आणून ठेविलें होतें. जी सून साठ हजाराचा ऐवज व चाळीस हजाराची शेती आपल्या घरीं आणणार होती, ती आपणास एका शब्दानेंही न विचारिता, तरी हिंदूधर्मशास्त्रानें सर्व प्रकारच्या हक्कानें एक पैसुद्धा न आणता, आली, हा अपमान दादासाहेबाना सहन झाला नाहीं. सामाजिक गहन प्रश्नाचा कीस काढणाऱ्या सभातून " हुंड्या " विरुद्ध, " मानपामा " विरुद्ध, नव्हें नव्हें, " फ्लिव्ह तर्फे, " फ्रांसीच " तर्फे, " फ्रीअेक्यान् " तर्फे, सुंदर सुंदर, मिठास व्याख्यानें गेल्या चाळीस वर्षभर त्यानीं दिलीं असतील, आपणास आपल्या मताप्रमाणें हातून प्रत्यक्ष कृति करण्याची संधीच येत नाहीं—निदान " फ्लिव्ह " ची एकच का अनेक संस्था त्याना मिळाल्या होत्या, पण त्यावेळीं बहुतकरून याची तयारी असली तरी " अदर ( मदर ) पार्टी " ची तयारी नसेल कदाचित्,— म्हणून ते हळहळत असतील, रानडे, गोखले वगैरे सारख्या समाजसुधारकाना संधि आली असतानाही, त्यानी तिचा उपयोग करून घेतला नाहीं म्हणून दादासाहेबानीं त्याचा, " बोलके सुधारक, " या व अशा बोलक्या शब्दानीं निषेध केला असेल, पण त्यावेळीं, पोटच्या गोळ्यानीं आपल्या वडिलाचा अप-

मान करावा, ' वात्रट ' मुलींनीं आपल्या सुरेंद्रबाबूसारख्या अनभिज्ञ मुलांना, आपल्या ' नाजूक जाळ्यांत ' पकडावें; आपल्या राधाबाईसारख्या पोक्त पतिव्रतेनें विरुद्ध राजकीय पक्षाला जाऊन मिळावें; आणि तरीही आपण तें सगळें मुकाट्यानें सहन करावें; असें थोडेंच दादासाहेब म्हणाले होते ? आईबापांची अक्षता न करतां, त्याच्या संमतीनें, ते करवतील त्या वधूबरोबर, चौकशी न करतां, स्वताची मतें अजून कच्चीं आहेत, असें समजून, मुलांना " मलिन्द " करण्यास, त्यांची कधीच ना नव्हती. इतक्या स्वातंत्र्यानंतर देखील जर मुलगे गूण उधळूं लागले, बायको फिरूं लागली, व सून घरांत घुसूं लागली, तर बिचारे दादासाहेब तरी काय करणार ? ते आपले राजकारणीं व समाजकार्यीं पुन्हां पडून, जरामी विसावा मिळण्याकरतां बाहेर पडतील, नाहीं तर काय करतील ?

अशाच एका विरंगुळ्याच्या सभेकरतां ते मुंबईस आज खटपट करीत होते; पुण्याच्या पर्वतीवर अस्पृश्यांना मंदिरप्रवेश कसा मिळेल, व अस्पृश्यांकरतांच केवळ, भावीं स्वराज्यांत, कोणते राजकीय हक्क राखून ठेवतां येतील यांविषयीं, लोकमत जागृत करण्याकरतां त्यांनीं सर्व अस्पृश्योद्धारकांची व अस्पृश्यांचीही एक जाहीर सभा बोलाविली होती.

सभेला ठिकठिकाणचे समाजसुधारक, अस्पृश्यांचे पुढारी व कांही राजकीय पुढारीही आले होते; अस्पृश्य श्रोते पांचहजारांवर हजर असतील. सभा मोकळ्या मैदानावर होती. दादासाहेबांची पश्चात्तापोली नांगरलेली होती. आज तेथे मुख्य वक्ते होते. त्यांनीं अजून आपला किताब टाकून दिला नसला तरी मराठ्यांचे जहाल आणि जहाल सुधारक अशी त्यांची ख्याति असल्या कारणानें, त्यांच्याबद्दल मुंबईत पुष्कळांना आदर वाटत असे. ते गुजराथी नसते, व महाराष्ट्रीय असते तर त्यांना कौंसिल इलेक्शनमध्ये दोनदा अपयश आलें, तें कदाचित आलें नसतें. नेहरू रिपोर्ट तयार करतांना जरी त्यांना विशेष मदत करण्याची संधी मिळाली नाहली तरी, तदनंतर तिला कॉंग्रेसची मान्यता मिळण्यापूर्वी त्यासंबंधानें बाबतीत त्यांनीं, टीका करून, मायनॉरिटीजचे हक्क प्रस्थापित करण्याच्या कामाच्या बाबतीत त्यांनीं, त्याप्रमाणें, पुष्कळच कामगिरी केली होती. त्यामुळे सामान्य हिंदुस्थानच्या त्यांच्या कीर्तिला थोडासा कलंकित आला असा; परंतु अस्पृश्य आणि मुसलमान त्यांच्या सारखे अल्पसंख्यांक समाज दृष्टीनें ते जास्त मान्यता पावले होते. हिंदु

साम्राज्यांत डोमिनियन स्टेटसच्या ते विरुद्ध नव्हतेच; आणि नेहरू रिपोर्टाला लोकमताचा पाठिंबा मिळवण्याकरतां जहाल–मवाळ स्वराज्यपक्षवाले वगैरे सर्व पक्षाचे पुढारी एकमतानें ठिकठिकाणीं व्याख्यानें देत होते. त्यामुळें तूर्त तरी राजकीय मतभेदाची तीव्र धार नव्हती; म्हणून दादासाहेबाना, "पब्लिक प्लॅटफॉर्म" वर आपलें तेज पाडण्यास पूर्ण वाव होती; असो.

रीतसर सभेला सुरवात झाली. दादासाहेब बोलूं लागले;

आज माझें व्याख्यान "पोलिटिकल सोशल" स्वरूपाचें होणार आहे.—

"आज आरंभींच त्याना अडविण्यात आलें, व तेहि एका चांगल्याच समाजसुधारकाकडून. तो पुण्याचा अट्टल अस्पृश्योद्धारक होता. तो म्हणाला, "कृपा करून आजच्या व्याख्यानातून आपण राजकारण वगळाल काय ?" आज नेहरू रिपोर्टासंबंधीं सर्व राष्ट्राची एकवाक्यता आहे. तेव्हा आपण त्यात फाटे फोडूं नये.

"मी फाटे फोडीत नाहीं." दादासाहेब म्हणाले, "पण राष्ट्राचा जर एक सूर पाहिजे असेल तर अल्पसंख्याकावर जुलूम होता कामा नये. मायनॉरिटी-जचे हक्क राखले जातील, इकडे पाश्चात्यांचेंसुद्धा अलीकडे अधिक लक्ष वेधलें आहे. राजनीतितल्या त्या गहन प्रश्नाचें जर आपणच सर्वांच्या आधीं उत्तर दिलें, तर हिंदूंच्या बुद्धिमत्तेची साक्ष अखिल जगाला पटणार आहे. आपण प्रत्येक बाबतींत पाश्चात्यांचें अंधानुकरण करतों असा आपणावर कायमचा आरोप आहे; तो दूर करण्याची आपणास ही एक उत्कृष्ट संधी मिळाली आहे. हीच एक संधी आप-णाला आज प्राप्त झाली आहे; असें नाहीं परंतु आपण जर मला अडविणार नाहीं तर, मी आजच्या प्रसंगीं आपल्या राष्ट्राची सर्वांगीण उन्नति कशी होईल, याविषयीं माझे अनुभवाचे विचार सांगेन. माझें भाषण संपल्यावर प्लॅटफॉर्म सर्वां-नाच मोकळा आहे, व त्याचा अशा आणीबाणीच्या प्रसंगीं कोणीहि दुरुपयोग करणार नाहीं, अशी मला पूर्ण खात्री आहे. आज आपलें राष्ट्र एकप्रकारच्या राज्यक्रान्तीच्या तापानें बेजार झालेलें आहे. या तापानें नंतर ग्लानी येऊं नये, अशी आपण आजपासूनच नीट काळजी घेतली पाहिजे. जें राष्ट्रक्रांतीची आग शांततेनें पचविते, त्या राष्ट्रालाच त्या आगीचा उपयोग होतो. नाहीं तर क्रांतीची

फळें भोगावीं एराने व तिचे फायदे मिळावे भलत्यानाच अशी स्थिति होईल. आजकालची क्रान्तीची स्थिति वाहां आम्ही उत्पन्न केलेली नाहीं. ते युरोपियन महायुद्धाचे परिणाम आहेत. आम्ही ब्रिटिश सरकारास त्याच्या अपेक्षेपेक्षाही जास्त मदत केली आहे व त्यानीं आम्हाला स्वराज्याचे अधिकाधिक हवन देण्याचीं वचनें देऊन, त्याप्रमाणें १९१९ सालीं "पाहिला हप्ता" आम्हाला मिळाला आहे. आता १९३० सालीं " दुसऱ्या हप्त्या"चे दिवस आले आहेत तेवढ्याकरतां " सायमन् कमिशन् " येथें आले आहे. त्या कमिशनमध्यें आपले प्रतिनिधि असावयाला पाहिजे होते, हें अगदीं खरें आहे. पण कमिशनमध्यें नाहीं तरी त्याला मदत करणाऱ्याची एक " बॉडी " तयार करून तींत आपले लोकच आहेत. त्यात डॉ. आम्बेडकर आहेत हें उत्तम झालें. आमचे अस्पृश्य लोक म्हणजे माझ्या मतें आमचा "रिव्हाईज फोर्स" आहे. पंडित जमिनीसारखा तो समाज आहे. यापुढें त्यातूनच अलौकिक माणसें निघतील अशी अपेक्षा आहे. त्या समाजाला ' पंडित " का ठेविलें, कोणी ठेविलें, कसें ठेविले " पंडित " का केलें नाहीं वगैरे प्रश्न आता सर्वांनीं विसरून जाण्यातच शोभा आहे. शब्दानें शब्द वाढतो. " अस्पृश्यता हा हिंदुधर्माला एक कायमचा डाग आहे " वगैरे वाक्प्रचार भाषेला कधींही खुलवणार नाहींत. ज्या प्रश्नाची सर्व बाजूंनीं वाटतील तितकीं सालें सोडलही हातीं काहींच फळ लागत नाहीं, त्यांची चर्चा करून बुद्धीला व्यर्थ हिणवण्यांत भूषण नाहीं—

Hear Hear ! एक हत्तीसारखा चीत्कार ऐकू आला. सर्वांचें लक्ष तिकडे वेधलें. जिकडून तो आवाज आला तिकडे प्रेक्षकात थोडासा हंशा झाला, दादासाहेबाना एकदम पर्वतांवरच्या प्रसंगाची आठवण झाली, व क्षणभर ते गोंधळले. परंतु त्याना आता प्रसगावधान राखणें भाग होतें; आणि तेही त्यात चांगलेच निष्णात होते. ते हंसून म्हणाले,

" मला आज हत्तीसारख्या जनावरेंसुद्धा मान्यता देतात ही आनंदाची गोष्ट आहे. हत्ती हें जनावर अत्यंत शहाणें असतें असा त्याचा लौकिक आहे. तेव्हां आपणही तसाच शहाणपणा दाखवावा. आपल्या अस्पृश्यबंधुविषयीं आपणांत इतकें प्रेम व इतका आदर वाटला पाहिजे कीं, अस्पृश्यता हा शब्द देखील

जुन्या शब्दकोशातच अडकून राहिला नाहीं. नेपोलियन म्हणत असे कीं, माझ्या कोशांत " अशक्य " हा शब्दच नाहीं. नेपोलियन खोटें बोलला. त्यानें आपणास इतरानीं जिंकणें " अशक्य " केलें होतें. सबब त्याच्या कागदी कोशात कशाला, हृदयकोशातसुद्धा " अशक्य " हाच मोठ्या अक्षरात शब्द होता. तद्वतच " अस्पृश्यता आम्हा हिंदूंत सापडणें यापुढें अशक्य आहे, सर्वथैव अशक्य आहे, असा " अशक्य " शब्दाचा आम्ही, वेदऋचेप्रमाणें त्रिवार जयघोष केला पाहिजे !—"

" Bravo दादासाहेब ! Simply grand हरकत घेणाऱ्या त्या पुण्याच्याच अस्पृश्योद्धाऱ्यानें उठून व हात वर करुन दादासाहेबाचा जयजयकार केला, दादासाहेबाची ती " अशक्य " शद्वाची कल्पना खरोखरच मार्मिक होती ती श्रोत्याना फार आवडली सर्वांनीं पुन्हा पुन्हा टाळ्या वाजवून मैदान दुमदुमवून दिलें. दादासाहेबानाही आनद वाटला श्रोते जरा शात झाल्यावर त्यानीं भाषण चालूं केलें ते म्हणाले, या तुमच्या उत्साहानें सुद्धा माझी म्हताऱ्याची देखील कळी आशेच्या वाऱ्यामुळें आनदाने खुलली आहे आज असें सागण्यात येतें कीं, " अस्पृश्यता " हिंदुसमाजात राहिलीच नाहीं. असें सागण्याची प्रवृत्ति होते, ही गोष्टसुद्धा समाधानकारकच आहे, पण या मनप्रवृत्तीला आता आचारात जास्त जास्त आणलें पाहिजे सहभोजनाचा अजून इनकार होत आहे. नाशिकास जनुभाऊ अभ्यंकरासारखा सालस मनुष्य, आईच्या काकुळतीनें, पण भिक्षुकाच्याच धर्मरक्षणाच्या काळजीमुळें, सहभोजनाप्रीत्यर्थ प्रायश्चित घेतो, ही गोष्ट कशी विसरता येईल ? मी त्या प्रायाश्चित्ताबद्दल जनुभाऊना, त्याच्या आईला अथवा भिक्षुकाना सुद्धा दोष देत नाहीं, कधींही देणार नाहीं. दोष असलाच तर तो आम्हा हिंदूंच्या, जगातील विचारप्रवाहाविषयींच्या अज्ञानाचाच होय ! भिक्षुकानीं व आचार्यांनीं धर्म रक्षण करूं नये तर कोणी करावें ? भिक्षुकाची संस्थाच जर आजच्या सुधारलेल्या पाश्चात्य जगातसुद्धा आहे, आणि तिचें कार्य, तिकडे जर धर्मप्रसाराचेंही आहे, तर इकडेही भिक्षुक आहेत ही काय चूक आहे ? बरें हिंदुधर्माचें रक्षण करतात हीं काय त्याची कोती समजूत आहे ? मी तसे आरोप त्याच्यावर कधींही करणार नाहीं. तशी धर्मविषयक कोती समजूत शोधावयाचीच असेल तर मी तें स्थान नक्की दाखवूं शकेन.

तें स्थान मिशनऱ्यालच सापडतें धर्माचा प्रसार करणें हेच कोतो समजूत आहे. धर्म हा भावनाचा श्रद्धेतला मिलाफ होय. म्हणून अन्य धर्मीयांना बाटवून आपला धर्म वाढतो ही अत्यंत कोता समजूत होय. आमचे लोक जेव्हा बाटतात तेव्हा मला कांहींही वाटत नाहीं. मला बाटण्याचा राग येत नाहीं, आणि आमचा धर्म खालावला असेंही वाटत नाहीं. कारण खाण्यापिण्याला, शिक्षण्या-सवरण्याला, औषधपाण्याला पाद्री लोक आपणास मदत करतील अशा आर्थिक दृष्टीनें बाटणें बाटतात; व पुढें पस्तावतात. नाशिक व नगर येथल्या खिस्त्यांची सहजासहजीं निघालेलीं उद्गारवचनें भरपूर ऐकावयास मिळतात म्हणून उद्यां जर अस्पृश्यांनीं धर्मांतराचा धाक दाखविला तर त्यांत हिंदुधर्माचें मुळींसुद्धां नुकसान होणार नाहीं, हें त्यांनीं लक्षांत ठेवावें. पण नुकसान होईल, तें राष्ट्राचें मात्र पुष्कळच होईल बंधूनो ! मी स्पष्ट बोलण्यामुळें पराच अप्रिय होतो हें मला माहीत आहे, पण त्याला उपाय नाहीं माझें नुकसान झालें तरी राष्ट्राचें माझ्या स्पष्टोक्तिमुळें हित होतें, म्हणून मी मला अनुभवाला येतें तें बोलून टाकतों. माझा ' रुसो ' च्या एका सिद्धांतावर फार विश्वास आहे. त्यानें " सोशल कॅान्ट्रॅक्ट " नामक पुस्तकांत असा एक सिद्धांत दिला आहे कीं " राष्ट्राची खरी शक्ति खरी संपत्ति, " त्यातील लोकसंख्येचीच आहे. " मला तें सर्वस्वी मान्य आहे. राष्ट्र कितीहि सुधारो, त्यात जर मूठभरच लोक असतील तर तें राष्ट्र ठरावीक मर्यादेपलीकडे सुधारणार तर नाहींच, पण ती मर्यादा गाठताच सडेल, पडेल, मरेल. मी म्हणतों राहो सुधारणा एका बाजूला, प्रत्यक्ष समरांगणींचे अखेरचे विजयदेखील शेवटीं " Man power " वरच अवलंबून आहेत असें नुकत्याच संपलेल्या महायुद्धानें देखील सांगितलें आहे कीं आम्हां हिंदूंची " मार्ने"च्या लढाईत राखरांगोळी उडविली गेली म्हणूनच दोस्तराष्ट्रांना, त्या रात्रीतल्या विजयाच्या द्राक्षांचा आज आस्वाद घेता येत आहे

टाळ्याचा नुसता गडगडाट झाला ! त्याचरच दादासाहेबांचें आजचें भाषण केवळ दैविक होतें. तो गडगडाट होतांच त्यांनाही एका नव्या कल्पनेची विद्युल्लता चमकून देण्याची स्फूर्ति आली. ते म्हणाले, " म्हणूनच मी जेव्हां सांगतों कीं, Man power येथें political power हा अर्थ, तेव्हां एका सिद्धांताचाच मी उच्चार करतों. Politically all powerful

असें आमचें हिंदुस्थानसरकार सुद्धा, मार्नच्या लढाईंतल्या Man power शीं कृतघ्न होऊं शकणारच नाहीं. त्याच्या आयाबहिणींची लाज राखणाऱ्या आमच्या मार्नच्या सैनिकाविरुद्ध त्याना स्वप्राणरक्षणसुद्धा करणें केवळ अशक्य आहे; आणि म्हणूनच त्यानीं त्याचीं ठिकठिकाणीं स्मारकें उभारलीं आहेत. तें मृत जीवात्मे आज, बंधूनो, घटकेंत इग्लंडकडे पाहतात, घटकेंत आपणाकडे पाहतात. आम्ही त्याच्या हाडापिंडाचे म्हणून ते प्रेमानें आमच्याकडे पहातात, व म्हणतात कीं, बंधूंनो ! आम्ही आमचें कार्य केलें, आता तरी तुम्ही स्वराज्याचीं फळें भोगा. त्याना वाटतें कीं, आम्ही स्वराज्य मागितलें, व तें आम्हाला ब्रिटिश पार्लमेंटनें दिलें, पण आमच्या तोंडावर त्याना काय दिसतें ? निराशा ! निराशा !! निराशा !!! " अरे का ? ही निराशा काय म्हणून ? आम्ही व्यर्थच मेलों कीं काय ? आमचें रक्त उगाच वाहिलें कीं काय ? आमच्या हाडाचा नाहक चुराडा झाला कीं काय ? " अशी त्या मृत जीवात्म्यांची, त्या दगडाच्या विजयस्तंभात सुद्धा तगमग चालते."

प्रेक्षनामध्यें इतकी भयंकर शातता पसरली होती कीं, प्रत्येकाला वाटे कीं, आपल्याच हृदयात ते मृताचे शब्द उमटतात दादासाहेबानीं आज कमालीची बहार केली. ते पुढें शब्दन् शब्द मोकळा करून म्हणाले, " त्या मृत जीवात्म्याची दृष्टि जेव्हा ब्रिटनकडे वळते तेव्हा त्याना त्याच्या वदनावर तर आनंद व भीति हे दोन्ही प्रकार दिसतात त्याना विजयाचा आनंद होतो खरा, पण साम्राज्य कसें टिकेल याची भीति पण वाटते साम्राज्याचा कोहिनूर हिंदुस्थानचाच आहे हें खोटें म्हणणारा वेडाच ठरेल. आणि त्याच हिंदुस्थानात आपणाविषयीं तर राहोच, पण परस्पराविषयींही अविश्वास, दुरभिमान, स्वार्थसाधूपणा, व निरर्थक आत्मता दिसून येतें. बंधूंनो ! ब्रिटिशाना काय दिसतें हें जरी आपण घटकाभर विसरलें व आपलें आपणच हृदय पारखलें तर, त्यात काय बंधुप्रेम, नि स्वार्थ, व राष्ट्राभिमान दिसतो का ? अस्पृश्याविषयीं बंधुप्रेम आपण कशात दाखवितों ? त्याना राजकीय हक्क नाहीं, सामाजिक हक्क नाहीं, धार्मिक हक्क तर मुळींच नाहीत. आमचा व त्याचा देव एकच असून, त्या देवाच्या देवळांत जाऊन, ईश्वरचरणीं मस्तक ठेवण्यासुद्धा त्याना प्रतिबंध त्यानीं जीव फोडून टाहो फोडला तरी त्यांत आपणाला सरकारी राजकारण दिसतें. म्हणजे बंधुप्रेमाच्या अभावाबरोबर

अविश्वास आला. मी म्हणतों राहों तें प्रेम एका बाजूला. कारण प्रेम का म्हणून काहीं प्रेम उत्पन्न होत नाहीं. सख्खे भाऊसुद्धां परस्परांस मारतात. त्याच-प्रमाणें गैरविश्वासही मला समजतो. जर प्रेमच नाहीं तर विश्वास तरी कसा रहाणार ? पण त्याचा विश्वास आपणावर बसणार नाहीं, अशी त्याना जागा तरी का ठेवतां ? याला उत्तर तुमचें एक ठरलेलें आहे, व तेंच उत्तर कोणत्याही प्रश्नाच्या शेवटीं रामबाण म्हणून देण्यात येतें. तें असें कीं त्याला कारण हें परकी सरकार ! मीही पण तें उत्तर कबूल करतों; व मग विचारतों कीं, तुमचें प्रेम नाहीं, तुमचा विश्वास नाहीं, याला कारण हें ब्रिटिश सरकार, हें जर अस्पृश्यांना पटत नसलें तर तें अर्थातच ब्रिटिश सरकारची मदत मागणार ! म्हणजे मनानें ते ब्रिटिशाचे दोस्त झाले. यापेक्षा आणखी आमची हानि दुसरी कोणती ! अस्पृश्य ख्रिश्चन होऊनही दु:ख न पावणाऱ्या मला ते मनानेंही ब्रिटिशांना मिळाले तर Man power कमी झाली म्हणून खरेंखुरें दु:ख होणार यांत शंकाच नको ! अशाच स्थितींत जर काँग्रेसनें कार्य केलें, किंवा आम्ही शतकोटी जपसत्रें चालविलींत तरी तीं फुकट आहेत. "मार्नच्या लढाईंत मेलेल्यांचे जीवात्मे स्पृश्याप्रमाणें अस्पृश्याचेही आहेत हें तरी मी चुकून विसरणार नाहीं. माझ्या पूर्वजांची अस्पृश्यतेविषयींचीं कृत्यें पापाचीं कीं, पुण्याचीं हें मी मुळींच पाहणा नाहीं; पण माझीं कृत्यें मात्र त्यांच्याविषयीं सर्वस्वीं पुण्याचींच होतील अशी मी खबरदारी घेत आलों आहें, व घेत राहीन. महाराष्ट्रांत निदान एका चेहेऱ्या-वर तरी त्या महात्म्याना संपूर्ण विश्वास, अभंगप्रेम निरलस आजन्म सेवा—

" खोटी गोष्ट ! धादांत असत्य ! ! सगळी लबाडी ! ! ! "

अशा आरोळ्या ठोकित एक महारीण गर्दीतून रस्ता कांरीत व्यासपीठाकडे धाव ठोकीत असताना सर्वांनीं पाहिलीं. त्या बाईचा वेगच असा होता कीं, तिला ' नको जाऊं " म्हणण्याचें कोणालाही सुचेना. सर्वांनीं तिला रस्ता मोकळा करून दिला. त्या दिवसाच्या त्या "हीरो"वर काहींतरी अरक्षित पाला ही बाई घालणार व आपणास आतां मौज बघण्यास सांपडणार, अशी प्रत्येकाला उत्सुकता उत्पन्न झाली. "तिला जाऊं द्या" असाच प्रत्येकाचा रुकार मिळाला. ती बाई दोनच मिनिटांत व्यासपीठाकडे गेली. प्रथम दादासाहेबांनीं तिला ओळखिलें नाहीं. पण ती जशी बरीच जवळ आली, तशी तिची ओळख पटून ते मनांत तरी

खचीत चरकले. ते जर आजच्या विजयी वक्तृत्वाच्या भरात नसते तर पूर्वीप्रमाणेंच, म्ह. गांधी–आश्रमातल्या प्रसंगाप्रमाणेंच ते, काळ्या मातीच्या ढेकळाप्रमाणें विरघळले असते. परंतु आज ते तर वक्तृत्वाच्या उबेनें बरेच गरमही झाले होते; आणि तसे ते प्रसंगावधानीही होते. भागींचा प्रसंग आज कांहीं त्यांना नवा नव्हता. आपल्या चरित्र्याची डायरी त्याची त्याच्याजवळ जय्यत होती, व राष्ट्राराष्ट्राच्या इतिहासाची बारिकसारिक विचिकित्सा करणारा तो इतिहासभक्त स्वत च्या इतिहासाची परीक्षा घेत नसेल असें कसें होईल. आपला स्वत.चा इतिहास, आपल्या कुटुंबाचा इतिहास आणि राष्ट्राचा इतिहास यांत प्रत्येक जाणत्या माणसाला लपवावें काय, व चमकवावें काय हें बरोबर कळतें, फक्त त्याच्या हातात परिस्थितीच्या सगळ्याच नाड्या परमेश्वरानें दिलेल्या नसतात. त्याला कल्पनाही नसते असे कांहीं प्रसंग अकल्पितरीतीनें व भलत्याच ठिकाणीं उत्पन्न होतात, आणि मग त्याची पाचावर धारण बसते. परमेश्वरानें प्रत्येक जीवाला एक सांगून ठेविलें असतें कीं, ' प्राण्या ! तूं अंतर्मुख हो. तेथ तुला कोणीही कधींही अडवणार नाहीं, अशी मी ग्वाही देतों. तुझ्या सामाजिक, राजकीय, धार्मिक वगैरे सगळ्या चळवळी ज्यावेळीं विश्वोत्कर्षाला पोषक अशा रूपानें नटतील त्याचवेळीं त्या यशस्वी होतील, ही खूणगाठ मार पण तूं बहिर्मुख होऊन I am the monarch of all I survey अशी फुशारकी मारून उन्मत्त बनशील तर तुझ्यावर Bolt from the Brue पडल्याशिवाय रहाणार नाहीं ! ' असा परमेश्वराशीं करारमदार करून प्रत्येक प्राणी जरी जन्माला येतो, तरी तो नेहमीं बहिर्मुखच असतो आणि बाहेरची सृष्टि त्याला इतकी लोभनीय वाटते कीं, तिच्यापेक्षा अनंतपटींनीं अंत:सृष्टि असते हें तो विसरतो, व मग जसजशी त्याला बहिर्सृष्टीची जास्त जास्त चटक लागते. तसतसा तो उन्मत्त होतो ! तरी सुद्धा परमेश्वर त्याला आपल्या करारमदाराची आठवण करून देण्याकरता आकाशांतून, त्याजवर एकदम अशनिपात न करता, अगोदर नुसत्या विद्युल्लताच चमकावितो. पण त्यानाही तो हिरण्यकश्यपु तारायंतात अडकवून " संदेशहारिका " दासी करतो, व त्या पराक्रमाची प्रौढी मारितो, तरीदेखील परमेश्वर हंसून म्हणतो कीं, " करं दे वेड्याला मजा ! त्यानें माझ्या शक्तीचा एक कण आपल्या कामाला लाविला म्हणून माझे प्रचंड

यत्न काहीं मोडत नाहीं; " व मग त्याला हृदयातच करारमदाराची आठवण त्याच्या जिव्हाळ्याच्या माणसाकडून देववतो. आणि मग मात्र त्या माणसाचें सारें गाडें थांबतें! त्यालाही न जुमानणारा अवधूत एखादाच पण तो कदाचित् दत्तदिगंबर, महंमद पैगंबर, अथवा पक्का बिलंदर असतो. दादासाहेब त्यांपैकीं काहींच नव्हते. ते हृदयाच्या नाड्यांनींच बहुधा वठणीवर येत. तरी आज एक त्याच्या हृदयाची कळ परमेश्वरानें दाबली, व भागीला साबरमती-आश्रमांतून मुंबईच्या त्या विशिष्ट सभेला पाठवून दिलें. तिला भर व्याख्यानांत, अगदीं प्रसंग घातच करण्याच्या वेळेला प्रकट झालेली पाहून, क्षणभर तरी दादासाहेबांना चक्कर आली, व ते टेबलावर जरासे रेलले! तथापि त्यांना त्यानंतर लवकरच अवसान चढलें, भागी व्यासपीठावर चढताच ते तिला प्रेमानें कुरवाळून म्हणाले, "बंधुभगिनींनो!" साक्षात् या एवढ्या मोठ्या असदार्नीत आजचा दिवस खरोखरच मी फार मोठ्या भाग्याचा समजतों. आता मी जें जें बोलेन तें तें तुम्ही सगळे, शद्रुनशद्ध, साक्षीदार या नात्यानें नीट ऐकून घ्या, अशी माझी आपणा सर्वांना प्रार्थना आहे. प्रथम मी आपणा सर्वांस सांगतों कीं, मी ब्राह्मण असलों तरी अत्यंत दुराचारी आहें! ही बाई एक महारीण आहे! हिचा व माझा संबंध अनेक वर्षांपासून असूनही मी इला मातीमोल समजलों, ही माझी कृति आजच्या माझ्या व्याख्यानाशीं, अगदीं विसंगत झाली हें मी अक्षरशः कबूल करतों. पण ती चूक मरणापूर्वी सुधारण्याची संधी मला आली याबद्दल मी परमेश्वराचे धन्यवाद गातों; व जाहीर करतों, कीं, या भागीची कबुली असेल तर मी इच्याशीं यास्क्षणीं विवाह लावून इला सहधार्मिणीचें पद देतों."

हें ऐकून सभेंत जरी दादासाहेबांच्या नावाचा एकच जयजयकार झाला तरी भागीला मात्र भोंवळ आल्यासारखें झालें. असा कांहीं प्रकार होईल, अशी तिला थोडीसुद्धा कल्पना नव्हती. ती भांबावून वेडी झाली असेंच प्रेक्षकांना दिसलें, कारण ती म्हणाली, " भलतेंच कांहीं तरी, मी महारीण, ब्राह्मणाला कसें बाटवूं ? " अस्पृश्याच्या भारलेल्या मनाची ही जिवंत साक्ष पाहून सगळे प्रेक्षक हळहळले, पण इतक्यांत तो हत्तीचा चीत्कार खूप मोठ्यानें ओरडला, " मुलगा परतरिल्याशिवाय महारीण बामणी ब्राह्मणी कशी होईल ? "

असें म्हणत म्हणत सख्याहरि—तो चीत्कारवाला सख्याहरि होता हें वाचकानीं केव्हाच ओळखिलें असेल—आपलें ढोलासारखें शरीर व मोरासारखें डोकें घेऊन, आईप्रमाणेंच प्रेक्षकांमधून गेला. पण त्याला आईपेक्षाही फारच थोडा वेळ व्यासपीठापर्यंत पोंचावयाला लागला. कारण तो फारच थोड्या जागेंतून जाऊं शके. तो जेव्हा टणक्न् उडी मारून टेबलावर चढला, व आपण या मिश्र विवाहाचे अस्सल वंशज आहोंत, असें आपल्या मिश्र आवाजात बोलूं लागला, तेव्हा सारी सभा हसून हसून बेजार झाली. तरी त्याची आईच जेव्हा त्याला कबूल करीना तेव्हा दादासाहेबानाही धीर आला; व त्यानीं त्या पोराची टर उडविण्यास आरंभ केला. इतक्यात सभेंतून " गांधी महाराज की जय ! " अशी एकच गर्जना उठली; व थोड्याच वेळात गांधी टेबलाजवळ येऊन म्हणाले, "दादासाहेब क्षेमकल्याणी यानीं आपल्या कृतकर्माचें योग्य प्रायश्चित्त घेऊन आज महत्मापद मिळविलें आहे. आता त्यानीं या आपल्या पोराला कबूल करून साधु या पदाला योग्य व्हावें अशी माझी त्याना सनम्र विनंति आहे. कारण हा मुलगा त्याच्यापासून भागीला, पुणें मुक्कामीं, भगवानजी गुजराथी याच्या मटनाच्या गल्लीच्या शेजारल्या झोपडींत १५ एप्रिल १९१९ रोजीं रात्रीं ११-५५ झाला आहे. याला साक्ष हीं लोकमान्य टिळकाचीं पत्रें. दादासाहेब, टिळक आपणांस वारंवार सांगत कीं ब्राह्मणानें कमालीचें मनोधैर्य दाखवावें. आपणा सर्व सुधारकावर त्याचा हा एवढाच आरोप होता कीं, तुम्ही फक्त बोलता, कृति करीत नाहीं, व चुकून घडलीच तर ती कबूल करीत नाहीं. वृत्तींत पाप असो वा नसो, तें छपवून ठेवण्यात पापाचें खरें बीज आहे. महात्मा ! तूं आज या मिश्रविवाहानें आम्हाला लाजविलेंस ! आता मुलाला पदरीं घे व साधू हो ! मग, तुला मुलगी झाली नव्हती तर हा मुलगा झाला होता. याला संभाळ. मृगेंद्र व सुरेंद्र याच्याप्रमाणेंच हा सखारामही हुषार आहे. याचें शरीर पंगु आहे याला त्याचा इलाज नाहीं; परंतु तो पंगु आहे म्हणून तुम्ही त्याचा जास्तच सांभाळ करा—

इतक्यांत राधाबाई तेथें आल्या होत्या त्या रडतच म्हणाल्या, " तुम्ही जर त्याचा सांभाळ करणार नाहीं तर मी करीन, पतीचीं पापें पतिव्रतेनें नाहीं तर कोणी भोगावीं ? ये सखाराम ये ! इकडे ये ! तुझी मी देखील आईच आहें अं !"

दादासाहेबांचें आसनच ढळलें; ते मोठ्यानें ओरडून म्हणाले, " गांधी ! तुम्ही महात्मा खरे ! पण सैतान का साधु ! "

पुस्तक दुसरें

# सैतान !

भाग ९ चा

## गुलाबला आई मिळाली !

" मांसाशनाविरुद्ध अण्णासाहेब पटवर्धन यांचें मत अत्यंत विरुद्ध होतें. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, मांसाशन हें विश्वकुटुंबत्वाच्या भावनेस स्वभावतांच इतकें विरुद्ध आहे कीं, त्याची आणि ब्रह्मविद्येची सांगड घालणें अशक्य आहे. पुराणांत वगैरे जी माहिती आहे ती शेंकडों वर्षांच्या इतिहासाचा आणि आध्यात्म, योग, तंत्र वगैरे शास्त्रांचा संकर आहे. ऋषींचें शरीर कणशः ब्रह्मशक्तियुत असतें. तो चतुर्वर्णातीत परमहंसकोटींतला असतो. पूर्वी अनुलोम विवाह होत असल्याकारणानें, ब्राह्मणांच्या अनुलोमसंगतीनें आपल्या मातृपक्षीय पितरांना मांसपिंड द्यावें लागत म्हणून पलपैतृक प्रचारांत आलें. अनुलोमविवाह निषिद्ध ठरतांच पलपैतृकही वर्ज झालें.

"--मांसाशनानें स्नायुरचना Muscular system कितीही सशक्त झाली; तरी मनुष्य Nervous system चाच असल्यानें व ती मांसाशनानें बिघडते व विहिताचारानेंच सुंदर अशी तयार होते; म्हणून जड वादानेंही मांसाशन त्याज्यच ठरतें. "--

श्री. अण्णासाहेब पटवर्धन यांचें चरित्र.

--अप्रबुद्ध

## गुलावला आई मिळाली !

§ १ महात्माजींना टिळकांचें तें, सख्याहरीच्या जन्माचें पत्र कसें मिळालें व लोकमान्यांना तरी ती बित्तंबातमी कशी मिळाली हें वाचकाप्रमाणें, आम्हालाहि कोडेंच राहिलें असतें. तथापि, मृगेंद्राच्या एका पत्रात, लोकमान्यांच्या त्या पत्राचा नुसता उल्लेखच आहे असें नाहीं पण तें पत्र आपणास कसें मिळालें, व आपण तें पाठवीत आहोंत असेंहि लिहिलें आहे, त्यावरून निदान महात्माजींना तें कसें मिळालें, या प्रश्नाचा उलगडा होतो पण लोकमान्यांना ती बातमी कोणी दिली, याविषयीं मात्र, ज्याना तो प्रश्न अत्यंत गहन वाटत असेल, त्यानीं पाहिजे असल्यास संशोधन करावें. पण आमची कल्पना मात्र अशी आहे कीं, लोकमान्यांना अनेक अनोळखी लोकसुद्धा अगदीं खरी बातमी, आपण होऊन सांगत होते मागीला सताला वाटत होतें कीं आपणाला मुलगीच झाली व वास्तविक झाला मुलगा व तोही अशा चिन्हाचा, तेव्हा त्या प्रकारात भाग असलेल्या कोणातरी माणसानें कोणाजवळ तरी, सगळी गोष्ट सांगितली असली पाहिजे, आणि ती त्यानें टिळकाजवळ इत्थंभूत सांगितली असावी. दादासाहेब बोलक्या सुधारकाचे वाभाडे काढणारे प्रत्यक्ष सुधारक, तेव्हा त्यांचीच कारवाई त्यांच्या गळ्यात घालावी, व सुधारणा छातीठोकपणानें बोलूनच होत नसतात, तर उजळ माथ्यानें करूनच होत असतात, हें आपलें माप खाजगी रीतीनें दादासाहेबांच्या पदरीं बांधावें म्हणून लोकमान्यांनीं त्यांना पत्र लिहिलें असावें, व तें पत्र मृगेंद्राला, इतक्या वर्षांनंतर मिळून तें त्यानें महात्माजींकडे पाठविलें असावें, अशी विचारसंगति आम्हाला सुचवितां येते. आतां प्रत्यक्ष वडिलांचें बिंग त्यांच्या शत्रूजवळ, (दादासाहेब महात्माजींना शत्रु समजत अशी मृगेंद्राची समजूत होती) देणें हें पितृद्रोहाचें कृत्य मृगेंद्रानें तरी कसें केलें हा प्रश्न आहे. परंतु त्याकरितां, आणि त्याच्या त्या स्वतंत्र कल्पनेचा, इतर युरोपियन राष्ट्रांतून कसा प्रसार झाला हें पाहण्याकरतांही आपणास त्याचीं पुढची पत्रेंदी वाचलीं पाहिजेत. हीं पत्रें महात्माजींना "मिठाच्या सत्याग्रहास" निघाल्यानंतर प्रवासात मिळालीं होतीं.

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

## पत्र चवथें

ग्लॅसगो, ता० ३ मार्च १९

कृ० सा० न० वि० वि०

या पत्रांत मला, युरोपियन आधुनिक संस्कृतीचें जें माहेरघर, अशा फ्रान्स-विषयीं लिहावयाचें आहे. पिरिनिज पर्वत ओलांडून जेव्हां, आम्ही प्रथम बोर्डो येथें उतरलों तेव्हांच मी गुलाबला म्हटलें कीं, " आतां आपण एका अति विलक्षण देशांत, त्याला मुळींच न मानवणारी कल्पना घेऊन आलों आहोंत; आतां आपणांस फार जपून वागलें पाहिजे; आणि जपून वागण्याचा उत्कृष्ट मार्ग म्हणजे स्पष्टवक्तेपणाची कमाल करावयाची. " पण महात्माजी ! हा स्पष्टवक्तेपणाचा मार्ग फक्त मला एकट्यालाच घ्यावयाचा होता; आणि तिला मात्र मी स्त्री-स्वातंत्र्याच्या, पॅरिसच्या लेडिजच्या भडकदार कल्पनापासून अलिप्त राहाण्यास मुद्दाम बजावलें होतें. मी पॅरिसला पुष्कळदा येऊन परीक्षेंत चांगलाच पास झालों होतों परंतु गुलाबची फ्रान्समधली ही पहिलीच सफर होती. प्रवासात असतांनाच मी तिला रूसोपासूनच्या फ्रान्सची थोडक्यात ओळख करून दिली होती. मी तिला सांगितलें कीं, " एकदम सर्वोत्कृष्ट आणि अत्यंत नीच असा हा देश आहे. येथें मला स्वतःला फार मोठमोठ्या ग्रंथकर्त्यांच्या व समरधुरंधरांच्या तेजस्वी कल्पनांनाही माझ्या कल्पनेच्या बाटलीत आणावयाचें आहे; पण मी तसें करता करतां, तुझ्याकडूनच कदाचित् त्या बाटलीचें घट्ट बूच फटकन् उडून, तो आग्यावेताळ पुनरपि बाहेर पडेल; व कदाचित् आपलाही नाश करील. " माझ्या या इशारतीमुळें ती घाबरली व फ्रान्स टाळण्याची तिनें मला विनंती केली. " मला जगांतली एकही प्रमुख कल्पना जिरल्याखेरीज ठेवावयाची नाहीं. पण तूं घाबरूं नकोस. मी जवळ असतांना घाबरण्याचें कारण काय ? असा मी तिला तजेला आणला; असो.

येथें बोर्डो, मार्सेली, लिऑन्स, स्ट्रॅस्बर्ग, ब्रेस्ट व पॅरिस इतक्या ठिकाणीं माझीं व्याख्यानें झालीं. पैकीं एका पॅरिसमध्यें माझीं दहा व्याख्यानें बारा दिवसांत झालीं आणि एका रोमॉरोलॉखेरीज एकाही माणसाला माझी कल्पना पटली नाहीं असें मला कबूल करणें भाग आहे. पण रोमॉरोलॉसारखा एकच साधु जरी मला मिळाला असला तरी मला यूरोप जिंकल्यासारखें वाटतें. कारण माझा

मुख्य कटाक्ष विचारक्रान्तीवरच आहे. ज्या कल्पनेचा जोर मोठा आणि जिची प्रवाहीपणाची ताकद मोठी, ती कल्पना काहा काल, प्रचंड दरींत सापडलेल्या वाणी नदीसारखी अज्ञानात अडकून राहिली तरी ती कालांतरानें त्या दरीचेंहि एक सुंदर सरोवर करून ज्ञानसूर्यप्रकाशात येऊन संथपणें वाहात वाहात, शांतता महासागरात मिळाल्याखेरीज राहणार नाहीं, अशी माझी व रोमॉरोलॉंचीही खात्री आहे. रोमॉरोलॉं हे स्वामी विवेकानंदाचे एक चहाते तर आहेतच, परंतु अमेरिकन लोकां-प्रमाणें ते केवळ नाविन्याच्या चमकीमुळें चमकून गेलेले गृहस्थ नाहींत, तर त्यांचा आचार, त्यांची नित्याची राहणीही त्याच सात्विकमार्गाची आहे. एक अगदीं साधी गोष्ट आपणास सांगतों मी एकदा त्यांना म्हटलें कीं, " मनुष्याचें अंतरंग प्रेमानें भरलेलें असलें तर तो मांस खाणारच नाहीं, व दारूही पिणार नाहीं, याचा उलट अर्थ असा नाहीं कीं, जे मांस खात नाहींत, व दारूला शिवन-सुद्धां नाहींत, ते प्रेमळच असतात. परतु स्वामी रामतीर्थांजवळ एका शिष्यानें, स्वामी विवेकानंदावर ते आक्षेप घेतले होते, तेव्हां समर्थांनीं जें म्हटलें कीं, " तुम्ही, स्वामीजींना पोटात काय घेतलें हें कशाला पहाता, त्यांच्या वदनानलें अमृत प्या म्हणजे झालें " तें रामतीर्थांचें उत्तर मार्मिक असलें, तरी प्रश्नाला सोडून आहे. विवेकानंदाच्या बोधामृताचा प्रश्नच उरत नाहीं, पण त्यांनीं मांस कां खाल्लें व दारू का घेतली ? हा प्रश्न आहे जर कंद-फळमुळांनीं क्षुधा भागून, आत्मिमान तेज पुंज कल्पनांची प्रखरताही पचविता येते, तर कोणत्या कां होईना देहाचा, शिजवलेला वा होईना, पण एक तुकडा विवेकानंदांनी कां खावा ! त्याचप्रमाणें दारूची निशा त्यांच्यावर मुळींच चढत नसेलही; पण जेथें स्वच्छ पाण्यानें उत्तर ध्रुवावरसुद्धा अपाय होत नाहीं इतकी योगबलाची गरमाई जठरा-ग्नींत व कंठस्थानांतही आहे, तेथें उत्तर ध्रुवाजवळील प्रदेशात दारूची जरूर असतेच असें मी तरी कबूल करणार नाहीं.

येथें मला रोमॉरोलॉं यांनीं अडवून म्हटलें कीं, " मी असें समजूं कां, कीं आपण आजपर्यंत कधींही दारू घेतली नाहीं, व मांसाशनही केलें नाहीं ? "

" पण मी त्यात कांहीं विशेष केलेंच नाहीं. दारू न घेणें व मांस न खाणें ही गोष्ट आम्हां महाराष्ट्रीय ब्राह्मणांना कांहीं विशेष मोठी गोष्ट नाहींच. युरोपांत असतांना ते पदार्थ न घेणें यांत मात्र विशेष आहे खरा; पण याचें कारण तुमची

ती निरर्थक संशय, व आमची ती कोती कल्पना. बर्नर्ड शॉ अस्सल ब्राह्मण आहेत. त्यांना मी प्राणायामाचें महत्त्व सांगणार आहे. पण तो प्राणायाम मलाच अजून येत नाहीं. ती बाजू माझी अगदीं कोरी राहून गेली आहे. आपण मला एका स्पष्ट बाणाची क्षमा कराल काय ? "

" कोणत्या ? "

" महाराष्ट्रांत व इतर प्रांतांतही कांहीं राजयोगी आहेत. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, विवेकानंदाच्या राजयोगाच्या भाषांतरावरून, त्यांना योगसाधनाची माहिती नव्हती असें दिसतें. प्राणायामादि योगसाधनाबद्दल त्यांचा व त्यांच्या गुरुजींचाही अत्यंत प्रेमादर होता. परंतु त्या दोघानाही त्याची पद्धतशीर माहिती नव्हती. "

" म्हणजे आपलें असें म्हणणें आहे का काय, कीं " रोमॉरोलॉनीं मला घाबरून विचारिलें कीं, " ते दोघे दांभिक होते ? "

" Nonsense ! " मीही उद्गारलों. " ते दांभिक कसें असतील ते दोघेही पूर्ण ज्ञानीच होते ! "

" मग त्यांना तें ज्ञान कसें प्राप्त झालें ?"

" परमहंसाना भक्तियोगानें व स्वामीजींना ज्ञानयोगानें. राजयोगात ते दोघेही शेवटपर्यंत अनभ्यस्त होते."

"क्षमा करा. आपला जर एखादी योगाचा अभ्यास नाहीं तर, तुम्ही त्या योगाबद्दल असें म्हणून, अशिक्षितांचा बुद्धिभेद करणार नाहीं काय ? आणि इथले लोक तुमचा फक्त बुद्धिभेदच लक्षात घेतील व बाकीचें सोडून देतील."

" महाशय ? " मी म्हटलें, " बुद्धिभेदाशिवाय बुद्धीची वाढच जर होत नाहीं, तर बुद्धिभेदाला डरावें कशाला ? ज्या विकल्पामुळें बुद्धीची वाढ खुंटते तो विकल्प करूं नये, आणि त्यालाच गीतेंत बुद्धिभेद म्हटलें आहे. भीमानें जरासंधाचा जो भेद केला तसा तो विकल्प असतो. परंतु सोवर्णांतली जमीन नांगरण्यापूर्वी जाळावी लागते, ती पुढील पिकावरताच; व तसा संकल्प असतो. बुद्धीचे संकल्प सामान्य नसतात. कारण बुद्धि ही ज्या मनाचा एक अंश आहे तें मनच संकल्पविकल्पाचें असतें; म्हणून बुद्धीनें सवल्प सुरू केले म्हणजे मनाच्या

इतर अंशातून विकल्पदेखील त्यात घुसतात. त्या विकल्पाना जो टाळतो, त्याच संकल्पही पुरे होत नाहींत. परंतु त्या संकल्पाग्नीनें जो त्या विकल्पाना जाळतो त्याच्या त्या संकल्पशेतीला त्या विकल्पाची राख उत्तम खत होते."

"पण ही शक्ति 'अज्ञाना कर्मसंगिना'मध्यें नसते."

" त्यांच्या ठायीं तत्त्वज्ञानाचीं पुस्तकें वाचण्याची अभिरुचि तरी असते काय ?" आमच्या महाराष्ट्रांत लोकमान्यांचें " गीतारहस्य " पन्नास हजार माणसाजवळ असेल, परंतु ज्यानीं तें पुस्तक काळजीनें अथपासून इतिपर्यंत वाचलें असेल असे पाचशें निघतील कीं नाहीं याची शंकाच आहे. "

" कबूल, पण आपल्या सारख्याच्या अशा बोलण्यानें, स्वामीजींचे ग्रंथ कोणीहि वाचणार नाहींत. "

" अनुभव उलट आहे. एकतर अगदींच नवशिके उगाच कुतूहल उत्पन्न होऊन वाचतात. त्याच्या जवळ पुस्तकें असतात, पण त्याची कुतूहल बुद्धीच गारठून गेलेली असते. ती या धक्क्यामुळें जागृत होते. नंतर एकदा वाचून टाकलेलें वाचक पुन्हा ताडून वाचण्याचा प्रयत्न करतात. हा असा माझा अनुभव आहे. पण आपण हा अनुभवसुद्धा खोटा आहे असें धरून चालूं या; व नंतर मी असें विचारतों कीं, जे डोळे नुसते पुस्तकावरून फिरतात, पण जें मन मात्र अन्यत्र बंधेलें असतें. आमच्या हिंदुस्थानात तें मन बहुतकरून जिरेंनच असतें. त्या डोळ्याना व त्या मनाला तुम्ही काय करतां, बुद्धिभेद करतां कीं बुद्धिविकास करता हें मुळींच दिसत नाहीं. ज्याना दिसतें, त्यांना हटून जास्त पढण्याचीच इच्छा होते, ज्याना दिसत नाहीं, त्याचें मन आवडत्या वस्तूंशींच संलग्न होऊंन्या ना ? तेव्हा बुद्धिभेदाचें भूत आम्हा हिंदूंना मुळींच तापदायक होत नाहीं. आतां प्रेंच लोक एवढेंच घेतील व बाकीचें सोडतील म्हणनां, तर जेवढें घेतील तेवढेंमुद्धा त्याच्या मानगुटीवर बसल्याखेरीज रहाणार नाहीं. आमच्या परमहंसांना व स्वामीजींना राजयोगात विजय मिळाला नव्हता असें त्यांना समजताच ज्यांना यापुढें तो मिळेल त्यांच्याबद्दल ते बचकून नाहींसा रहाणार. हें बघा रोलॉसाहेब ! व्यक्तींची मानख्री नाहीं. मातब्बरी तत्त्वाची आहे. शक्ति शरीरधारी नामनिर्दिष्टव्यक्तींत दिसते, पण ती तत्त्वांचीच असते. ज्या ब्रिटिश कायद्यांवर लोकमान्यांची शेटपर्यंत निष्ठा होती, तेच कायदे महात्माजींनीं मातीमोल करतेस्याचें कंकण बांधलें आहेना ! म्हणून काय लोकमान्यांचें

"पण अशानें कोणीच मरणार नाहीं"

"दुसऱ्याच्या छळानें मरणार नाहीं"

"आपण सजीवनीविद्येविषयीं येथें बोलता आहा काय ?"

"नाहीं ती विद्या मानवाना येऊ नये अशी परमेश्वराची इच्छा आहे."

"पण शुक्राचार्यांना येत होती"

"येताच त्याचा नाश झाला"

"तो नाश होऊ न देता ती विद्या आली तर ?"

"येणार नाहींच. कारण ती विद्या प्राप्त करण्याकरता जें योगबल लागतें, त्या सीमेपर्यंत जीवात्मा गेला म्हणजे त्याला शिळ्या कुडीपेक्षा नवें जीवनशास्त्रच आवडेल. शुक्राचार्यांचे तें असुर लोकांनलें योगसामर्थ्य होतें म्हणून ते प्रेताना जीव आणण्यात अडकून राहिले"

"पण नवें जीवनशास्त्र प्रत्येकाला माहीत असतें, त्याला योगबल नको"

"तशी गोष्ट असती तर आजचे दु खाचे दिवस आलेच नसते महारोग्यालाहि मुलें होतात, परतु तें, जीवनशास्त्राचें विडबनच होय, आणि हजारातून एखा द्याच्याच मुलाचा मन पिंड रोगविमुक्त असतो हा गोष्ट ध्यानात धरा जीवनशास्त्र म्हणजे फक्त शरीराचीच उत्पत्ति शरीरो त्पत्तीच्या शास्त्राला कामशास्त्र म्हणतात पण त्या शास्त्राचेंही ध्येय उत्कृष्ट मन पिंडाला उत्कृष्ट शरीर देण्याचेंच असतें शिवाय मी जीवशास्त्र शब्द वापरला नसून जीवनशास्त्र वापरला आहे जीवशास्त्र म्हणजे Biology जीवनशास्त्र तुम्हाला अजून माहीत नाहीं त्याला पाहिजे अस्ल्यास Lifalogy म्हणा, त्यात उत्कृष्ट विचार, उत्कृष्ट भावना, व उत्कृष्ट आचार याचें योग्य प्रमाण असतें व मग "राजयोग" हें त्या Lifalogy चें उत्कृष्ट साधन आहे"

"असे उत्कृष्ट योगी आता कोणी आहेत काय ?"

"ह्यातील मला बर्नर्ड शॉ व रोमॅरोलाँ दिसतात,—"

"पण मी मास खातों"

"आपण राजयोगी नव्हत"

"राजयोगी कोण आहेत ?"

" आहेत ? हिंदुस्थानात आहेत; पण," मी हळहळून म्हटलें, " ते या आमच्या जगाकडे पाहत नाहींत "

" का ? "

" कदाचित् अजून वेळ आली नसेल."

" आपण थिऑसफिस्ट आहात का ?"

" नाहीं. पण आपण मूळ मुद्यावरून फार घसरत चाललों नाहीं का ? माझें म्हणणें असें आहे कीं, कर्मप्रवीण जे योगी असतील त्यांच्या नियंत्रणाखालीं आज एक संस्कृतिसाम्राज्य चालावें. स्थलमर्यादा तर मुळींच नकोत—"

वगैरे माझी कल्पना मी त्यांना मग विशद करून सांगितली. ती त्यांनीं ऐकून घेतली; व मला विचारिलें,

" या तुमच्या कल्पनेप्रमाणें गांधींचा उपाय कसा आहे ? "

ती एक [illegible] योगाचीच पायरी असल्या कारणानें मला मान्य आहे. "

" कसा "

" [illegible] हिंसेला मारते. "

" [illegible] जनरल डायरसारख्यांना हिंसा करायला कांहींसुद्धा लाज वाटत नाहीं."

[illegible] वाटत. पण हिंसेला प्रतिहिंसा मिळून दुप्पट हिंसा तर होत नाहीं ना ?"

" [illegible] सपरदीरापेक्षा गांधी जास्त पराक्रमी म्हणावयाचे ? "

[illegible] नाहीं. म्हणूनच मी त्यांना राजयोगाची एक पायरी अनुभवलेला [illegible] समजतों. "

" [illegible] दुर्बळांना अहिंसा काय उपयोगाची ? "

दुर्बळांचा कशी ! मरण्यास आनंदानें तयार होणें हें मनोदौर्बल्य का आहे ? मरणाच्या भीतीनें ब्याड बनून, बेफिकीरीच्या वेडानें नेपोलियन होणें हें [illegible] दौर्बल्य आहे ? " आपण Muscular system आणि Nervous system यांतलें सर्व पारिस्सारिक फरक जाणताच."

" मग तुमचा शिवाजी राजा भ्याडच म्हणावयाचा ? "

" त्यांनीं भीतीचा संहार केला. भीतीनें संहार केला नाहीं."

" तर इतिहासप्रसिद्ध व्यक्तींची चिकित्सा नको. मला असें म्हणावयाचें होतें कीं, गांधींच्या अहिंसेमुळें हिंदु लोक दुर्बळ बनतील. "

" उलट सारें जग सबल होईल. हिंदु लोक तर फारच बलवान होतील. गौतमबुद्धानंतर आज २५०० वर्षें झालीं आहेत, हें आपण सगळेच विसरतों. "

" पण कांहीं लोक तर दंगे, धोपे, लुटारूपणा, व बंडें करतातच. "

" त्याबद्दल गांधींना अतोनात दु:ख होतें ते लोक म्याड आहेत असें त्यांना स्पष्ट वाटतें. शठं प्रति शाठ्यम् यापेक्षा शठं प्रति प्रीति हें तत्त्व त्यांना अधिक मान्य आहे, आणि माझ्या संस्कृतिसाम्राज्याचें प्रीति हेंच मुख्य साधन होय "

मि. क्षेमकल्याणी ! तुमचीं सगळींच उत्तरें मला पसत आहेत असें नाहीं, पण कोणत्याही प्रश्नाला तुमचें उत्तर ठरलेलें आहे असें पाहून तुम्ही खचित तत्त्वनिष्ठ आहात असें मला वाटतें. आणि तुमची मुख्य संस्कृतिसाम्राज्याची कल्पना तर मला पुष्कळच मान्य आहे. तुमचे मार्गही मला समजले. पण या शस्त्रास्त्राच्या युगांत, आणि या फ्रॅन्को-जर्मन समरभूमीवर ते मार्ग व तें ध्येय याचा एक अत्यंत सूक्ष्म ध्वनिसुद्धा कोणी ऐकून घेणार नाहीं. तथापि प्रयत्न करा. ईश्वर तुम्हाला आज नाहीं, उद्यां, केव्हातरी यश देईल. "

महात्माजी ! रोमॅरोलॉं म्हणजेच मी सारें फ्रेंच राष्ट्र आज समजतों. म्हणून या पत्रांत फक्त त्याचीच भेट दिली आहे.

आतां गुलाबविषयीं लिहून हें पत्र संपवितों. महात्माजी, सांगावयाला अत्यंत दु:ख होतें कीं, मी इशारत देऊन सुद्धा गुलाबवर पॅरिशियन लेडीजच्या संगतीचा दुष्परिणाम झाला होता. तिच्या पोषाखांत फरक पडला होता, व वागणुकींतही शरीरसुखाची जास्त लालसा उत्पन्न झाली होती, ती नाचायला शिकली. नर्तनाची कला येथें वाईट नाहीं, परंतु आम्हां हिंदूंचें नर्तन जसें मन-पावित्र्याचेंच एक साधन असतें, तसें येथें मुळींच नसून, तें शरीरसुखाचेंच साधन आहे. गुलाबला येथल्या तरुणांबरोबर नाचायला मी प्रतिरोध केला नाहीं. ती नाचली, नाचते. एवढेंच नव्हे तर मी येथून इटलींत जात आहें तर ती म्हणते कीं, मी तुम्हांला जर्मनींत भेटेन. मी तिला तायडतोब रुकार दिला. आणि विश्रांतिकरणानें मिलनला जाण्याकरतां स्टेशनवर एकटाच गेलों. पण महात्माजी ! आश्चर्य असें कीं, माझी गुलाब स्टेशनवर माझीच वाट पहात होती. तिनें आमची तिकिटें काढून ठेविलीं होतीं. ती आगगाडींत मला म्हणाली, ' आर्यस्त्री स्वातंत्र्याचा कधींही दुरुपयोग करीत नसते, हें मी सगळ्या पॅरिसला आज शिकवून आलें आहें "

मी तिला प्रेमानें आलिंगून चुंबिलें, कारण आमच्या डब्यात तपस्वी रोमॉरोलॉं-शिवाय कोणीही नव्हतें ते मजबरोबर ग्लॅसगोपर्यंत ठिकठिकाणीं हिंडले, आजच परत फ्रान्सला गेले

या पत्रात मला एक अत्यत वाईट गोष्ट करावयाची आहे ती अशी कीं ती रा दादासाहेबांचें एक पत्र जें मी पूर्वी पॅरिसहून पाठविलें होतें त्याचें आपण काय केलें हें विचारता काय कर ? दादासाहेबाना मनोधैर्य नमावें याचें अत्यत वाईट वाटतें आपणही त्याना आपल्या त्या बायकोला व मुलग्याला घरीं आणावयाची विनती करा मला तरी त्यामुळेंच आनद वाटेल. हें दादा-साहेबाचें पत्र मॅडम—इनें गुलाबला दिलें, त्या बाईच्या घरीं दादासाहेब विसरले असतील महात्माजी ! त्याच उर्वशीनें माझ्याशींसुद्धा पूर्वी दोनदा लघळपणा केला होता ! आणखी पशुवृत्ति ती कोणती ? मी हें गुलाबला सांगितलें तशी ती नुसती थरारली ! ” कळावें

आपला पुत्रतुल्य,

**मृगेंद्र**

§ २ या विस्तृत पत्रामुळें महात्माजींना, मिठाच्या सत्याग्रहाच्या प्रवासांत सुद्धा अतोनात वाईट वाटलें मृगेंद्राची कल्पना रवींद्रनाथ टागोर, अरविंदबाबू घोष, शॉ, वेल्स, रोमॉरोलॉं प्रभृतींच्या पुस्तकवाचनानें, भेटींनीं वगैरे साधनानीं तयार झाली आहे खरी, तींत त्याचें सत्वदेखील चमस्तें खरें, पण त्या विशाल दृष्टात तो आपल्या मातृभूमीला, आज नाहीं तरी, उद्या विसरेल कीं काय ? अशी त्यांना भीति वाटली पण त्याना मृगेंद्रापेक्षाही गुलाबची मात्र अतोनात काळजी वाटू लागली तिच्याकरता तरी त्या जोडप्यानें आता परतावें असें त्याना वाटू लागलें होतें दादासाहेबाच्या पत्राचा यापूर्वीच त्यानीं सदुपयोग केला होता आता सख्याहरीचें व दादासाहेबाचें पटणें शक्यच नव्हतें, व भागीला तर आपला मुलगा डोळ्यांसमोर देखील नव्हता, म्हणून त्या हुषार पोरानें एकदम गांधींचाच आश्रय घेतला होता, व त्यानीं त्याला सुरेंद्राच्या हवालीं केलें होतें पण वृद्ध क्षेमकल्याणीची व त्यांच्या नूतन पत्नीची कहाणी अजून संपली नाहीं ती ओघाओघानें येईलच. तूर्त

तरी महात्माजींनीं सुरतेच्या तापीच्या पुलावरून उतरल्यानंतर पहिल्याच मुक्कामांत, मुंजेशाला तार करून परत बोलावण्याकरितां एक फॉरिन् टेलिग्राफचा फॉर्म आणवला पण तो त्याच्या हातीं पडण्याच्या अगोदरच मुंजेशाचें पाचवें पत्र त्यांच्या हातीं आलें त्यावरून त्यांना आपला बेत सोडून, द्यावा लागला मुंजेशाचें हें पत्र, इतर पत्राच्या मानानें फारच लहान होतें,—तें असें,—

## पत्र पाचवें

डब्लिन्—६ मार्च १९

कृ० सा० न० वि० वि०

माझा यूरोपपर्यंतचा प्रवास एकदरीनें बरा झाला कारण इटली स्विस्लंड जर्मनी, हॉलंड, इंग्लंड, व स्कॉटलंड् येथपर्यंत रोमॉरोलॉं आमच्या बरोबर होते त्यांच्यामुळें माझ्या व्याख्यानांना जास्त गांभीर्य आलें, मला श्रोत्यानाही, अनेक शंका-कुशंका काढून, व समाधान झाल्यावर कार्य करण्यास उत्तेजन दिलें इटलींत मुसो लिनींनीं तर फारच बहार उडवून दिली ते थट्टेनेंच म्हणाले, ( पण त्याचें हृदयच त्या उद्गारातून बाहेर पडलें, ) कीं, तुमच्या महात्माजींची, तोफांना बंद पाडणारी तोफ दूर हिंदुस्थानात होती तेंच बरें पण आता तुम्ही इथें येऊन आमचीं सिंहासनें हादरून टाकीत आहात ! महात्माजी ! मला तर खरोखरच असें वाटतें कीं, आपण हिंदुस्थानात सिव्हिल डिसओबिडियन्स् चालविलें आहे, तसें युरोपांतही मिलिटरी डिसओबिडियन्स् करावयाला यावें ! टॉलस्टॉयनें तरी काय केलें होतें ? प्रथम अनेकांचे बळी पडतील ना ? पडोत नाहीं तरी कोणत्याही नव्या तत्वाला काहीं नर बळी द्यावे लागतातच प्राचीन काळीं फक्त त्या तत्ववेत्त्याला छळून भागत असे आता यांनींच हें यांत्रिक व सांघिक युग उत्पन्न केलें आहे, तेव्हा यांना नर बळीही पुष्कळ दिले पाहिजेत आजपर्यंत नर बळी घेणें म्हणजे, देशभक्तीचा तो एक अमोल्कि गुण समजण्यात येत असे आता नर बळी म्हणजे शुद्ध पाप हें सत्यच त्यांच्या डोळ्यात भरू द्या मी ही विचारपरंपरा मुसोलिनिला सांगितली, तेंव्हा ते म्हणाले कीं, I fall at the feet of a man who thinks, and acts more dangerously than myself Gandhi is that man. I am his slave !

( जो माझ्यापेक्षाही जास्त भयंकर विचाराचा व आचाराचा मनुष्य आहे, त्याच्या पायाशीं मी लोळण घेतों.गांधी तसा मनुष्य आहे. मी त्याचा दास आहें.)

हीं अशी एकदम चांगली तर एकदम वाईट मनोरचना साऱ्या युरोपखंडाची हल्लीं झाली आहे समतोलपणा तो कसा, हा त्याच्या मेंदूला माहीत नाहींच. फॉक्सनें त्याचें डोकें कसें भणाणून गेलें आहे. स्विझर्लंड, हॉलंड व बेल्जम या तीन राष्ट्रांनीं मात्र मला चांगलाच पाठिंबा दिला आहे, व आपणास आश्चर्य वाटेल कीं, माझी कल्पना जर्मनीनें नुमती झेलून घेतली. ते म्हणाले कीं आमची सारी धडपड सूर्यप्रकाशास्तव आहे. ज्ञान व उद्योग याना आजही फ्रान्स व इंग्लंड यानीं कसें अंधारात ठेविलें आहे. तुमच्या प्रयत्नाना आम्ही सर्वस्वीं तयार आहोंत. पण यामुळें इंग्लंडमध्यें मी येऊं नये अशी मला नोटिस आली होती. म्हणून मी रशियात जाणार होतों; पण रोमॅरोलॉं एकटेच इंग्लंडमध्यें गेले, व त्यानीं व बर्नर्ड शॉ आणि वेल्स यानीं लेवर गव्हर्मेंटचा धिक्कार केला. त्यामुळें म्हणा किंवा तिकडे हिंदुस्थानात काहीं तरी विलक्षण झालें असेल म्हणा, मला इंग्लंडमध्यें जाण्याची परवानगी मिळाली. तेथें मी व माझ्यावरील तिन्ही जगद्विख्यात नरपुंगवानीं व्याख्यानाचा नुमता पाऊस पाडला. तो अजूनपर्यंत, खडकावर पडला कीं मऊ शेतात पडला हें नीट सांगता येत नाहीं. तथापि एका प्रधानानें मात्र सहजोद्गार काढलें कीं, " If there is to be one Empire, that Empire will be British Empire, and no other. "

( जगात जर एकच साम्राज्य व्हावयाचें असेल तर तें ब्रिटिश साम्राज्यच असेल, दुसरें कोणतेंही नसेल )

चटकन् शॉसाहेबानीं एक सुंदर फटका मारला ते हंसून म्हणाले, " If the World wants a Bull-dog to rule over it, it shall select it from England, but unfortunately, the world wants Human Being to represent the divine will, so it will select Human Beings from Human Beings. You can never force man to run on four feet. No gun

can give man two more feet or stick a tail to this backbone !

( जगाला जर आपणांवर राज्य करायला एकादा बुलडॉगच हवा असेल, तर तें तो इंग्लंडमधूनच निवडील. पण दुर्दैवानें जगाला परमेश्वरी इच्छेचा प्रतिनिधि म्हणून मानवी प्राणी पाहिजे आहे; आणि म्हणून तें मानवी प्राण्यातूनच त्यांची निवड करतील. तुम्हाला, माणसाला चार पायावर चालवायला कधींही भाग पाडतां येणार नाहीं त्याला आणखी दोन पाय देणारी अथवा त्याच्या पाठीच्या कण्याला शेपूट चिकटविणारी तोफ या जगात उत्पन्न होणार नाहीं )

असो, इंग्लंडमधली कामगिरी एवढीच कीं, मला शेव्हीयन स्कूल मिळालें तूर्त पुष्कळ झालें. आयर्लंड सहज मिळेल स्कॉटलंड म्हणजे इंग्लंडचें डोकें आहे असो. आज आम्हीं पेट्रोग्रॅडला जाण्याकरताच निघत आहोंत. कळावें.

आपला पुत्रतुल्य,

**मृगेंद्र.**

§ ३ दब्लिनहूच्या या पत्रानें गांधींना एक प्रकारें फार मोठें समाधान झालें आपण त्या नवराबायकोला परत बोलावलें नाहीं हेंच बरें केलें असें त्यांना आतां वाटू लागलें. मृगेंद्राची कल्पना, आपल्या अहिंसेच्या कल्पनेशीं विसदृश नाहीं, उलट तो आपल्या सत्प्रेमालाच फार पूज्य मानतों हें त्यानाही आवडलें मुसोलिनीचे उद्गार वाचून त्यांनीं स्मितहास्य केलें, पण बर्नर्डशॉच्या विनोदानें, तर गंभीर गांधींसुद्धां मोठ्यानें हंसले एकंदरींत मृगेंद्रानें आपल्या पहिल्या राजकीय सफरींत मोठेंच कार्य केलें याचा त्यांनींही अभिमान वाटला मात्र तो रशियांत विनाकारण गेला अशी त्याना, त्यातल्या त्यात हुरहुर वाटूं लागली नेहरू पितापुत्र जरी मॉस्कोला जाऊन आले होते, तरी रशियाच्या प्रचलित राजकारणाविषयीं त्याचें चागलें मत नव्हतें गुप्तकट, कम्युनिझम् वगैरेविषयीं इंग्लिश ग्रंथकर्त्यांनीं रशियाचें नाव व्यर्थ बदनाम केलें असलें तरी, टॉलस्टॉयचा रशिया हा नव्हे अशी त्याची पूर्ण खात्री होती. हिंदुस्थानात जे, कम्युनिस्ट म्हणून कित्येकाना पकडण्यात आलें, त्याविषयीं गांधींना वाईटच वाटलें, तथापि रक्तपाती अराजकता त्याना कधींही मान्य नव्हती. निस्सत्व करून

टाकणाऱ्या राज्यपद्धतीपेक्षां, प्रेमाचें, सत्याचें राज्य स्थापणारी अराजकता बरी, असें त्यांनीं म्हटलें असेल; पण अराजकतेकरतां अराजकता त्यांना थोडीसुद्धा खपत नाहीं. तें कसेंही असो. त्यांचें लक्ष मृगेंद्राच्या सहाव्या पत्राकडे लागलें खरें; आणि तें लवकरच आलेंही. अथवा पत्र नव्हे तर मोठी तारच आली. तिचा मराठी सारांश असा.

## वुखाऱ्याची तार !

ता. ११ एप्रिल. १९

सांगण्यास अत्यंत तीव्र वेदना होतात कीं, गुलावनें मला सोडलें. मॉस्को येथें तिला एक रशियन योगिनी भेटली. तिनें तिला ड्रिल्वी आणि योगसाधनाचीही चटक लाविली. योगाभ्यासाचें तिचें निव्वळ थोतांड आहे, पण गुलाब तिच्या-हातच्या कह्यात गेली कीं, शेवटीं तिनें मला स्पष्टच सांगितलें कीं, मला आपणांस कायमचें सोडणें भाग आहे. या दुःखानेंच केवळ नव्हे, तर हें दुःख गिळूनही मी साधार सांगतों कीं, रशियाची नीतिमत्ता अत्यंत बिघडली आहे. त्यांचा हिंदुस्थानवर जो पूर्वीपासूनच डोळा आहे तो अजूनही आहे. माझ्या कल्पनेच्या येथें ठिकऱ्या ठिकऱ्या उडल्या ! लिओ टॉल्स्टॉयचा हा आजचा रशिया नव्हे. रशियाबद्दल साशंक राहण्याबद्दल मी ब्रिटिशांना दोष देऊं शकत नाहीं. आणि हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें बोलावयाचें झाल्यास माझी संस्कृतिसाम्राज्याची कल्पना गैरीज करून, मी ब्रिटिश सत्तेलाच मान्यता देईन. हिंदुस्थानचें प्रजासत्ताक स्वतंत्र राष्ट्र होऊन, गांधी त्याचे पहिले प्रेसिडेंट झाले तर गोष्ट निराळी, पण तसें होणेंही माझ्या संस्कृतिसाम्राज्याची पहिली निशाणीच होय. परंतु तसें घडून येईपर्यंत तरी मी बर्नार्ड शॉ व एच. जी वेल्स यांच्या ब्रिटनच्या सत्तेलाच हिंदुस्थानच्या हितार्थी गणेन; रोमॉरोलाँचा मान्य अजून आहे तसा देश आहे. अति शहाणा त्याचा बैल रिकामा, या म्हणीप्रमाणें फ्रान्सचीं सगळीं कामें सुंदर पण अपुरीं राहतात. जर्मनीला पितृदेशप्रेम इतकें जबरदस्त आहे कीं, त्याला पलीकडलें बघण्याची संवयच नाहीं; व केल्या तरी त्यांत त्याचें लक्ष नसतें. ब्रिटिशांचें लक्ष असतें तें फक्त आत्महिताचें असतें हें जरी खरें; तरी त्यांना पोटसाठी लक्ष देण्यास भाग पाडलें; असो.

गुलाबनें मला दगा दिला तरी माझ्या आत्मनिष्ठेनें मुळीच दिला नाहीं हें

# महात्मा गांधी—सैतान कीं साधु ?

सांगायला मला मोठा आनंद वाटतो. रशियात जरी माझ्या कल्पनेच्या चिंधड्या उडाल्या आहेत, तरी अफगाणिस्थानमधलीं राज्यक्रान्तीची संधी वाया जाऊं देऊं नये असें मला वाटलें, व मी एकटाच धुराऱ्यास आलों आहें. धुराऱ्यास सुद्धा गुलाबच्या विरहानें मला धुमारा आला नाहीं, यावरून माझी माती तत्त्वनिष्ठेचीच आहे असा मला अभिमान वाटतो.

मृगेंद्र

§ ४ या तारेनें गांधींना क्षणभर चक्कर आली, पण तींतून ते मोकळे होतांच त्यांनीं पेशावर येथील काँग्रेस कमिटीच्या ऑफिसमधून तार आली:...

Mrigendra is arrested and brought here as a spy. Court Martial, the day after tomorrow.

( मृगेंद्राला हेर म्हणून पकडलें आहे. कोर्टमार्शल परवा आहे. )

§ ५ काय असेल तें असो. ही छोटी तार हातीं पडून गांधींनीं ती वाचताच त्यांना एकप्रकारचें अवसान आलें, त्यांचें वदन तेजःपुंज झालें, त्यांच्या मस्तकाभोंवतीं एक दिव्य वलय उत्पन्न झालें. त्यांच्याजवळचे लोक सांगतात कीं, असें विलक्षण दैदिप्यमान तेज महात्माजींच्या भोंवतीं त्यापूर्वी कधींही कोणीही पाहिलें नाहीं. तें असें कितीं तरी तास बसले होते. तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं तें तेजोवलय कमी होत चाललें, व नंतर त्यांना झोंप लागली, तेव्हाच तें वलय आजिबात नाहीसें झालें. मात्र त्या स्फूर्तिमग्न स्थितींत त्यांनीं झोंपेशिवाय आणि भाषणाशिवाय बाकीचीं सगळीं रोजचीं कामें केलीं. ते कोणाशीं बोलले नाहींत कीं, क्षणभर झोंपलेही नाहींत. रोजच्यासारखा प्रवास केला; व भजनादि सर्व प्रकारही त्यांनीं यथासांग पार पाडले. शेवटीं चवथ्या दिवशीं सकाळीं ते उठले तेव्हा " शाबास बालानो ! योगिनी ! " असे ते उद्गारले ! याचा अर्थ काय ? म्हणून इतरांनीं विचारलें तेव्हा म्हणाले.

" मी जेव्हां पेशावरला गेलों."

" पेशावरला !!!" सगळे शिष्य स्तंभित होऊन आश्चर्यानें ओरडले

" हो. पेशावरला मी गेलों ! मला माहीत आहे कीं मी त्यावेळीं येथेंही होतों ! पण ही योगसिद्धि आता मी मान्य केलीच पाहिजे. याविषयीं दर्ते इर-

वंच पुरें. मी जेव्हा पेशावरला गेलों तेव्हा मृगेंद्राला एका मोकळ्या मैदानावर ख्राइस्टसारखा.

"ख्राइस्टसारखा !"

" अगदीं बरोबर तसाच ! आणि एक पलटण बंदुकी भरून त्याच्या शरीराचें धिरडें करायला तयार होती. आणि—आणि—आणि—( डोळे पुसून ) माझी गुलाव, त्याला वाचविण्याकरता, जनरलची मनधरणी करीत होती. तिचें त्या जनरलनें मुळींच ऐकलें नाहीं पण इतक्यात मृगेंद्राच्या अंगावर एका मनुष्यानें आपलें अंग टाकून त्याला पूर्णपणें झाकून टाकिलें.

" कोण तो महात्मा ? "

" कॅप्टन माधवराव मोघे ! "

" शाबास ! "

" पण त्याना तावडतोब दूर करण्यांत आलें पण त्याच्या ठिकाणीं दुसरें एक मनुष्य येऊन त्यानेंही मृगेंद्राला तसेंच झाकिलें. "

" हा दुसरा कोण ! "

" सुरेंद्रबाबू ! "

" भले पठ्ठे ! " दुसरा भरतच ! माते ! हिंददेवी ! असे वीरपुत्र

" थाबा !" त्यालाही दूर केलें ! पण त्याच्या जागीं मणिला गेली,

" धन्य मणिले !" धन्य तुझी ! "

" तिलाही दूर केलें ! मग माझी गुलाब जाऊन आपल्या पतीला बिलगली; त्यासरशीं तीं दोघें एकदम अदृश्य झालीं ! "

" काय म्हणता ? एकदम अदृश्य ! "

" हो. एकदम अदृश्य झालें " मलासुद्धां दिसली नाहींत. लष्करानें त्याना खूप शोधलें पण फुकट ! पण इतक्यात एक योगिनी हंसत हंसत आली व त्या जनरलला व आम्हाला म्हणाली, ' माझ्या योगविद्येनें मी त्याना अदृश्य केलें आहे. मी गुलावची आई असून मृगेंद्र माझा जावई आहे. आता मलाच धरा कसे एका शिपायानें तिला धरण्याचा प्रयत्न करताच त्याच्या हाताला वाऱ्यांत हिसका मात्र बसला. कारण ती योगिनी अदृश्य झाली.

दोघटीं " मि. गांधी, अशानें आम्हीं तुमच्यावर राज्य तरी कसें करावें ? " असें तो जनरल मला म्हणाला. मी म्हटलें कीं, " गुन्हेगार कोठें आहेत याचा जरी आतां पत्ता नसला तरी तुम्ही गुन्हा तरी कसा शाबित केला पाहूं ! " याचें त्याला उत्तर देतां आलें नाहीं. मग मी मृगेंद्राची बुखाऱ्याची तार त्याला दाखवली. ती वाचून तर तो अगदींच विरमला, व मग उद्गारला, " छे. छे. अशा अन्यायानें आमचें राज्य तर महिनाभर टिकणार नाहीं. " मग त्यानें त्या तारेची नक्कल व झालेला प्रकार वरिष्ठांस टेलिफोननें कळविला व वरिष्ठांकडूनहि " Sentence quashed ! Mrigandra released " अशी तार आली. जणो मृगेंद्र सुटकेची वाटच पाहत होता. पण ती तार माझ्या हातीं पडतांच ती तिघेंही आम्हांस दिसलीं. तसा तो जनरल देखील हंसला. व मला म्हणाला,

Gandhi ! you are a Mahatma ! but Satan or Saint.

" गांधी ! तुम्ही महात्मा आहांत ! पण सैतान कीं साधु ?

पुस्तक २ रें समाप्त.

पुस्तक तिसरें.

# साधु !

## भाग पहिला

## योगिनीची माया !

कायाकाशयोः सम्बन्धसंयमाल्लघुतूलसमापत्तेश्चाकाशगमनम् ॥
पातञ्जलयोगसूत्रम्—विभूतिपादः—३·४२ ॥

§ १ महात्मा गांधींचा मुक्काम ××× येथें असतां, त्यांना मृगेंद्र, गुलाब व ती तपस्विनी अशी तिघें, पेशावरहून येऊन भेटलीं. माधवराव आणि मणीला तसेंच माधवराव पुष्पासच होते गांधीसारखींच तीं तिघेंहीं पेशावरला गेलीं होतीं. त्या योगिनीचीं तीं गूढ कृत्यें गांधींनाही अजून समजलीं नव्हतीं. म्हणून त्यांनीं एक्या रात्रीं सर्व मंडळींत त्या योगिनीला विचारलें —

" आपली माहिती आम्हास मिळेल काय ? "

" हो. न मिळायला काय झालं ?" त्या पोक्त तेजस्विनीनें उत्तर दिलें, "आपणाला काय माहिती पाहिजे ?"

" पहिल्यानं असं सांगा कीं, आपण या मुलांना नाहींसं कसं केलं होतं ?"

" त्याच्या अगोदर माझं थोडंसं चरित्रच सांगतें. तें फारसें मोठेंहि नाहीं. एकाच ध्येयाला वाहवून घेणाऱ्याच्या चरित्रात बहुत करून विविधता नसते. त्यात माझं ध्येयही सामान्यच होतं. माझ्या पतीला महारोगानं पछाडलं होतं."

" आपली जात कोणती ?" गांधींनीं सोत्कंठ विचारिलें.

" मी पारसिन म्हणजे पार्शी जातीची आहें "

" मग गुलाब पार्शिण आहे म्हणावयाची ? " गांधींनीं स्मितहास्य करून विचारिलें

" पार्शीण होती आतां ब्राह्मणी आहे "

" हें क्षेमकल्याणी घराणें म्हणजे और आहे बुवा ! वसु विलाला, आणि पटेल बिलाला लोक प्रतिरोध करितात, पण हे लोक आपणाला करायचें तें बेलाशक करतात. मृगेंद्रा, मी तुझं अभिनंदन करतों. तुम्ही बापलेक खरे सुधारक आहात. बर पुढें ? "

" माझा बाप एक श्रीमंत व्यापारी होता " योगीनीनें आपली गोष्ट पुढें चालविली, " मी त्याची एकुलती एक मुलगी होतें. मला भुसावळेला दिलं होतं, आणि माझे पतीमहाराजही श्रीमंत आणि सद्गुणी होते. आम्हाला ही पिरोज- हिचं खरं नाव पिरोज आहे बरं का—झाल्यानंतर त्यांना त्या रोगाचा उद्भव झाला. त्याच्या निपणजाला तो रोग होता असं त्यावेळीं कळलं. आम्हीं नाना- प्रकारचे औषधोपचार केले, पण रोग हटेना मुद्दा, मग समूळ कसा जाणार? शेवटीं

एक हटयोगी आमच्याकडे आला, व त्यानें त्याना हटयोगानें बरं करण्याचा प्रयत्न केला. मौज अशी झाली कीं, त्याचं काहीं चुकलं असलं पाहिजे; कारण माझ्या पतीचा रोग तर बरा झाला नाहींच, पण त्या योग्याला मात्र तो जडला. तसा तो घाबरला; व आपण आपल्या गुरूकडे जातों असें सांगून, जास्त कमी न बोलतां तो तडक निघून गेला सुद्धा. वर्षा सहा महिन्यात तो आम्हाला आगगाडींत दिसला, तेव्हा खडखडित बरा झाला होता. तेव्हा आम्ही त्याला विचारणार तोंच तो, पुढल्याच स्टेशनवर उतरुन निघून गेला. आम्हाला अत्यंत खेद झाला; पण मला मात्र एक प्रकारची आशा उत्पन्न झाली. मी मनांतच निश्चय केला कीं, त्या योग्याला नाहींतर त्याच्या गुरुला गाठून व त्याच्या हातां-पाया पडून पतीला रोगविमुक्त करायचंच. पण मला जायला त्यांनीं मुळींच परवानगी दिली नसती. शिवाय पिरोज होती ना ? शेवटीं मी मनाचा धडा केला. मी अमक्या कारणाकरता जातें, राग नसावा, पिरोजला हजराबिबीजवळ दिलें आहे.

" पण हजराबिबी म्हणाल्या कीं, ही निवडुंगात सापडली ? "

" तशी बतावणी करायला मीच तिला मुद्दाम सांगितलं होतं. समजा मी प्रवासातच मेलें, तर महारोग्याची आईशिवाय मुलगी म्हणून तिचं लग्नच झालं नसतं, असो. पुढें मला तो हटयोगी व त्याचा गुरु यापैकीं कोणीच सापडलं नाही. पण सहा वर्षांनंतर हिमालयात मात्र मला एक तपस्वी दिसला. तो वृद्ध असूनही त्याची कांति दिव्य होती. १८५७ सालच्या बंडात आपण ७० वर्षांचें होतों व त्या बंडाचा बीमोड झाल्यामुळें इथें एका महान् योग्याजवळ त्याची सेवा करून राजयोग शिकलों व आज आपण आणखी ५० वर्षे देहधारणा करणार व मग जाणार असें ते म्हणत असत. मी त्याना माझी कथा सांगितली व माझ्या पतीवर कृपा करण्याची त्याना विनंती केली. त्यांनीं मला दोन उपाय सुच विले. एक औषधीचा व दुसरा प्राणायामयोगाचा. पैकीं पहिला उपाय मी कधींही करणार नाहीं असा त्यांचा आग्रह होता, व दुसरा उपाय मात्र ते मला शिकवायला तयार होते. माझ्या पतीला तेथें नेण्यास अगर त्याना पत्र पाठवून कुशल वर्तमान कळविण्यास देखील त्यांनीं मला परवानगी दिली नाहीं. कारण त्यामुळें त्यांना जगसंगतीचा त्रास होणार होता

असो. नंतर सहा वर्षें, मी त्याची सेवा करून, त्याजजवळून राजयोगसुद्धा शिकलें. खरोखरच महात्माजी! असे योगी या भूतलावर आहेत, म्हणूनच या जगाला अज्ञानसागरात बुडून सशरीर मरण्याचें भय नाहीं—

" माईजी!" मृगेंद्रानें मध्येंच विचारिलें, "आपण मराठी फार चांगलं बोलता? आपला गुरु महाराष्ट्रीय आहे काय?"

" होय! आश्चर्य वाटेल, पण त्याचें घराणें ग्वाल्हेरच्या वकीलाचें! त्याच्या वडिलाचा, महादजी शिंद्याच्या मरणोत्तर, विषप्रयोग होऊन, खून झाला होता, असो. त्याच्या चरित्राशीं तूर्त आपणाला काय करायचं? मी भुसावळेस रहात असल्यामुळें मला मराठी चांगलंच येत होतं. त्यात गुरूजीही महाराष्ट्रीय ब्राह्मणच. अप्रतिम योगीराज. त्यांनीं हवेंतून, पाण्यावरून सूर्यरश्मींना धरून चालण्याच्या वगैरे सिद्धि प्राप्त झाल्या होत्या. पण त्यांनीं त्याचा क्वचितच उपयोग करावा. तें काहीं असो. मी त्या विद्येनें महारोगाचा विध्वंस करण्यास शिकलें, व गुरुजींची आज्ञा घेऊन घरीं परतलें, पण माझें दुर्दैवच खरें. पतींना मरून दोन महिने झाले होते. मला तीव्र विषाद वाटला. पण गुरूजींनीं सूक्ष्मरूपानें येऊन माझें सांत्वन केलें, व मुलीला तरी त्या रोगापासून सांभाळण्याकरिता जिवंत रहा, अशी मला आज्ञा केली. मी तातडीनें हजराबिबीकडे गेलें, तेव्हां ती आपल्या पतिसमवेत व फिरोजला घेऊन साबरमतीला आपल्या आश्रमात गेली असल्याचें मला कळलें. मग मी तिथं गेलें. तेव्हा फिरोझ सुखी असल्याचें मला दिसलें. मी हजराबिबीलासुद्धा ओळख दिली नाहीं. कारण माझें मन पतिविरहामुळें वैतागलें होतें, व फिरोझला माझा लळा मला लावून घ्यावयाचा नव्हता. म्हणून मी सातपुड्यात जाऊन राजयोगात आनंद मानून होतें. नंतर मला एका सफरीत कळलें कीं फिरोझचें मृगेंद्राशीं, विशिष्ट परिस्थितींत लग्न लागून तीं दोघें अमेरिकेला गेलीं. त्याप्रमाणें मग मीदेखील त्यांच्या मागें जात राहिली. कारण तिला तो रोग केव्हा जडेल याचा नियमच नव्हता. त्याप्रमाणें शेवटीं झालेंच. छे, छे, फिरोझ! अशी घाबरूं नकोस. मृगेंद्रा! आता घाबरण्याचें मुळींच कारण नाहीं. हिला रक्षिण्यात मी विनाकारण ढिल व योगसाधन करण्यास लाविलें नाहीं. पण तुमच्यापैकीं एकालाही मी खरं कारण मुद्दामच सांगितलं नाहीं— महात्माजी! तुमच्या मनात यावेळीं काय आलं आहे हें मी बरोबर ओळखलं

आहे. मी इथून साबरमतीलाच जाणार आहे, व माईला आणि कस्तुरीलाही मी रोगविमुक्त करणार आहे. एवढेच नव्हे; तर मला माहीत आहे कीं, केवळ त्या रोगाच्या संकटामुळेंच कस्तुरीचे स्थळ माझ्या फिरोझला मिळाले आहे; तेव्हा तिकडूनही तिचें नुकसान होऊं नये अशी माझी इच्छा आहे. त्या मुलीचें माझ्या जावयावर अनन्य प्रेम आहे हें मी ओळखून आहें. तेवढ्याकरता कांहीं मला योगसाधनाची जरूरी नव्हती. मी ती गोष्ट आपल्या आश्रमातच निरखीत होतें, माझी फिरोझदेखील मोठी प्रेमळ आहेहो. फिरोझबाळ ! तुला कस्तुरी सवत म्हणून चालेल ना ? "

" त्या माझ्यावर बहिणीसारखेंच प्रेम करतात. मग लग्न करून तर आम्ही जास्तच प्रेम करूं, नाहीं का ? "

" ही गोष्ट एक झाली, " गांधी म्हणाले, " आतां योगबलानें का होईना, अदृश्य होतां येतें, हें तर मी स्वनेत्रांनीं पाहिलें आहे. पण आपण तर या मुलांना सुद्धां अदृश्य केलें, हें कसें ? शिवाय दुसरें असें कीं, आपणाला या योगक्रियेची कांहीं आधुनिक शास्त्रीयमीमांसा करतां येईल का ? "

" जणो मुंगीच्या उदाहरणानें हत्तीची माहिती देतां काय ? असाच तुमचा दुसरा प्रश्न आहे. " माईजी हंसून म्हणाल्या, " कुठें आमचें योगशास्त्र आणि कुठें हें पाश्चात्यांचें आधुनिक सायन्स ? कशाला कांहीं पत्ता ! चारशें वर्षे झालीं हे पाश्चात्यशास्त्रज्ञ, दगडमाती, वीटचुना भगर वनस्पती, जनावरें व मासे आणि पक्षी असल्या, बाह्यसृष्टीच्याही एका लहानशा कोपऱ्यात गोट्या खेळणाऱ्या पोराप्रमाणें, लटुपटुचा खेळ करीत आहेत. अंत:सृष्टींत केवढें अपरंपार चमत्कार व निरुपम सुख भरलें आहे, याची त्या वेड्यांना अजून थोडीसुद्धा जाणीव नाहीं. तरी परमेश्वर त्याच्यापैकीं एखाद्याला मधूनमधून थोडासा जागा करतो दोनशें वर्षांपूर्वी फ्रान्समध्यें थोडींथोडकीं नाहींत, चांगलीं तीस वर्षे, हसोच्या सर्वांगातून ते सूक्ष्म ध्वनि परमेश्वरानें घुमवून दिलें होते. पण त्याला वाटलें कीं, आपण आजारीच आहोंत. तेच आमच्याकडे रामकृष्ण परमहंस घ्या कीं स्वामी विवेकानंद घ्या, त्यांना संदेश प्राप्त होताच त्यांनीं त्याला सर्वस्वार्पण केलें—

" माईजी ! " मृगेंद्राला चटकन् रोमॉंरोलॉंशीं झालेल्या संवादाची आठवण

झाली. " त्या दोघा योग्यांना राजयोग साधला नव्हता, असा कित्येकांचा त्याच्यावर आक्षेप आहे, तो खरा आहे काय ? "

" कसा खरा असेल ? ते दोघेही उत्कृष्ट राजयोगी होते. त्यांनीं राजयोगानंच परमज्ञान प्राप्त करून घेतलं होतं. परमहंसानीं भक्तियोग व स्वामीजींनीं ज्ञानयोग शिकविला; राजयोग शिकविला नाहीं, याचं कारण राजयोगात एक तर चुक्या झाल्यास, तर मुमुक्षूचं अपरंपार नुकसान होतं, आणि राजयोगाची कथा कधींच मोठी नसावी; तेणेंकरून जगातलीं संहारशक्ति वाढेल. एकच पहा, हा राजयोगाची विद्या पाश्चात्य शिकले तर ते तिचा कसा बरं उपयोग करतील ? तेव्हा बाळा तुला जर कोणी त्या योग्याविषयीं भलतंच सांगितलं असेल तर त्यावर विश्वास ठेऊं नकोस. तुझं रोमॉरोलॉशीं झालेलं संभाषण मी ऐकलं होतं; व त्यावेळीं मला तुझं हंसूं आलं. तरीसुद्धा मी कबूल करतें कीं, तुझ्या संस्कृतिसाम्राज्याच्या कल्पनेला तूं मात्र राजयोगाचा उपयोग करावा. तुझी भूमिका त्या योग्यांनीं तयार केली आहेच. महात्माजींना जसे टिळक तसे तुला ते दोघे योगी आहेत. "

" पण मी तर विवाहित असून, तुम्ही मला डबली मॅरिड् " करण्याचा धाकही घालता ? "

" जणो स्त्रिया राजयोगाला आडव्या येतात ! अरे! तुमच्या व आमच्या सनातन संस्कृतींत स्त्रियांना कमालीचं महत्त्व व स्वातंत्र्य दिलं आहे. तूं त्या पाश्चात्याना विशेषसं लेखीत नाहींच म्हणा; व थोडं तरी लेखतोस; तेंही जास्तच आले. तीं पोरें आहेत; ऐकत नाहींत तेव्हा त्याचा कान धरून त्याना शिकवलं पाहिजे. तें कसं हें मी तुला शिवणार आहें. यापुढलं तुझं काम या महात्माजींच्या लढ्याचं नाहीं. तुझा मार्ग स्वतंत्र आहे; व तोही हिंदुस्थानच्या व जगाच्याही कल्याणाचाच आहे. महात्माजी, आपणांलाही ही राजयोगविद्या; आपल्या मार्गात फार उपयोगी पडेल. शिकलं का ? दोन दिवसात आपणाला येईल. "

" माईजी ! मी आपला अत्यंत आभारी आहें. पण आपण माझ्या प्रश्नाचें उत्तर न देतां आर्यतत्त्वाचं महत्त्व मात्र वर्णन केलं. "

" असं ! हें बघा. शरीर ज्या द्रव्यांत झालं असतं त्या द्रव्याच्या सत्वांचं आणखी एक सूक्ष्म शरीर असतं. त्याला लिंगदेह म्हणतात. त्याच्याही नाड्या मनाच्या दाबात असतात. तो दाब जीवात्मा चालवील त्याप्रमाणं प्रथम

लिंगदेह व नंतर तदनंतर सूक्ष्मदेह घन होतो, पातळ होतो, अगर त्याचे शेंकडों भाग होतात. विश्वाच्या मानानें कोटी मैलाचं अंतर फारच थोडं असतं. लिंगदेहाला विश्वदेहापर्यंत, म्हणजे विराट देहापर्यंत पसरता येतं. अथवा एका कणांत बसून महारंध्रांतही राहातां येतं. स्थलावकाशाप्रमाणंच कालगतीचीही गोष्ट आहे. मी माझाच केवळ नव्हे तर या पोराचेही देह अत्यंत पातळ केले होते. व तुम्ही, माधवराव, मणिला सुरेंद्र याचे देह विभागले होते. तुमची तशी मनःस्थिति होण्याकरता मी तुम्हाला कॉंग्रेस ऑफिसमधून अगोदर तारा करवल्या होत्या, व तुम्हाला धक्का बसताच मी तुमचे दोन दोन देह केले होते. तुमचे लिंगदेह प्रवासात पातळ व पेशावरला घन केले होते. पण महात्माजी, ही सिद्धि फारच सुगम आहे. प्राचीन महाराष्ट्रांत श्रीसमर्थ रामदासानाही साधली होती. तिचा त्यानीं स्वधर्मा करता व स्वराष्ट्राकरता उपयोग करून घेतला होता. तसा आपणही करून घ्यावा; हरकत नाहीं. आपण घेतला नाहीं तर माझ्यासारखें योगी तुमच्याकरता तिचा उपयोग करतीलच. शिवाजी महाराजाकरता रामदासानीं व तुकोबानीं केला होता."

"काय म्हणतां काय!" मृगेंद्र उद्गारला, "तुकोबाना राजयोगही माहीत होता?"

"तुझी राजयोगाची काहीं वेगळीच कल्पना दिसते. मला वाटतं कीं बंगालमध्यें परमहंसाच्या साक्षात्काराविषयीं जी चर्चा चालली आहे. —

"आपणास ती वाचायला मिळाली? क्षमा करा हं! पण आपण इंग्रजी तरी कुठें शिकला, कस शिकला, कुणाजवळ शिकलां हें मला एक गूढच आहे! नुकताच आपण रूपोच्या कन्फेशनचा उल्लेख केला. पण त्याच्या त्या रोगाचं हें निदान आजच्या पाश्चात्यांनासुद्धा थक करून सोडलि."

"तूं तसा एक लेख जरूर लिही. पण त्याच्या अगोदर रोमाँरोलाँना तार करून, आपलें परमहंस व स्वामीजी, याच्यावरचे ऐकीव आक्षेप चुकले असें त्याना जरूर कळीव. अरे, मला तर लक्षापूर्वीपासूनच इंग्रजी येतं आहे, आणि मला हिमालय सोडून दोन अडीच वर्षे झालींत. माझी गोष्टच सोड. पण माझ्या गुरूलासुद्धां इंग्रजी येतं. हें बघ. योगसाधनाला जी संवेदना, तीव्रता लागते, तिची आरंभीची तीव्रतासुद्धा कोणतीही भाषा चटकन् शिकायला पुरते. कांहीं माणसांना इंग्रजीचं मुळींच ज्ञान नसूनही तीं कशीं बोलणाऱ्याच्या मुद्रेवरून त्याच्या इंग्रजी भाष.

णाचा भावार्थ ओळखतात ? त्याना इंग्रजी भाषेचें ज्ञान होण्याला फारच थोडा वेळ लागेल. असो. ही संवेदनातीव्रता मुमुक्षूंच्या भावनात स्फुरूं लागली म्हणजे एका विशिष्ट अंशापर्यंत एकाच मार्गानं वाहते. पुढें समाधिसाधनें अनेक असतात. सर्वांत जास्त तीव्र गति ईश्वरभक्तिची असते. पण कोणत्याही उपायानं समाधि लागली, तरी त्याला इतर सर्व साधनाचें तारतम्यज्ञान होऊन, तीं त्याला सुलभ होतात. व त्या त्या साधनाच्या सिद्धी प्राप्त होतात. एकदा पर्वताच्या अत्युच्च शिखरावर गेल्यावर जसे त्याकडचे सगळे मार्ग दिसतात, व ते घेता येतात, आणि घेतल्यानंतर त्या त्या मार्गाची वनश्री दिसते, तसाच तो एका समाधीचा प्रकार होय. परमहंसानीं भक्तीनें व स्वामीजींनीं ज्ञानानें समाधिशिखर गाठलें व नंतर राजयोगही अनुभवला. तीच गोष्ट श्रीसमर्थांची व तुकोबाची. भृगेंद्रा पाश्चात्यांचं ज्ञान धुक्यासारखं अस्पष्ट म्हणून फार धोक्याचें असतें. त्यात तूं बेलाशक प्रवेश कर, पण सावध होऊन जा, असो. महात्माजी ! आपण काय ठरवलं ! " मी असं ठरवलं कीं, माझा अहिंसाधिष्ठित सत्याचा मार्ग चुकून सोडायचा नाहीं. मला इतर मार्ग नकोत, व त्याच्या सिद्धीहि नकोत. माझ्याकरिता तर नकोतच, पण माझ्या राष्ट्राकरता सुद्धा नकोत. कारण आजपर्यंत मोठमोठ्या योग्यानींही जीं साधनें राष्ट्रहितार्थ योजिलीं, तीं हिंसा थांबवूं शक्लीं नाहींत, आणि थांबवूं शक्तील असं आपणही सागत नाहींत. आमच्या अज्ञानाचा फायदा घेऊन जसे इंग्रज लोक आमच्यावर शारीरिक बलानें राज्य करतात, त्याप्रमाणें आम्हालाही त्याच्या राजयोगाच्या अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांच्यावर योगबलाची मात करता येईलही. पण त्यानाही तो मार्ग सुलभ होऊन, योगबलाचीं द्वंद्वें सुरूं होऊन माणसाचा भयंकर संहार होईल व पदार्थविज्ञानशास्त्राकरवीं जशी आज या बाह्यसृष्टीची ते विटंबना करितात, तशीच मग ते योगबलाचीही करतील. त्या विटंबनेला जागाच न ठेवणाऱ्या शारीरिक, मानसिक व हार्दिक अहिंसेवर अधिष्ठिलेली प्रीतीच श्रेष्ठ नाहीं का ? "

" महात्माजी, तुम्ही प्रीतीनं गेलात तरी अंतिम तेंच गाठणार; व मग तुम्हाला राजयोगही ज्ञात होणार. नंतर फार झालं तर, तुम्ही सिद्धींचा उपयोग करणार नाहीं. परंतु पाश्चात्यांना, हिंसा न सोडता, योगबल साधेल ही भायाच

खोटी. अहिंसा ही तर एक, योगबलाची अत्यवश्यक पायरीच आहे. अहिंसे- शिवाय निर्भयत्व कसं मिळणार?

" कबूल! पण योगसमाधी लावीपर्यंत अहिंसा पत्करून, निदान सिद्धि मिळाल्यानंतर पुनरपि हिंसा करता येतेच किनई! उदाहरणार्थ प्राचीन काळचे देवदानव व आधुनिक पाश्चात्य शास्त्रस्थापक, संशोधक, नब्वेत, स्थापक Applying agents "

" पण त्या उत्तर—*हिंसेपायीं भयंकर नाशच होतो.* "

" पण तो त्याचा नाशही मजकडून पाहवत नाही. "

" ओहो! गांधी!! गांधी!!! ती योगिनी " ती योगिनी मोठ्यानें उद्गारली;

" तुम्ही खरोखर साधु आहात!

साधु आहात!!

तुम्ही खरोखर साधूच आहात!!!

पुस्तक तिसरें

# साधु !

भाग २ रा

## दादासाहेबांचा पश्चात्ताप !

"—देवी राधे! आजपर्यंत राधेनें कृष्णाला आळविलें. पण आज हा चुकलेला कृष्णच तुला आळवितो की, राधिके! या पश्चात्तापदग्ध मरत्या जीवाला मांडी दे!"

—दादासाहेब क्षेमकल्याणी

## दादासाहेबांचा पश्चात्ताप !

§ १ दादासाहेब क्षेमकल्याणांनीं भागीशीं मिश्रविवाह लाविला हें कांहीं वाचकाना माहीत नव्हतें. त्यांनी मुंबईच्या सभेत, आपण स्वत त्या लग्नाला कबूल आहोत एवढेंच फक्त जाहीर केलें होतें. पण स्वतः भागीच, त्यावेळीं सपशेल गोंधळून गेल्यामुळें म्हणा किंवा, सत्याग्रहाचें तें प्रकरण, त्याच सभेत गांधींच्याकडून घुसवलें गेल्यामुळें म्हणा, दादासाहेबाना, सभा बरखास्त झाल्यावर. कांहीं तरी मखलाशी करून, ती सामाजिक सुधारणेची क्रांति—छे छे. भलतेंच कांहीं लिहिलें गेलें—तीं भागीच्या लग्नाची वाणी फिरविता आली असती. सभेनंतर त्याना भरपूर सवड सांपडली होती, आणि त्याच्या सुदैवानें त्याच्या सुधारक स्नेह्यात देखील त्याच्या त्या भावी लग्नाविषयीं चर्चा होऊन, त्याना लावयाला, निदान दिवसगत लावावयाला तरी संधी मिळाली होती. कांहीं स्नेह्याचें म्हणणें होतें कीं, " ही कसली घाणेरडी समाजसुधारणा ! अहो, क्षेमकल्याणांच्यासारखें घराणें जर असें आज नासलें तर, सबंध महाराष्ट्र नासायला एक वर्ष कांहीं लागणार नाहीं." त्याना दुसऱ्या कांहीं स्नेह्यांनीं दुजोरा दिला कीं, " हें कांहीं खोटें नाहीं बुवा ! समाजसुधारणा देखील पायरीपायरीनेंच व्हायला पाहिजेत. अगोदर अस्पृश्यातच मिश्रविवाह होऊं द्या, तोंपर्यंत इकडे ब्राह्मणातल्या व ब्राह्मणेतरातल्या पोटजातींचें एकीकरण देखील होईल. आणि मग वर्णमिश्रविवाह झाल्यास हरकत नाहीं." कांहीं जणाम भागीचें पूर्व चारित्र्यही भेडसावूं लागलें तर काहींना भीति वाटली कीं, उद्या हेंच दादासाहेब आपल्या मुलींदेखील अस्पृश्याना देतील! या भीतीचे भेरीवाले शास्त्रज्ञ होते त्याना दादासाहेबाना एक भलें मोठें पत्र पाठवून. हॅवलॉक, एलिस्, फ्रॉन्सिस गॅल्टन, हर्बर्ट, वगैरे पाश्चात्य शास्त्रज्ञाचे उतारे देऊन, आनुवंशिक संस्काराची महती गायिली, व सभेत उच्चारलेली प्रतिज्ञा खोटी ठरली तरी चालेल, पण हेकेखोरपणानें समाजाचें विध्वंसन करूं नका, अशी विनंती केली. दादासाहेबांचे कांहीं स्नेही पोलिटिको—सोशिॲलिस्टिक मनोरचनेचे होते. त्यानीं प्रस्तुत राजकारणाच्या दृष्टीनें जेथें गांधींनींसुद्धां अस्पृश्योद्धार कांहीं काल बाजूला सारला, तेथें दादासाहेबानीं भलत्याच प्रकारानें, राष्ट्रीयवृत्तीस पोषक अशी समाजसुधारणाची गाडी उलटून पाडूं नये अशी त्याना सल्ला दिली. उलट कांहीं कट्टर सुधारकानीं दादासाहेबांचा, तो मिश्रविवाह करण्याबाबत पिच्छाच पुरविला. त्यांनीही आपल्या

बाजूचे सारे मुद्दे सप्रमाण मांडले, व त्यांच्याकडून कोणत्याही सुधारणा होत नाहींत सुधारणा करताना पूर्वीची घडी विघडतेंच, पण त्याचें वाईट वाटण्याचें कारण नाहीं, भावी पिढींच्या सुखासाठीं ह्यातातांनीं कष्ट सोसलेच पाहिजे, असेंच सर्व जगाचे इतिहास सांगत आहेत, वगैरे प्रकारचें दादासाहेबांना एकसारखें प्रेमाचें व कर्तव्याचें टोंचणें लाविलें होतें सख्याहरीलासुद्धा आपण मुलगा म्हणून प्रेमानें वागवावें अशीही त्याची उपदेशाची आचणी होती. दैववशात् आपणाला इब्सेन सारखें, प्रत्यक्ष घरचीं माणसेंही विरुद्ध असता, एकाकी, सर्व जगात, हाल सोसून व विडंबन पावून " खरा सुधारक " ही पदवी मिळविण्याची लोभनीय संधी प्राप्त झाली आहे, ती हातची गमाऊ नये, अशी त्या अल्पसंख्याक सुधार कांनीं दादासाहेबाला काकुळतीनें विनवणी केली.

अशा सर्व प्रकारची भवति न भवति लक्षात घेऊन दादासाहेबांनीं भागीशीं विवाह लाविला खरा. तथापि तीसुद्धा गोष्ट सहजासहजीं, संकटें न येतां झाली असें नाहीं. विवाह होऊं नये अशा मतवाल्यातून नाना प्रकारचे व नाना वयाचे, नर्व्हे, नाना जातींचे कोदंड निघाले ! कोणी भिक्षुक होते, कोणी राष्ट्रीय चळवळे होतें, कोणी समाजसुधारकी वळवळे होतें, तर कोणी वधूलाच पळविणारे, निदान फितवणारे तरी मवालीही होते. पण त्यात काहींच नाहीं, विशेष मजेदार मौज अशी होती कीं, कांहीं अस्पृश्यच त्या लग्नाला मोडा घालीत होते. वराचें वय लग्न कल्पनेलाही योग्य नव्हते, अशी त्यापैकीं फारच थोड्या जणांची हरकत होती हा धर्मलंडपणा होत आहे, असाच त्याचा इनकार होता. कोणी म्हणत कांहीं स्पृश्यानींच त्या अस्पृश्यांना चिथविलें होतें, तर ते अस्पृश्य स्वतः म्हणत कीं, आम्हाला आमचें हित कळण्याइतके आम्ही वयानें मोठें असून देवानें तितकें शहाणपण आम्हाला दिलें आहे. तें कसेंही असो. दादासाहेबानीं, भागीच्या संमतीनें मुंबईस, तिच्याशीं मिश्रविवाह लाविला खरा आणि मग काय ? त्यांच्यावर सबंध हिंदुस्थानभर वर्तमानपत्रवाल्यानीं टीकाचा नुसता गहजब उडवून दिला ? त्याचीं " कार्टूनें " सुद्धां आलीत. पण दादासाहेबांना निंदा प्रेमामधून स्तुतीचे सारखपुडे देखील मिळाले. खुद्द राधाबाईनीं जरी विवाहप्रसंगीं हजर राहण्याची तसदी घेतली नाहीं, तरी केलें तेंच बरें झालें असें मत जाहीर केलें

§ २ इतक्या विचारार्ती, इतक्या वृद्धपणातल्या विचारार्ती, व इतक्या परिस्थितीच्या विचारार्ती जेव्हा दादासाहेबांनी भागीशीं मिश्रविवाह केला, तेव्हा या त्यांच्या म्हातारपणच्या संसाराचा विचका होणें संभाव्य नव्हतें. परंतु तसें न होता, बायरन्च्या पहिल्याच व भर तारुण्याच्या विवाहासारखाच दादासाहेबांचा हा विवाह दादासाहेबांस तापदायक झाला. तसा तो तापदायक होणार असें जरी अनेकांनी भाकित केलें होतें, तरी त्याचें आद्य कारण मात्र एकाच्याही लक्षात आलें नाहीं. तें आद्य कारण म्हणजे राधाबाईची बिनशर्त अनुमति! राधाबाईनीं जर थोडा जरी विरोध केला असता, तर त्या नव्या दंपतीला, पण जुन्याच स्नेह्यांना, विरोधाशीं झगडावयास लागून, त्यांच्या मतरुचींतले भेद फारसे राहिले नसते. पण राधाबाईनीं एकदम घर सोडून धाकट्या मुलाकडे सर्व मुलींबरोबर पुण्याला प्रयाण केल्यामुळें दादासाहेबांना भागीकरतां वेगळी बंगली बांधवण्याचीही जरूर पडली नाहीं. एवढेंच नव्हें, तर सख्याहरीलासुद्धां पुण्यालाच राहतां येऊन, दादासाहेबांना तद्विषयक काळजीदेखील राहिली नव्हती. ही शांतता व हा सलोखता दादासाहेबांना इतकी मारक झाली कीं, नेहमींची नवराबायकोंची जी मतभेदाची गोड चकमक अंगीं जडली होती, ती त्यांना भागीशीं भागवावी लागली.पण भागी म्हणजे कांहीं राधाबाई नव्हे. शिवाय भागीदेखील त्या घरात कांहीं नवीन नव्हती. परंतु तिची पूर्वीची पायरी आज राहिली नव्हती आज ती त्या घराची धाकटी राणी झाली होती. ती बंगला, ती बाग, ती शेती, ते मळे, ते झोपाळे, त्या खुर्च्या, ते पलंग, त्या गाद्या आतां तिच्याच मालकीच्या झाल्या होत्या, आणि त्या आतां कायमच्या पाहिजेत असें तिला वाटूं लागलें होतें. तिला एक जरी मुलगा झाला तरी ती सगळी मालमत्ता तिच्याच वंशजांकडे चालणार होती. निदान मृगेंद्र व सुरेंद्र यांची मुलें पुरापन काढून कोर्टकचेरी करीपर्यंत तरी तिच्याकडेच तें अपार वैभव राहणार होतें ब्राह्मणाच्या बायकांच्या मनात ही भावना असते तर भागीच्या मनांत असल्यास नवल नाहीं. ती तरी स्त्रीच होती. परंतु आतां तिला पुत्रप्राप्तीची आशा करायला जागा नव्हती. तिचें वय जरी गेलें नव्हतें तरी दादासाहेबांचें वय गेलें होतें ना. म्हणून केवळ पुत्रप्राप्तीकरितां जर तिनें इकडचें कांहीं उपाय केले तर तें धर्मे होईल? याचा नीम नीतिशास्त्रेत्यांनी काढावा. पण दादासाहेब

म्हातारे झाले, सुधारक झाले, तर्में पुस्तकी नीतिशास्त्रेंत असले तरी प्रत्येक सुधारकी मताचा स्वतःचा आचार करण्यास तें कांहीं कोणाचें शाबूत नव्हतें. शिवाय म्हातारपणीं पूर्वाश्रमींच्या रोमॅन्टिक विद्वानांचें हृदय गारठलें असातलाही भाग नाहीं. विवाद म्हणजे वैशिष्ट्येन वहति इति विवाहः। त्या वैशिष्ट्याला सोडून जर स्त्रीपुरुष संसारभार वाहूं लागले तर एस्मेराना राग येणारच, व मत्सर वाटणारच. म्हातार्‍यांना राग येत नाहीं, अथवा मत्सर वाटत नाहीं असें थोडेंच आहे. भागी पूर्वी अनेक ठिकाणीं नाचली असेल, पण आता तिनें घरबसल्यादेखील ते नाच करून कसें भागेल? तथापि दादासाहेबांना स्त्रीविषयक असूया ही भावना नवीन असली, तरी तिची त्यांनीं अगाऊ तयारी करून ठेविली होती असें दिसतें. कारण एक दिवस ते भागीला-अथवा आपण तरी असें उठल्यासुटल्या तिला त्याच जुन्या नावानें का संबोधावें? दादासाहेबानीं तिचें नाव भागीरथी ठेविलें, त्याच नावानें आपणही यापुढें तिला संबोधूं या—दादासाहेबानीं भागीरथीला एक दिवस म्हटलें,

" अलीकडे घरात मटणीचं प्राबल्य फार माजलं आहे ?"

" बाई जरी घरात नसल्या, " भागीरथीनें उत्तर केलें, " तरी देवधर्म मी करणार हो. "

" पर की, मी नाहीं म्हणत नाहीं. उलट तुला तर देवधर्मांची जरूरच आहे तिला नव्हती म्हणून मी तिला बोलत असें. तुला मात्र देवधर्मापासून खराच पुष्कळ फायदा होईल. "

" असं आपण का बरं, म्हणता ! " भागीरथीनें थोडें चिडूनच विचारिलें, " आपल्या डोक्यात अजून अस्पृश्यतेचं खूळ आहे तर ! "

" हें बघ ! खरी गोष्ट माणसानं निदान आपणापासून तरी लपवून ठेऊं नये तुझ्या आणि तिच्या चालीरीतींत अजून पुष्कळच फरक आहे. अग, अजू तुझी लुगडं नेसण्याची रीत देखील तूं बदलली नाहींस "

" आणि माझ्या ठिकाणीं एखादी मडम असती तर तिचा झगा मात्र तुम्हाला बाईच्या सभ्यपणाच्या राहणीपेक्षा जास्त आवडला असता. अथवा असता कशाला ? आपली युरोपातली राहणी मी स्वतः जरी पाहिली नव्हतें, तरी आपल्या अल्पसामर्थ्यें तें भरपूर उमटलं आहे की."

दादासाहेब अगदीं चूप बसले. काय करतील बिचारे. हीच टीका त्याना राधाबाईच्या मुखातून आली तर सहन होत नसे. त्यावेळीं राधाबाई जणों एक केवळ जनावर, अशा भावनेनें त्यांनीं त्याची दर उडवावी. आणि आता भागीरथीबाई म्हणजे कांहीं इंद्राची अप्सरा नव्हत्या, कीं कस्तुरीसारख्या शिकलेल्या नव्हत्या, कीं, तुलनाच करायची तर, पॅरिसिचाहि त्या परी नव्हत्या; पण आपल्या हातानें आपण ती घोरपड गळ्यात बाधून घेतल्यासारखें त्याना झालें होतें, म्हणून त्यानीं तें निमूटपणें सहन केलें. पण भटजींची गोष्ट त्यांनीं वेगळ्याच हेतूनें काटल्यामुळें त्यानीं संभाषणाचें तारूं फिरून मूळ मुद्याकडेच हाकारिलें. ते म्हणाले;

" माझी कल्पना होती कीं, आपल्या लग्नाचा निषेध करणारे हे भिक्षुक आपल्या घरीं येणार नाहींत. पण कसें आले कोण जाणे ?"

" न यायला काय झालं ? अहो, आपलं तोंड गोड तर सगळं जग आपणाशीं गोड असतं. प्रेमानं सारं जग जिंकता येतं. "

" गांधींच्या आश्रमात तूं कांहीं दिवस होतीसच. म्हणून तुला प्रेमाचं महत्व वाटल्यास आश्चर्य नाहीं. पण सांभाळ हो. दक्षिणी ब्राह्मणाचं - त्यातून भिक्षुकाचं प्रेम कांहीं साधं नसतं ? कांकीं तुला अनुभव आहेच म्हणा. "

" हें बघा; असं टोचून बोलायचंच होतं. तर माझ्याशीं लग्न तरी कशाला केलंत ? " भागीरथीबाईनीं डोळ्याला पाणी आणून म्हटलें, त्या पुढें पतिराजाला पुष्कळच लेक्चर सोडणार होत्या. परंतु भटजी पूजेला आले आहेत अशी घरातून वर्दी आली, व त्या दिवशीं सोमवती असल्यामुळें भागीरथीबाई लगबगीनें तापीवर स्नानास निघून गेल्या.

त्या गेल्यावर दादासाहेबाना काय वाटलें कुणास माहीत, त्यानीं भटजीला दिवाणखान्यांत बोलाविलें व विचारिलें,

" भटजी, इला दस्खत येईल का !"

भटजीला मोठें संकट येत होतें ! पण तोही मनुष्य विलक्षण होता. त्यानें सांगितलें—

"मांसाहेबाना उर्दू फार ज्यास्त येतें "

" का ? "

" त्याना एकदोन पठाणाची आपण शिक्वणी ठेवली आहे ना ?"

दादासाहेबाना हें ऐकून चक्करच आली. ते जरा वेळानें भटजींवरच गरम झाले. तसें भटजींनींही त्याना स्पष्ट उत्तरें देण्यास सुरुवात केली. तो म्हणाला, "दादासाहेब, मी अजून पूजा करण्यास येतों याला कारण कीं, राधाबाईनीं माझ्यावर देव सोपवले आहेत, आणि ज्या दिवशीं या नव्या महाराणीबाई,-" Silence " दादासाहेब ओरडले. " फिरून असं बोलाल तर घरात पाऊल ठेवणं आपणास जड जाईल. "

" कोणाला ? मला ? दादासाहेब ! एका महिन्यात आपण स्वत जर या घरातून, आपण होऊन निघाला नाहींत, तर हा हरभट नाव बदलून देईन. दादासाहेब, अजून शुद्धीवर या. "

वास्तविक दादासाहेबाना या बोलण्याचाही भयंकर राग यावयाला पाहिजे होता. परंतु ते क्षणभर स्वस्थ व संचित बसले. नंतर ते हरभटाला म्हणाले,

" हरभट ! काय सांगायचं असेल तें सगळं सांगून टाका कसे. "

" असं पहा दादासाहेब ! प्रथम मी जो देवांची पूजा करतों ती केवळ या घराचं पुण्य मोठं म्हणून. राधाबाई केवळ पतिव्रता ! खरोखरच सावित्री आहे बघा सावित्री ! सत्यवान् जेव्हां—

" गेला नरकात सत्यवान् आणि त्याजबरोबर तुम्ही देखील ! ' दादासाहेब ओरडून म्हणाले. " तुम्हाला एखादी गोष्ट नीट सरळ सांगताच येत नाहीं का ? एक सांगा कीं माझ्या नव्या बायकोविषयीं आपण काय म्हणतां तें. "

" दादासाहेब ! " पुजारी अत्यंत लाब चेहरा करून, गांभीर्यानें म्हणाला, " आपली समाजसुधारकांची व्याख्यानं काय पण लहानच असतात जशीं ! " अगदी ब्रिटिश सरकारची सरळ राजनीति जशी ! १८५८ सालीं राणी व्हिक्टोरिया जाहीरनामा काढते कीं, आम्ही काळागोरा असा वर्णभेद न पाहता सग. ळ्याना सारख्या प्रेमानं वागवूं म्हणून, आणि १९०४ सालीं लॉर्ड कर्झन सांगतो कीं, राणीचा जाहीरनामा कागदाचा चिटोरा आहे !—" भटजी, भटजी ! !

दादासाहेब विवळून म्हणाले, " मी तुमचं या राजकीय प्रश्नाच्या ज्ञानाबद्दल अभिनंदन करितों महात्मा गांधींनी, सरकारच्या द्वेषामुळें—

' प्रेमामुळें ! " पुजाऱ्यानीं दादासाहेबाची चूक सुधारली.

" बर बुवा प्रेमामुळ ! हें बघा हरभट ! आता वेळ लावू नका. आता तिची परत येण्याची वेळ झाली. तिच्या समक्ष आपणाला बोलता येणार नाहीं. "

" कोणाला बोलतां येणार नाहीं ? मला ? का बरें ? मी काय त्या महारणीचे चम्मल खातों ? अहो दादासाहेब ! ती बायको तुम्हीच म्हणा. आम्हाला ती केव्हांही मोटारगॅरेजमधली एक दासीच आहे आणि दादासाहेब, तुम्ही राधाबाईंना मुद्दाम देवघरातून उठवून दिवाणखान्यात आणावयाचे व त्याची टर उडवायचे, तेच तुम्ही आज त्या बाजारबसवीला—

" भटजी ! भटजी ! जीभ सांभाळून बोला ! "

" माझी जीभ आज सगळ्या बाजूनीं स्वतंत्र आहे. एक तर ती खरं तेंच बोलते आहे दुसरी गोष्ट कीं, तिला या पापाचरणाना पुण्याचरणाचा मुलामा देतां येत नाहीं—

" अहो पण, पापं तर सांगाल कीं नाहीं ?"

" दादासाहेब ! माझ्याकडून ती पापं कशाला वदवतां ? आपणास माहीत नसती, आपणांस दिसत नसतीं, अथवा आपणास कळत नसतीं तर गोष्ट निराळी होती. पण आपल्या सुधारकी मनाची मजलच एथपर्यंत गेली असेल कीं, पठाणांकरवीं—

" कोठें ? केव्हां ? कसें ? अलीकडे लग्न झाल्यानंतर मुद्दां ? या घरांत, कीं बाहेर ? भटजी ? आतां भराभर टोंचणें पुरे करा. मी तुम्हांला तुमच्या त्या पवित्र यजमानिणीची शपत घालून विचारतों की माझ्या या नव्या बायकोकडून—

"बरं, महारणीकडून ! " कारण रमासारख्या अत्यंत पवित्र संस्थेची शपथ घेतल्यानंतर जी स्त्री अपवित्र आचरण करते, ती माझ्यामते आपली तरी महारणीतच समजायला पाहिजे, मग जन्मानंच जी महारीण तिची गोष्टच बोलायला नको. सांगा हरभट, सांगा, माझी ही नवी बायको वर्तमान अपवित्र आहे काय ? "

" अपवित्र असं आम्हीं सामान्य भटभिक्षुकं समजतों. आता काय समजाल तें

खरं; पण आपण याक्षणीं आपल्या तापीकांठच्या बागेंत गेलात, तरी आपल्या वसंतनिवासात—"

" बस झालं ! Thank you हरभटजी ! " असें म्हणतां म्हणतांच दादासाहेबानीं आपली पिंक् कलर्ड फर कॅप् चढवली. तसे भटजी म्हणाले,

" शांत रहा ! दादासाहेब शांत रहा ! कसें झालों तरी आपण ब्राह्मण आहोंत. पुढल्या पायऱ्या ठरविल्याविना, असें बेताल्पणाचें वर्तन करणं ब्राह्मणाना शोभत नाहीं. आपण हर्षीच्या बाळीं पडलेलें असूं पण उठताना सावधगिरि ठेविली पाहिजे. आपण आतांच्या आतां खरं खोटं करूं नका. आत्ताची वेळ कदाचित् निघून गेली असेल किंवहुना निघून जावी एवढ्याकरताच मी माझी भिक्षुकिटवट वाढविली होती. आम्हा भिक्षुकाना पुराणं वाटेल तशीं लांबवतां व आखडविता येतात. आपण आतां न जाता आज रात्रीं याच दिवाणखान्यांत जलसा पहावा. मात्र दोन दिवस परगांवीं जाण्याचं टोंग केलं पाहिजे. शिवाय खात्री पटल्यानंतर, सामान्य जनासारखा जनावरी खेळखंडोबा न करता, करायचं तें गुपचिप करावं, असं दुपारभर ठरवून यावं. दादासाहेब, मी गरीब व मालिशी शाबूत असलेला बत्तीस वर्षांचा एक भटजी आहे खरा, पण मलाही महाराजांच्या या चळवळींनं खरं बोलण्याच सामर्थ्य आलं आहे. मला आपणास आणखी एक गोष्ट सांगायची आहे ती ऐकून आपण देखील किती शांत रहातां, याची मला परीक्षा घ्यावयाची आहे. "

" बोला ! " दादासाहेबानीं आरामखुर्चीवर अंग टाकून म्हटलें.

" दादासाहेब ! मी आपणाला बोल लावले, आपल्या या नव्या बायकोला दूषणं दिलींत, परंतु माझं पाप मात्र झाकून ठेवलं, पण आतां मला तें बोलून टाकलंच पाहिजे. खरं म्हणाल, तर मला तें पाप वाटत नाहीं, अथवा नव्हतं. आतां मात्र वाटतं "

" कोणतं ? "

" राधाबाईनीं जर आपल्या या मिश्रविवाहाला जर स्वयंप्रेरणेनं संमति दिली नसती तर मात्र मला माझं मन खातं ना. "

" पण कशाबद्दल ? "

" या नव्या यजमाननींशीं — "

पण दादासाहेब ताडकन् उठून पिस्तुलाच्या टेबलापाशीं जात आहे असें पहाताच हा भट तेथून पळून गेला.

§ ३ भटजी पळून गेला असें पाहून दादासाहेबांनीं गॅलरींतल्या खुर्चीवर आपलें अंग टाकिलें, त्याच्या डोक्यात एक हजार विचार घोळूं लागले. आजपर्यंत त्यानीं मोठमोठ्या गहन प्रश्नांची शांतपणें मीमांसा करकरून, एक Balanced views चा नाणावलेला हिंदसेवक अशी कीर्ति मिळविली होती. परंतु या त्याच्या अत्यंत निरकोळ समाजसुधारणेच्या परिणामाचा शांतपणें त्यांना विचार करता येईना. स्वाभाविक आहे. आतापर्यंतच्या विचारमीमांसेंत हृदयाचे धागेदोरे गुंतले नव्हते, आणि जे कांहीं मधूनमधून गुंतत, ते हृदयाला जाऊन भिडणारे नव्हते. रोमान्सेसमधल्या उत्कंठा, रोमान्सेसच्या सुखाची लज्जत वाढवणाऱ्याच होत्या. पत्नींच्या भोळसरपणाचें दुःख Negative side चें होतें पातिव्रत्य म्हणजे Domestic virtue; त्याला कांहीं विशेष महत्त्व नाहीं. या बाबतीत ते ग्रीक फिलॉसफर्मचे प्रामाणिक अनुयायी होते, कारण आतापर्यंत, त्या किरकोळ सद्गुणाचा अभाव किती तापदायक होतो हें त्याच्या अनुभवास आलें नव्हतें आणि Domestic virtue देखील स्त्रीबरोबरच पुरुषानेंही सांभाळला तरच तो पूर्ण होतो, नाहीं तर अगोदरच तो गुण सामान्य, त्यांत अपूर्ण अशी स्थिति होऊन, स्त्रियांना त्या सामान्यतेनें व अपूर्णतेनें किती दुःख होत असेल, हें त्यांना पहावयाचें कारणच नव्हतें. कारण ग्रीक फिलॉसफर्सनें तसें कुठें पहावयास सांगितलें होतें ? पाश्चात्य राष्ट्रांतलीं दोन्हीं जातींची स्वतंत्रता दादासाहेबांसारख्या श्रीमंत व वजनदार धेंडाना मनमुराद गोंधळ करण्यास जागा करून देत असे व शिवाय इकडे हिंदुस्थानांत राधाबाईसारख्या पतिव्रताच्या पवित्र चारित्र्याचे अभेद्य खडक असल्यामुळें, या हिंदी चंडोलींना त्रिभुवनिं हिंडूनफिरून आपल्या खोपटांत येऊन स्वतंत्रतेचीं गोड गोड गीतें गाण्यास कांहींच हरकत नव्हती आता दोघा विधवा मुलींकडे पाहून मात्र दादासाहेबांच्या हृदयाला चटके बसत खरे, परंतु त्यांची इच्छा पारखून त्यांचे पुनर्विवाह

लावून देण्यास दादासाहेब केव्हाही तयार होतेच. मुलाविषयींचे प्रश्न निकालात निघाले होते तथापि सुरेंद्रबाबूविषयीं मात्र त्यांच्या हृदयाला जास्त चटके बसत. मृगेंद्राइतका तो स्वतंत्रवृत्तीचा नव्हता, तरी पण बुद्धिमत्तेत त्याच्यापेक्षा अणुमात्र कमी नसूनही धैर्यानें जास्तच होता. मणिलेशीं झालेल्या प्रतारणेचा त्यानें, हॉल्केनच्या एका हीरोप्रमाणें, आपण होऊन, उच्चार केला व ती चूक सुधारली, या गोष्टीमुळें दादासाहेबांच्या हातची एक जिंदगी गेली खरी, परंतु त्या गोष्टींतला एक प्रकारचा रोमान्स दादासाहेबांना सुखवीत होता. मृगेंद्राला Unromantic intellectual brutes मध्यें त्यांनीं काढिलें होतें; आणि खरेंच सांगायचें म्हणजे, आईबापांना, आपल्या पोरापैरीं एखादें पोर इतर पोरांपेक्षा खरच जास्त आवडतें त्याला कारणबिरण कांहीं नसतें. आवडतें खरें तशी गोष्ट सुरेंद्रबाबूंची दादासाहेबांच्या बाबतींत झाली होती. राधाबाईंना मृगेंद्र जास्त आवडे. कदाचित् जें पोर आईला आवडतें तें बापाला तितकें न आवडतां दुसरेंच पोर आवडणें हा प्रीतींतला एक वंशवृद्धीच्या दृष्टीनें पारमेश्वरी हेतु असेल, असो. मृगेंद्राचे फोटोज् दिवाणखान्यात, आणि त्याहून जास्ती देवघरात होते. पण सुरेंद्राचें मान दिवाणखान्यात, गॅलरींत व त्याहून जास्त लायब्ररींत असत. त्यात एक फोटो भारी विलक्षण होता. ती दादासाहेबांच्या विक्षिप्तपणाची एक लहर उमटून गेली होती. आपण मेलों तर सुरेंद्रबाबूच्याच मांडिवर मरूं असें तें नुसतें म्हणूनच राहिले नाहींत तर, त्यांनीं तसा, बायको नको नको म्हणत असताही फोटो काढविला होता, व आपल्या गॅलरींतच टांगला होता जिवंतपणींच आपलें निधन चित्र पहाण्याच्या या आवडीचा अनेक स्नेह्यांकडून निषेध झाला, टवाळी झाली, फजिती सुद्धा झाली, चांगली गव्हर्नर साहेबांनीं फजिती केली, पण दादासाहेबांनीं मात्र तो फोटो, या खुंटीचा त्या खुंटीवर उचलूं दिला नाहीं. घरास रंग देताना उचलावयास लागू नये, म्हणून त्यांनीं त्या भोंवतीं प्रथमपासूनच ऑईल पेन्टची सुंदर फ्रेम भिंतींतच रंगवून घेतली होती. खुद्द फोटोही चांगला लाइफ् साइझ् ऑइलपेंटचाच होता. तेव्हां आजच्या त्यांच्या विमनस्क स्थितींत त्यांचे विचार जेव्हां सुरेंद्रबाबूवर उतरले, तेव्हां त्यांची दृष्टि देखील त्या चित्राकडे वळली. दुसऱ्याच क्षणीं, त्यांचा अश्रुपात सुरू झाला, व नंतर थोड्याच वेळांत " बाबू ! बाबू ! ! " असे उद्गार त्यांच्या पोटातून उमटून पडले, त्यांचे दोन्ही हात त्या चित्रातल्या बाबूला धरावयास गेले—

" काय दादा ! मला हां बरं हांका मारलं ! " खरा बाबू गॅलरींत येऊन दादासाहेबांच्या पुढें उभा राहिला. क्षण, एकच क्षण, दादासाहेब घाबरले; पण लगेच ते आपल्या सुरेशबाबूच्या—ते त्याला लहिवाळपणांत सुरेशबाबूच म्हणत-गळ्यांत पडून हुंदके देऊं लागले.

" दादा ! आपणांला वाईट कां बरं वाटतं ? " सुरेंद्रानें आपल्या वडिलांना कोचावर बसवून, व आपण स्वतः त्याच्यासमोर, लीनपणें उभें राहून विचारिलें. त्याचा पोषाख अगदीं साधा, खादीचा होता. तो म्हणाला, "माझी तर कल्पना होती कीं, आपण सुखांत असाल आणि माई अन् आपण समाज-सुधारणांचं काम जोरांत चालवीत असाल. दादा ! आपणाला कसलं दुःख होतं ? आम्हीं जवळ नाहीं म्हणून का दुःख वाटतं ? पण देशाच्या असल्या स्थितींत बापामुलाची ताटातूटही व्हायचीच. "

" नको ! सुरेश ! त्या ताटातुटीच्या गोष्टी आता काढूं नकोस ! बाळा ! " दादासाहेब गहिंवरून उद्गारले; " करावं तसं भरावं हेंच खरं. "

" पण आपण असं काय केलं कीं, आपणांस मरण्याची जरूर दिसूं लागली ? आम्हीं कर्तीसवरतीं मुलं मिळविनाशीं झालोंत, याचं दुःख आपणाला होण्याचं कारण नाहीं. खरोखर ही गजातलक्ष्मी आतां स्वदेशासाठीं भावी आयुष्याची रांगोळी उडविणाऱ्या युवकांच्या घरीं पोचनी करण्यास इरसत नाहीं. "

" बाबू ! तूं मला एक वचन देशील काय ? " दादासाहेबांनीं आवेशानें विचारिलें. त्यांचें लक्ष सुरेंद्राच्या बोलण्याकडे मुळींच नव्हतें. ते आपल्याच नादांत गुंगले होते. ते म्हणाले, " पुत्र या नात्यानें तूं एक कर्तव्य पाळलंच पाहिजे. "

" एकच का ? एकूणएक पाळीन. "

पाहिजेत हीं माझी इच्छा पुरी करण्याची तूं पराकाष्ठा करशील ना ? मी मूर्खानें पुन्हा लग्न केल्यामुळें जिंदगीची वाताहत होऊन तुला कदाचित् कपर्दीकही मिळणार नाहीं. तसं मी तरी होऊं देणार नाहीं. म्हातारचळ लागून या बायकोच्या नादानें—

दादासाहेब एथें किंचित थावले, व नंतर कोणत्या तरी अंतःस्थ भावनेमुळें त्याना हंसूं आलें, तें भीषण हास्य त्याच्या चेहऱ्यावर उमटलेंच, पण त्याच मुद्रेनें ते पुढें म्हणाले; " ही बायको माझ्या संपत्तीचा अपहार करील असं वाटण्याचं कारणच नाहीं. पण विचार करताना भयंकर कल्पनेपासूनच विचार करावा. तसं पाहून मी तुला सांगतों. कीं, तुला जर माझ्या संपत्तीचा एक रुकाही मिळाला नाही तरी तूं आपलं पितृऋण फेडशील ना ? "

" दादा ! " सुरेंद्र गंभीरतेनें म्हणाला, " तुमची ती इच्छा पार पाडणं हें कितीही कडुकर्तव्य असलं तरी तें अत्यंत पवित्र आहे. अप्पाचं काम, अप्पानं केलं काय व मी केलें काय, सारखेंच. पण हे विचार आपणाला कां बरं सुचूं लागले ? आपण तर कौन्सिलच्या रिकाम्या जागेसाठीं उभे राहिले आहात. दादा ! प्रथम हें सांगतों कीं, मी कुठेंही असलों तरी आपणास मतें देण्यास येण्याची मी पराकाष्ठा करीन, आणि नंतर आपणास हात जोडून प्रार्थना करतों कीं, आपण कौंसिलांत जाऊं नये. सुरतेंत एक दरवणी माझण लेवढाच रिकाम्या जागेला उभा राहिला हें, हिंदुस्थानपेक्षाही महाराष्ट्रालाच जास्त लाछनास्पद आहे. तुमचं माझ्यावर जर प्रेम असेल तर दादा ! तुम्ही आपलं नाव काढून घ्या "

"बाबू ! म्हातारपणीं दुःखाचे घुटके पिण्याचं माझ्या नशिबीं आलेलं दिसं. ज्याच्या सुखदुःखानीं आपण सुखी व दुःखी व्हावं, त्याच पोटच्या गोळ्याच्या मार्फत गांधींनीं आम्हां वृद्ध मातापितरांना अशा विषाच्या गोळ्या पाजून आम्हाला जमीनदोस्त करावं, हें त्याना चांगलं का ? "

" महात्माजींचं कार्य असंच आहे कीं, भलत्याच राजनिष्ठेनं पीडित झालेल्या माणसाना तें विषाप्रमाणं तापदायक होतं खरं. परंतु दादा ! तें विष नसून अमृतच आहे. त्यात पितृमानखंडना तर नाहींच नाही; पण राजद्रोहसुद्धा नाहीं. तें एक अत्यंत सुरेख राष्ट्रीयजीवनाचं आणि लोककल्याणाचं पीयूष आहे.

कलेक्टराशीप सोडून देणाऱ्या मला जर तें अमृतासारखं गोड वाटतं, तर रावबहादुरी सोडून देणाऱ्याला कां बरं वाटणार नाहीं ?"

"तें अमृतत्व समजलं. पण तूं जें म्हटलंस कीं, त्यात राजद्रोह नाहीं, त्यात तूं स्वताच्या कायद्याच्या ज्ञानालाही विसरला नाहींस काय ? प्रत्यक्ष ज्ञानावरही मुळाचं पटल फेरणाऱ्या गाधींना साधु कस म्हणावं ?"

" नका म्हणूं. कोणीच म्हणूं नये. गाधी साधु आहेत असें म्हणाच असा एकही गाधीभक्त हट्ट धरीत नाहीं. स्वत. महात्माजी तर आपणास अत्यंत कमी लेखितात. सामान्यासारखीं आपल्या हातूनही पापें घडलीं अशी त्याची कबुलीच आहे. हें साधुत्व याच्या अंगीं चिकटवून आपण जर, कौंटर बॅलन्सकरता ते सैतान आहेत, एथून आरंभ करून, विचार कराल, तर तेंही चुकेल. I shall bagin from the Hell ( *मी नरकापासून आरंभ करीन*) अशी गर्वोक्तिही गाधींजींची नाहीं. तो अत्यंत मानती मनुष्य आहे. प्रत्येक गोष्टीकडे त्या गोष्टीच्याच रूपात पहाण्याची त्याची खडतर तपश्चर्या आहे. Every person is born from the womb of the mother, and he or she begins from that physical hell, but spiritual fire ! ( आईच्या उदरातून प्रत्येक प्राणी जन्माला येतो. म्हणून तो शारीरिक नरकातून तरीही दिव्याग्नीतून उत्पन्न होतो. ) *अशी त्याची मिल्टनवरही ताण आहे !* दादासाहेब ! आपण आणि माई काहीं दिवस त्याच्या सहवासात येऊन रहा कीं, अरे वा ! माई आल्याच कीं ! मी दादाना सागत होतों कीं, तुम्ही कौन्सिलला उभें राहूं नका म्हणून, आणखी काहीं दिवस तरी, तुमच्यासह धाराला येऊन रहा. काय हरकत आहे ? तुम्ही तर साबरमतीला होताच. "

" काहीं हरकत नाहीं. " भागीरथीबाई म्हणाल्या. त्याच्या पोषाखात आता किंचित् फरक पडला होता किंचित् म्हणण्याचे कारण कीं त्यापूर्वी सुद्धा गुजराथी पोषाख करीत होत्या, पण आता त्याचीं पातळें व चोळ्या अथवा पोल्की उंचीं होतीं. त्या म्हणाल्या, " मी तर यांना नेहमीं सागतें कीं, मिठाच्या सत्याग्रहात भाग घेऊं या. *म्हणजे गाधींजीही* अस्पृश्योद्धाराचा प्रश्न पुन्हां हातांशीं घेतील. घेतील कीं नाहीं ? "

चर, सावरकर, गांधी तुरुंगात देखील मातृभाषेची सेवा करितात; मग आम्हाला सुस्थितीतही ती काय करता येणार नाहीं ? तें कांहीं नाहीं. गेलीं वर्षे फुकट गेलींत, पण यापुढें तरी नाशिकच्या क्षेमकल्याणींना राष्ट्रसेवा, वाङ्मयसेवा, शिक्षणसेवा करायच्याच, व इतराकडूनही करवावयाच. "

" पण कायरे, " माईचा रे जरा घाबरतच निघाला, "आम्ही ऐकतों कीं, तूं धारशान्याच्या सत्याग्रहात सामील झालास. खरं का ? "

" नाहीं ! अजून नाहीं. तूर्त माधवरावच सेनापति म्हणून गेले आहेत. आम्ही राजकीयसेवा करणाऱ्यांचीं, वय पाहून, पथकं तयार केलीं आहेत. आमच्या *शिक्षणक्रमात वेगवेगळ्या सर्व प्रकाराची सोय करून ठेविली असल्यामुळें,* आता पूर्वीसारखा बेशिस्त कारखाना चालणार नाहीं. वरं तें असो. माई, तुमचं काय ठरलं ? "दादा ? आपण काय ठरवलं ? "

" सुरेशबाबू ! मी तुला इतकं सांगतों कीं, माझ्याशिवाय दुसरा कोणी उभा राहिला तरच मी उभा राहीन. एकटा उभा राहणार नाहीं. "

" *ठीक ! सुरतेच्या जागा असून निघण्याची आता भीति नको.* बरं आहे, माई ! मी आता बाराच्या गाडीनं परत पुण्याला जाणार ! तोंपर्यंत जेवायचं होईलच. "

" हो. "

" आणखी मलाही पण मडोचला जायचं आहे. " दादासाहेबांनीं पुकारिलें.

" मला दोन चार दिवस लागतील बरं का !"

" इतके दिवस कशाला ? मी काय एकटीच घरी राहूं वाटतं ? "

" पण आता स्वैंग केली पाहिजे. "

" बाबू ! तूं राहिनास हे येईपर्यंत "

" शक्य नाहीं. "

" बरं आहे माई ! पण आज हरभट पूजा केल्याखेरीज का गेला ? "

" त्याचं कपाळ दुखत होतं. मी करतों पूजा. "

" दादा मीच करीन आज पूजा. आणि दादा ! मला वाटतं की देव आतां पुण्यालाच न्यावे. "

" का बुवा ? " माईसाहेब म्हणाल्या.

" आईला त्याच्याशिवाय अगदीं करमत नाहीं. "

" जा घेऊन बरोबर " दादाचा हुकूम झाला.

§ ४ आज जेवायला रंग आला होता. गर्दीत गर्दी करून माईसाहेबांनीं आचार्यांकडून सुरेंद्राकरतां कांहीं सुंदर पक्वान्नें करवलीं होतीं, आणि सुरेंद्रानेंही किती तरी वर्षांत आज प्रथमच देवपूजा केल्यामुळें त्याच्याही मनाला आनंद वाटत होता. जेवताना बापलेकाचीं दोघाचीं ताटें मांडलेलीं पाहून बाबू म्हणाला, "माई! हें काय ग! मला तूं बहिष्कृत समजतेस कीं काय?"

माईच्या नेत्रांत टचकन्, कृतज्ञतेचे अश्रु आले. पण त्यांनीं ते पुसले, आणि आपला पाटही आपणच बाबूच्या शेजारीं मांडला. बाबूनें मग स्वत: उठून माईचें ताट मांडलें. व बापलेक व सावत्र आई अशीं तिघें जेवावयास बसलीं. तीं आता आरंभ करणार इतक्यात, "ॐ भवति भिक्षां देहि' असा एक गोड आवाज माजघरातून आला, व थोड्याच वेळानें सख्याहरि झोळी घेऊन दारात उभा राहिला. त्याला पाहाताच बाबू धावतच त्याच्याकडे गेला, व त्याचे गालगुच्चे घेऊन म्हणाला कीं, 'ल्याद्या! मधुकरि मागून आमची टवाळी करतोस हो! थांब तुझी पुण्याला आता मुंज करून टाकतों!"

" मग तर या झोळीचा चांगलाच वारसदार होईन. नाहीं का?"

" आणि लग्न केल्यावर?"

" मग तर चार घरं जास्तच हिंडावीं लागतील."

" असं काय! आण ती झोळी इकडे. अन् बैस इथं!" असें म्हणून सुरेंद्रानें सख्याहरीला—आता कशाला सख्याहरि? तो आता सखाराम शंकर क्षेमकल्याणी झाला होता—आपल्या पाटावर बसवलें, व आचाऱ्याला आणखी एक पाट, ताट करावयाला सांगितलें. ती व्यवस्था होताच मंडळी जेवावयाला बसलीं. नंतर माईनें भाषणास सुरवात केली,

" बाबू! आपणासारखीं अनेक कुटुंबं वागतील तर हिंदुसमाज हां हां म्हणतां भाग्यवान् होईल, नाहीं?"

"न व्हायला काय झालं?" सखारामानेंच उत्तर दिलें, "माझ्यासारखा जन्मपंगुसुद्धा शूर होईल तर, जात्याच शूर अशा अस्पृश्याची गोष्ट कशाला ?"

"पुरे कर आता ते अस्पृश्य अन् महारमांगाचं नाव घेणं" माई म्हणाल्या.

"आई! असं का बरं ? तूं त्याना कमी लेखतेस का ? अग, तूं मला तरी मुलगा म्हणून कुठं कबूल करतेस ? पूर्वाश्रमींच्या प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याला, तो पंगु म्हणून, किंवा आणखी कांहीं अन्य कारणानं, तूं नाकारतेस, मग केवळ जातीयाना, आपल्या वैभवात, तूं विसरशील तर नवल काय ? पण ती कांहीं खरी सुधारणा होणार नाहीं." सखारामानें मिश्र आवाजात म्हटलें.

"खरं आहे तुझं म्हणणं!" सुरेश म्हणाला, "माई! हाच तुझा मुलगा सुंदर असता, तर तूं कबूल केला असता ना? मग हा ठोंब्या असता, तरी तुला चाललं असतं. पण आज याच्या इतका हुषार विद्यार्थी आमच्या राष्ट्रीय शाळेंत एकही नाहीं."

"पण मी याला नाकारीत नाहीं. हीं पहा मी याला प्रेमानं न्हाऊं घालतें!" असें म्हणून माईनीं सखारामास थोडेंसें भरविलें, व पुढें ती म्हणाली, "बाबू! आपण याचं आज वेगळं नाव ठेवूं या. काय ठेवूं तूंच साग!"

"आपणाला महात्माजींच्या सान्निध्यानंच हा सुखसोहळा मिळतो आहे तेव्हा याचं नाव आपण नुसतं "मोहन"च ठेवूं या. याच्या शरीरापेक्षा अनंत पटींनीं याचं नाव मोहक आहे. गुणकर्म विभागश तर याची जात ब्राह्मणाचीच आहे, पण याचा स्वभाव इतका गोड आहे कीं, हा प्रत्येक समाजाला मोहवून टाकतो. दादा, आईला हा भारी आवडतो. हा धारशान्याला सत्याग्रहात सामील होण्याकरता, महात्माजींची अनुज्ञा घेण्याकरता आला आहे. हा कांहीं काळ त्याच्याजवळ होता सुद्धा, पण गांधीजी याला पुण्यालाच पुनः पुन्हां पाठवितात; पण हा फिरफिरून सत्याग्रहाच्या मेळ्यात दिसतो. काय रे मोहना, एक दिवस सहज चिरडून मरशील अं!"

"बाबूराव! माझ्यावर नेम धरायला शिपायानासुद्धां कठीण जाईल."

सगळे हंसले. नंतर थोड्या वेळानं माई म्हणाल्या, "काय रे बाबू! सत्याग्रहांत स्त्रियांनीं भाग घेण्याविषयीं तुमं काय मत आहे?"

## महात्मा गांधी–सैतान कीं साधु ?

" हें बघ माई ! एक गोष्ट नेहमीं लक्षात ठेविली पाहिजे कीं, महात्माजींचं हें युद्ध इतर युद्धासारखं नाहीं. हें युद्ध वरपागीं राजकीय स्वरूपाचं दिसतं; नव्हे, आहे सुद्धां. परंतु याचें अंतिम ध्येय मात्र राजकीयहक्काचं नाहीं. तर सत्य व प्रेम याचं राज्य मानवी हृदयात, मनात व व्यवहारातही चालविण्याच या युद्धाचं अतिम ध्येय आहे. हें सर्व जगातील सर्व प्रकारच्या असत्याविरुद्ध व क्रौर्याविरुद्ध चाललं आहे; चाललेलं होतं, व या पुढंही चालत राहील. दादा ! मी मघा म्हणालों होतों ना कीं, यात राजद्रोह नाहीं म्हणून तो असा. गांधींच्या सत्यनिष्ठेत कोणताही द्रोह नाहीं तर मग राजद्रोह कसा असूं शकेल ? उलट या सत्यनिष्ठेच्या विरुद्ध मात्र नाना प्रकारचे मानवद्रोह असतात, पण त्यानाही गांधींची सत्यनिष्ठा जागा राहूं देत नाहीं. आता ती सत्यनिष्ठा या जगात सर्वांच्या ठायीं उत्पन्न होण्याला अवकाश लागेल, पण जगाचे दहा हजार वर्षांची बेजार स्थिति लक्षात घेता, जगाला हाच रामबाण उपाय आहे असें आढळून येईल. तेव्हा माई ज्या स्त्रियांचा आपल्या स्वतःच्या सत्यनिष्ठेवर भरंवसा आहे त्यांनीं सत्याग्रहांत भाग घेणें हें ओघानंच आलं. त्या स्त्रिया अशी विचक्षणा करीत बसतच नाहींत व युद्ध म्हटलें कीं, जणूं तें काम पुरुषांचंच, ही जुनीपुराणी कल्पना त्या हृदयाशीं धरून बसतही नाहींत. शिवाय ज्या प्रत्यक्ष सत्याग्रहात भाग घेतात त्या स्वतःला, शिक्षकिणींपेक्षा, कवयित्रींपेक्षा, नर्सेसपेक्षा, नव्हे मजुरस्त्रियापेक्षाही स्वतःला जास्त समजत नाहींत. आम्हा पुरुषांतही तीच भावना आहे आतां पुष्कळ ठिकाणीं अजूनही जो दंभ बोकाळतो हें खरं आहे, पण आस्तें आस्तें जाईल, पण एक गोष्ट मात्र मला स्वतःला फार खाते. ती अशी कीं हा दंभ महाराष्ट्रांतच अजून अतिशय आहे. तिथें एकच जीभ दोन भाषा बोलण्याला भारी चटावलेली आहे. खाजगी मत व जाहीरमत ही पेशवाईपद्धतींची कारवाई, त्यांना वाटतें कीं, अजून चालेल. पण नाना फडणीस जाऊन आज १३० वर्षे होऊन गेलीं. आतां लो. टिळकांनीं प्रथम जोरदार शब्दात लोकाना सांगितलें मानवी प्राण्याला एकच जीभ असते, व तीही उलटी करता येत नाहीं, हें त्यांनीं सरकारला उद्देशून सांगितलं, महात्माजींनीं तेंच सत्य आपणालाही लावून घेऊन दाखविलं आहे.

§ ५ अशा तऱ्हेनें संभाषण करीत करीत, त्या घराण्यांतल्या, त्या नव्या प्रवाहांतल्या दोघा माणसांनीसुद्धां आनंदानें भोजन संपविलें. नंतर नित्याप्रमाणें

माईनीं दादासाहेबाना विडा दिला. तो त्यानीं आज तोंडात न घालतां, खिशांत ठेविला, व माईना व त्या दोघां भावाना मोटार जलदी तयार करविण्यास पाठविलें नंतर ते गेले अशी खात्री करून घेऊन त्यानीं एक सहा बारी पिस्तूल खिशात ठेविलें.

यथाकाल ते बापलेक स्टेशनवर निघून गेले; व यथाकाल ते दोघें भाऊही धारशान्याला आगगाडीनें निघाले, आणि दादासाहेबानीं मात्र पुजाऱ्याचें घर गाठिलें; व त्याच्यापुढें एक नोट ठेवून म्हटलें कीं, " मी आज जातों, पण मला खरोखरच उद्या सायंकाळपर्यंत भडोचला काम निघाल आहे. तेव्हा मी आज न येता, उद्या रात्रीं हळूंच येईन. तुम्ही एवढंच पाहावं कीं याचा तिला अगदीं सुगावा लागूं द्यावयाचा नाहीं. मी आज सकाळीं तुमच्यावर व्यर्थ रागावलों. तुम्ही खरं बोलत नसून, माझी परीक्षा घेत होता हें मी अजिबात विसरलों. पण राग येणं स्वाभाविक होतं. तुम्हीं मुळींच रागावूं नका अं. तुमची आमच्या घराण्यावरची निष्ठा मी ओळखून आहें, यात काय तें समजा. "

असें म्हणून दादासाहेब भडोचच्या रस्त्याला लागले त्यानीं प्रवासात अथवा आणखी कसा दिवस घालविला याला कांहीं महत्त्व नाहीं. तें मोटारीची व शॉफरची नीट व्यवस्था करून रात्रीं बरोबर एक वाजता चोरवाटेनें घरात शिरले. पाहतात तों—

तों काय ? भयंकर प्रकार त्याना दिसला !

किती पण भयंकर तो देखावा ! !

तीन पठाण व हरभट याचीं प्रेतें दिवाणखान्याच्या ! जमीनीवर त्याच्याच रक्तात लोळत पडलीं होतीं, आणि माईसाहेबांच्या चेहऱ्यावर चढलेला खून उतरत चालला असून, त्यावरून काळजीची काळोखी पसरत चालली होती. अशा स्थितींत काय करावें हें दादासाहेबाना मुळींच समजलें नाहीं. आपली महाराणि बायको महान् पातिव्रता आणि विलक्षण शूर आहे हें असंभाव्य सत्य, प्रत्यक्ष त्याच्या दृष्टीला पडल्यामुळें, एकदम, दिवाणखान्याच्या दारातच मूर्च्छित होऊन पडले. त्यामसरशीं माईसाहेब दचकल्या, व त्यानीं तिकडे जाऊन पाहिलें, पहातात तों दादासाहेब बेसावध ! तथापि त्यानीं त्याना " सॉल्ट्स " हुंगायला देऊन सावध केलें.

पण तत्पूर्वी आपल्या त्या पुत्र बाहुंनीं त्याना उचलून, " प्रायव्हेट रूम " मधल्या स्प्रिंगकॉटवर निजविण्यास त्या विसरल्या नाहींत !

आस्तें आस्तें त्यांना आपल्या भडजीचा पाजीपणा कळला, पठाणाशीं आपण स्वतां संगनमत करून, आपल्याच बायकोवर तिच्या पुनप्राप्तीच्या जप-जाप्यासारख्या भोळ्या समजुतीचा उपाय, व पूर्वचरित्र लक्षात घेऊन तो काळा नाग

प्रत्यक्ष अन्दाल्यावर कसा उलटला, पण त्याचा आपल्या शूर पत्नीनें कसा कपाळमोक्ष केला हें त्याना इत्थंभूत समजलें त्यावेळीं मात्र ते उद्गारले, " महाराणि महाराणि म्हणून तुझी व्यर्थ निंदा केली. पण Domestic Virtue plus Positive Virtue तुझ्या ठायींच आहेत. वार्धक्यात का होईना, पण तुझ्यासारखी गुणवती बायको मिळाली ! मी धन्य आहें !! "

" पण याला कारण, माहीत आहे का ? प्रथम आपला मृगेंद्र, नंतर आपला सुरेंद्र, व नंतर माझा मोहन ! "

या तीन भावामार्गे केवढाले इतिहास होते ! आणि त्या त्या इतिहासातला नेमका आपलाच भाग कसा चुकत गेला हें कठोर सत्य त्या विद्वानाला, या सुखातिशयातही असह्य झालें. त्याना ताप भरला. पुढल्या तीन चार दिवसांत रक्ताची चवकशी होऊन, भागरथीनें अन्न व प्राण रक्षण करण्यासरताच ते चार खून केले, असेंच शाबीत झालें. पण तें दादासाहेबाना मुळींच कळलें नाहीं. त्यांना डबल न्यूमोनिया झाला. आपल्या दोन्ही बायका, व आपलीं मोहनमृगेंद्राद्रीज सर्व मुलें आपणाभोंवतीं हजर आहेत हेंहीं त्याना कळलें नाहीं. तें वाताच्या झटक्यांत ओरडत मान दप होते. ते म्हणत, " देवी राधे ! आजपर्यंत राधेला कृष्णानें आळविलें ! पण आज चुकलेला कृष्णच तुला आळवितो बरें, राधिके ! या पश्चात्तापाबद्दल मरत्या जीवाला–बाबू ! बाबू ! अरे बाबू ! कुठें आहेस तूं, धाव ! धांव ! अजून कसा येत नाहींस ! मी कौन्सिलला उभा राहात नाहींत. पदवी सोडली आता तरी ये रे. मांडी दे ! "

" दादा ! दादा ! " सुरेंद्रानें धीर सोडून टाहो फोडला ! " मी आहें बरं ! हा पहा मी इथ आहें ! मी मांडी दिली आहे बरं ! "

" बाबू ! धाव ! आई आई ! देवा ! देवा ! अप्पा ! बाळा मृगेंद्रा ! मला क्षमा कर ! राधे ! क्षमा कर ! भागीरथी ! तूं शूर आहेस !......आले ! यमदूत आले ! माधवरावांना मारताहेत ! मला मारा ! त्यांना सोडा ! अहाहा ! अप्पा आला ! अप्पा आला ! कस्तुर ये ! ती कोण ? गुलाब ना ? ये की ग ! असं काय बरं आहे ना ? तो प्रकाश कसला ?—कोण ? "

दादासाहेब ताडकन् उठून बसले. त्यांचे डोळे दाराकडे लागले. ते एकदम ओरडले !

ये महात्मा ! ये ! ! तूं खरोखरच साधु आहेस ! !

पुस्तक तिसरें

# साधु !

भाग तिसरा

## विश्वमंदिराच्या देहलीवर !

"—Therefore the chief work for the organisation of communities is in the love of every man. Human beings are naturally drawn one towards another (therein the mystery of God in Love,) and therefore in order to unite, one need *only* make oneself capable of Love, and then Union will follow.

—*Correspondence*.

—*Count Leo Tolstoy*.

§ १ दादासाहेब क्षेमकल्याणी आपल्या दोन्ही पतिव्रताच्या कुंकवाच्या सामर्थ्यानें त्या जिवावरच्या दुखण्यातून उठले. वाताच्या घटक्यांत त्यांना मृगेंद्राचें व व महात्माजींचें दर्शन झालें, व त्यामुळें त्यांना आराम वाटून जी झोंप लागली, तोच त्यांच्या दुखण्याच्या उताराचा क्षण होता. ते दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं झोंपेतून जागे झालें, तेव्हां चांगले शुद्धीवर आले होते त्यांची शक्ति मात्र खूपच क्षीण झाली, तथापि आतां धोका राहिला नव्हता. आपण वातांत काय बडबडलों हें मात्र त्याना आठवलें नाहीं. पण आपणास एक दिव्य योगिनी आणि महान् साधु असे दोघे दिसले, व त्याच्या दर्शनानें आपणास फार समाधान झालें इतकें त्याना चांगलेंच आठवलें. ती योगिनी हिमालयातून आली होती, व तिजबरोबर आपला अप्पा होता असें पाहिल्याचें त्याना स्मरत होतें; आणि तो साधु हुबेहुब गांधींसारखा दिसत होता, असा आपणास प्रत्यक्षानुभव आला; पण तीं सारीं माणसें आपापल्या कामात चूर असल्यामुळें एथें कशाला येतील, असें तुम्ही म्हणाल म्हणून मी काहीं बोलत नाहीं; परंतु त्याना एथें, अगदीं या दिवाणखान्यातच पाहिलें, आपण त्याच्याशीं बोललों. तीही आपणाशीं बोललीं हें खचीत, असें दादासाहेब निक्षून सागत होते. आणि आपण देखील आपल्या शब्दाना खरेच समजतों, असें त्यानाही सगळ्यानीं सांगितलें. दोनचार दिवसात ताप उलटत नाहीं, असें पाहून सुरेंद्रानें धारशान्यास जाण्याची त्याची परवानगी सागितली. दादासाहेब म्हणालें,

" जा बाबू ! अवश्य जा ! आता मी अगदीं महात्माजींच्या मताचा आहें. मला अमळ बर वाटताच मी देखील, त्या स्वराज्यहेमात माझी आहुति देण्यास येईन. आतां मी या संसारमोहाच्या पलीकडे गेलों आहें. तूं अवश्य जा. कारण माधवरावाना एव्हांपर्यंत पकडलं असलं पाहिजे.

" अजून काहीं तशी बातमी आली नाहीं. बाबूनें सागितलें, परंतु दादासाहेबानीं भविष्यकाळाचें दृश्यच वाताच्या झटक्यात दिसलें असावें. कारण त्याच दिवशीं सायंकाळीं सुरेंद्राला तार आली, " माधवरावाना पकडलें. मोहन चुकीमुळें ठार मारला गेला. त्वरित निघून यावें. "

" ही तार वाचताच सुरेंद्राच्या डोळ्याना पाणी आलें. त्यानें आपलें तोंड झाकून घेऊन हुंदके सोडण्यास आरंभ केला. राधाबाईना तर रडें आवरेना. त्यानीं रडतच

देवघर गाठिलें. त्याचा देवावर फार लोभ होता. दादासाहेबाच्या दुखण्यांत त्यांनी देवीला चुडे उतरून ठेविले होते, व देवी त्यांना पावली होती. पण नवऱ्याचें दुखणें पोरावर उतरलें अशी त्यांची भावना झाली, म्हणून त्यांनीं देवीजवळ गाऱ्हाणें केलें तसा त्यांना साक्षात्कार झाला, " बाई! राष्ट्रकल्याणार्थ तुझा मुलगा धारातीर्थी पडला, त्यांत वाईट काय झालं? पण तो चांगलं रूप घेऊन भागीरथीच्या पोटीं येईल! जा! सुखी हो!! " या साक्षात्कारानें राधाबाईंना अत्यानंद झाला त्यांनीं तो भागीरथीला सांगितला, भागीरथीबाईंनी बाबूला सांगितला. व बाबूनें तो घरभर केला. दादासाहेबांना त्याचें फक्त हंसूं आलें बाबूनें साक्षात्काराची फक्त राष्ट्रीय बाजू उचलली, भागीरथीबाईंना पुत्रप्राप्तीची अंधुक आशा वाटूं लागली, पण राधाबाई व मुली यांना मात्र देवीच्या प्रसादाची खात्री वाटत होती.

आता आपण या कथानकाचीं सगळीं खेळणीं, उपकरणीं व सर्व बाहुलीं आवरून, हा खेळ संपवतों आहोंत. महात्माजींखेरीज सगळीं बाहुलीं काल्पनिक आहेत. तेव्हा त्यांचें यथायोग्य विसर्जन करणें बरें. आता एकेक बाहुलें निकालात काढून पोतड्यात भरावयाचें आहे तेव्हा येथेंच सांगून टाकण्यास हरकत नाहीं कीं, दादासाहेब दुखण्यांतून उठलेच, पण महात्माजींच्या " नवजीवनानें त्यांना दुसरें तारुण्य प्राप्त झालें. महात्माजींच्या गैरहजिरींत तेच त्यांचें काम जोरानें करीत आहेत. त्यांची मूळचीच अगयष्टि मजबूत होती. त्याच्या ठायींची वीजरोपणाची शक्ति नष्ट झाली नव्हतीच पण आता तर, कात टाकून पुन्हां तरुण झालेल्या सर्पश्रेष्ठाप्रमाणें ते विलक्षण धडाडीचे कार्यकर्ते झाले होते देवीचा प्रसाद खरा व्हावयाचा होता म्हणून म्हणा कीं, सृष्टिक्रमानुसार म्हणा, अथवा राधाबाईंची श्रद्धा म्हणा, किंवा मोहनला खरोखरच त्याच घरात पुन सुंदर देह धारण करून यावयाचें होतें म्हणा, भागीरथीबाईला दादासाहेबापासून योग्यकालीं मुलगा झाला. त्याचें नाव मोहनच ठेवण्यात आलें, व आता तो खरोखरच मनमोहन होता.

तथापि संसार म्हटलें कीं त्यांत सगळ्याच सुखाच्या गोष्टी होत नसतात सुखाबरोबर कांहीं दु खेंही सोसावीं लागतातच त्याप्रमाणें राधाबाईचें स्वर्गारोहण त्या कुटुंबाला लवकरच पहावें लागलें बालमोहनाला पाहिलें त्यांच दिवशीं देवी आपणास बोलावते आहे, असें त्यांनीं सांगितलें व त्याप्रमाणें त्या

पोराचें नामाभिधान होताच, दुसऱ्या दिवशीं त्यांनीं देवीच्या पायावर डोकें ठेवून प्राण सोडला ! त्यासमयीं मृगेंद्र आपल्या दोन्ही बायकासह व गुलाबच्या मुलीसह आला होता त्यानें, व सर्व मडळींनीं नाशिकास येऊन राधाबाईंची उत्तरक्रिया केली, आणि त्याच साध्वीच्या नावानें सुरेंद्रानें " आर्यमहिलासंघ " नावाची एक संस्था नाशिकास स्थापन केली आईच्या उपदेशानें अतरंगपुनींत अशा सरोजिनी मृणालिनींनीं पुनर्विवाह न करता, ती संस्था उत्कृष्टरीतीनें चालविली आहे नलिनीचें लग्न होऊन, तीदेखील पतीसह राष्ट्रसेवा करीत आहे

§ २ मृगेंद्र आपली माणसें घेऊन, फक्त आईच्या उत्तरक्रियेलाच हिमल्यातून योगीनीच्या व तिच्या गुरूच्या, सऱ्यावरून आला होता, तो परत हिमाल्यात गेला. जाताना महात्माजींना भेटून जाण्याचें त्याला मुळींच कारण नव्हतें. ते कोठेंही असलें तरी त्याची त्याला सहज भेट घेता येत होती हिमाल्यात जाऊन तो सासूच्या गुरुपासून राजयोगविद्या चागलाच शिकला त्यानें स्वत नरोत्तम भाईंना आणि कस्तुरीला रोगविमुक्त केलें आणि अशा रीतीनें आपली आरभींच केलेली घोर तपश्चर्या करून भाईंना रोगमुक्त करण्याची प्रतिज्ञा त्यानें पार पाडिली, उलट भाईंनादेखील, आपला, मुलगी देण्याचा वाङ्म निश्चय, कस्तुरीला मृगेंद्राच्या पदरात घालून पुरा केला. आणि अशा रीतीनें नरोत्तमभाईंची कोटींची जिंदगी दादासाहेबानाच मिळाली पण आता ती त्यानाही नको होती त्यानीं स्वत ची जिंदगी जशी राष्ट्रदेवाच्या पदीं वाहिली, तशीच नरोत्तमभाईंचीहा जिंदगी, चतुर बाईंची नीट व्यवस्था लावून, राष्ट्रीय औद्योगिक शिक्षणाला कायमची दिली. कस्तुरी आणि गुलाब या दोघींही मृगेंद्राला, त्याच्या विद्याप्रयोगात मदत करीत होत्या त्यात कस्तुरीची त्याला मदत व्हावी. कारण ती बरीच शिकलेली होती, पण तो प्रयोग करून थकला, अथवा अन्य वेळींही, गुलाबमुळेंच त्याचें मन जास्त रिझलें, कारण गुलाब म्हणजे खरोखरच गुलाब होता आणि मिल्टनप्रमाणें मृगेंद्राला आपल्या बायकोसबधीं कधींच उद्गार काढावे लागले नाहींत कीं, "तूं गुलाब खरी, पण तुझे काटेही मला फार बोचतात" मृगेंद्राचा गुलाब कटकविरहित तरीहि सुवासिक व गेंदेदार होता बहुपत्नीत्वाचीं पाश्चात्य राष्ट्रें कितीही विटंबना करोत, पण शारीरिक अनेक पत्नीत्वात लोळून, निव्वळ दांभिकपणाच्या एकपत्नीत्वाचा मूर्खपणा पौर्वात्य कधींही स्वीकारणार नाहात पाश्चात्यसस्कृतीनें पछाड-

लेल्या दादासाहेब क्षेमकल्याणींच्या घरातच हीं दोन्हीं; पाश्चात्यपौर्वात्य वैवाहिक स्वरूपें व रूपातरेंही घडून आलीं आहेत वास्तविक हा प्रश्न केवळ समाजधारणेचा आहे. यावर मानसिक नीतिमत्ताही अवलंबून नसते असें नाहीं, परंतु नीतिदेखील वेगवेगळ्या काळीं वेगवेगळीं रूपें घेत असतें, आणि सर्व रूपातून प्रीति, अदंभ, अहिंसा, सत्य व निर्भयता हे सद्गुण असलेच पाहिजेत जेथें जेथें आहेत तेथलीं नीति प्रबल असते. मग ती एकपत्नीत्वात दिसो, किंवा अनेक पत्नित्वात दिसो. आतां अनेकपत्नीत्वाची या प्रश्नाची दुसरी बाजू कित्येक-जण ते पुढें करतात. त्याला, प्रस्तुत ग्रंथकार तरी उत्तर देतो कीं, वरील गुण-पंचक जर अनेक पतित्वात आढळलें तर तेंही तत्त्व उत्कृष्ट समाजधारणा खचीत करील. माईसाहेबांचें उदाहरण थोडेसें या विवेचनाला पोषक आहे, असो.

मृगेंद्रानें आताचे रोग दूर करण्याकरताच केवळ राजयोगविद्या हस्तगत केली नव्हती. आपल्या संस्कृतिसाम्राज्याची कल्पना दृश्यस्वरूपात आणण्याकरता त्यानें त्या विद्येचे एकसारखे प्रयत्न चालविले होते. त्याच्या गुरुहृदयाला प्रथम त्या गोष्टींचें मोठें भय वाटलें. पण त्याना मृगेंद्रानें आपली कल्पना समजून सांगितल्यानंतर त्यानीं मृगेंद्राला, प्रयोगाची संमति दिली. मात्र पाश्चात्याप्रमाणें ती विद्या बाजारात विकावयाला ठेवावयाची नाहीं, व आपल्या पश्चात् फक्त एकाच शिष्याला, हीच एक जबरदस्त अट घालून, ती विद्या शिकवावयाची, अशी त्याच्याकडून त्यानीं शपथ घेवविली होती, आणि ती शपथ जर मोडली तर ती विद्या तुजवर अथवा तुझ्या शिष्यपरंपरेवर उलटेल असा शाप त्याच्यावर टांगता ठेविला होता.

मृगेंद्रानें आपली शपथ अक्षरशः पाळली त्यानें आपल्या एका बापनोलाही ती विद्या शिकविली नाहीं अर्थात् त्या विद्येसबधीं पुस्तकें लिहिणें शक्यच नव्हतें. योगविद्या पुस्तकानें शिकण्यासारखी नाहीं. तिचें कांहीं कांहीं ज्ञानविद्युत्कण पाश्चात्य ग्रंथकर्त्यांच्या कांहीं ग्रंथामधून चमकतात, आणि त्याची नीट जाणीव त्या ग्रंथकर्त्यांनाही न झाल्यामुळें, त्या कारणामुळें खुद्द त्या ग्रंथकर्त्यांनाच वेड लागणें, अपमृत्यु होणें, रोग जडणें वगैरे प्रकारची शारीरिक हानि सोसावी लागली व अजू नही होत आहे. याला आतापर्यंत एकच अपवाद, तो जॉर्ज बर्नार्ड शॉ यांचा तथापि त्याना हिंदुस्थानांत जन्म घेतल्याशिवाय, आपल्या सिद्धान्ताची क्षमता

मरून काटता येणार नाहीं, वगैरे मृगेंद्राचे नवे अनुभव आहेत. अर्थात्‌च त्यानें स्वतः प्रयोगाखेरीज अन्यही केलें नाहीं.

त्याचे प्रयोग मात्र फारच यशस्वी होऊं लागले. एकदा त्यानें महात्माजींना कळविलें कीं " आपण मिठाचा सत्याग्रह कशाला करता ? मी हिंदुस्थानात हवें तितकें मीठ तयार करून देतों. इतकें कीं, सरकारला त्यावर कर ठेवला तरी तो गोळा करता येणार नाहीं. हीच गोष्ट धान्याची, कापडाची अगर कोणत्याही अवश्यक गोष्टींची, यापुढें हिंदुस्थानातल्या माणसानं फक्त प्रेमानं राहून कलादिकाची उन्नति करावी, मी त्यांची अवश्य वस्तूंची सर्व गरज भागवितों. आजपर्यंत पाश्चात्यांची ट्रेड् सर्किट्स् फार बोकाळलीं. तीं त्यानीं आता खुशाल उराशीं बाळगावीं." या हृदयतारेच्या संदेशाला महात्माजींनीं उत्तर दिलें, "आपण म्हणता तें ठीक आहे; पण आपण तसें केलें तर हिंदु लोक उन्मत्त बनतील व पाश्चात्याना चिरडून टाकतील. मिळून एकच. शिवाय एकानं मरावं, व त्याच्या श्रमाचं फल इतरानीं आयदीपणानं चाखावं, ही गोष्टही मानवीसुखाला पोषक होणार नाहीं. **मी स्वत मानव असून मानवच राहूं इच्छितों. मानव कोटींत जाण्याची माझी इच्छा नाहीं; व यापुढें झाली व मी मानवातीत झालोंच तर मानवांना सत्प्रेरणा मात्र देत राहीन.** त्याच्याकरता सर्वांच्या बिर्गाच्या सहाय्यानं सृष्टिस्थैर्य बिघडून अंतीं त्याचा व मानवातीलाचाही चुराडा होऊं देणार नाहीं; आपणही कृपा करून ती अनर्थपरंपरा आमच्यांवर व आपणावरही कोसळून घेऊं नका, अशी आपणास विनंति आहे. मानवी प्रयत्नानींच मानवांनीं चढत गेलें पाहिजे. आपणासारखे प्रयत्न अत्यंत प्राचीन कालापासून मोठमोठ्या महत्त्वाकांक्षी ऋषींनीं, व साम्राटांनीं केलें आहेत, व आजही पाश्चात्य करीत आहेत पण सर्वांचें फल एकच. जिनकीं भरभराट त्याच्या दसपटीनीं मोठं अध पतन ठरलेलं. झाल्या त्या चुक्या होऊन गेल्या. यापुढें तरी मानवानीं त्या करूं नयेत. **आतां माझा सत्याग्रह आम्हांला मीठ मिळत नाहीं, असं नाहीं. पण सृष्टि ही सर्व मानवांची आहे, असा सत्यप्रेमाचा हक्क शाबीत करण्याचा हा सत्याग्रह आहे. तो शाबीत करण्याची जबाबदारीही मोठी आहे. ती आमची आम्हांसच घेऊं द्या. शिवाय हक्क कदापि प्राप्त होणार नाहींत;**

**आणि झालेच तर ते टिकणारही नाहींत.** मानवानीं अंतःस्फूर्तीनेंच जबाबदारी पार पाडिली पाहिजे; तुमच्यासारख्याकडून अजरामरान्यांतून स्वर्गाची चिठ्ठी आणवून, जगाची जबाबदारी टाळली, तर तें स्वर्गसुखसुद्धा आम्हां मानवास देवाप्रमाणें लोभप्रिय करील. नाहीं Super man होणें नाहीं. I want to be a perfect man and man only ! ( मला पूर्ण मानवच व्हावयाचें आहे ! दुसरें काहींही व्हावयाचें नाहीं ! मला Godhood नको; मला man hood पाहिजे आहे; असो. आतां शेवटीं एक विनंति करितों कीं, मला यापुढें अत्यंत जरूरीच्या तेव्हढ्याच कामाला बोलावीत चला !"

यानंतर मृगेंद्रानें गांधींना एका विशिष्ट रात्रीं सशरीर हिमालयात नेलें. ती विशिष्ट रात्र म्हणजे ज्या रात्रीं गांधींना पोलिसांनीं पकडलें ती. त्याच्या अ... फक्त अर्धाच तास ! त्या प्रसंगीं मृगेंद्रानें आपल्या सर्व आप्तासमोर व गुरुद... समोर महात्माजींला सांगितलें कीं, " योगिराजा ! आता मी या जगात... एकूण एक संहारक हत्यारें एकदम निर्जीव करण्यास समर्थ झालों आहें. ते... मला तसें करूं द्या. प्रथम संहारकशक्ति बंद करतों; म्हणजे प्रेमाला ... रहाणार नाहीं. "

असें म्हणून तो महात्माजींकडे समप्रचित्तानें पाहूं लागला. तेव्हां महात्माजींनीं शांतपणें व अत्यंत गांभीर्यानें म्हटलें, "**संहारकशक्ति मलाही नष्ट करावयाची आहे.** पण अतिमानुषी उपायानं नव्हे. अतिमानुषी उपायांनीं संहारशक्ति थाजचेहून जास्त मरेल. आणि तींतील प्रेमाकर्षणही मेल्यामुळें नंतर प्रेमोद्भव होणार नाहीं. मी प्रेमानं हिंसेला मारीन. हिंसेनें हिंसेला मारून दुहेरी हिंसा होऊं देणार नाहीं ! जा राजयोगिराजा ! आपल्या गुहेंत जा ! आपलें सर्व सामर्थ्य आवरून घे; आणि त्याला विश्वप्रेमांत दर्वळून दे ! असुर होऊं नकोस, सुरदेखील होऊं नकोस; तर खरा ईश्वरभक्त हो ! जा !! असी आज्ञा करून महात्माजी पुन्हां धारसान्याच्या आपल्या पर्णकुटींत आले.

§ ३ पण तत्पूर्वी दोन दिवस सत्याग्रहाच्या युद्धात काय झालें होतें? गांधींनीं मिठाचा कायदा मोडून कांहीं दिवस लोटले होते. गांधींचें अनुकरण करून ठिकठिकाणचे पुढारी सरकारच्या कैदेंत जाऊन बसले होते. त्यात गांधींचे दोन मुलगे, व गुजरायचे गांधीशिष्य तर होतेच, पण कॉंग्रेसचे तरुण अध्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू हे देखील होते. महाराष्ट्रीय गांधीभक्तानींही मुंबई, शिरोडें, विलेपार्ले, रत्नागिरी इत्यादि ठिकाणीं मिठाचा कायदाभंग करून शिक्षा भोगण्यास तुरुंगाची पुनः पुन्हा वाट धरिली होती. सत्याग्रहात महाराष्ट्रीय युवकाची जी शिस्त वाखाणली गेली, तिचें श्रेय, एकदा सरकारी कॅप्टन, पण आता सेनापति माधवराव मोघे यानाच बापूजींनीं दिलें. मोघ्याची उडी जंगलच्या कायदा मोडण्यापर्यंत होती. नागपूर व संगमनेर येथें जंगली कायदा मोडण्याची मोहीम करावी असा त्याचा मनसुबा होता. पण दरम्यान खुद्द सरकारी सॉल्टडेपोवरच हल्ला करण्याचें गांधींनीं ठरविलें. गांधींना सरकारनें नानाप्रकारें विनवून पाहिलें, पण कांहीं अटी मान्य केल्यास आपण अजून राउन्ड् टेबल कॉन्फरन्सला मान्यता देऊं असें गांधींनीं आपलें म्हणणें सोडलें नाहीं. त्या अटी व्हाइसरॉसाहेबाना मान्य करता येईनात. शेवटीं गांधींनीं हल्ल्याचा दिवस मुकर करून स्वतः, डेपोजवळच छावणी करून दिलें.

पण दरम्यान एक प्रकार झाला. ज्या पठाणाना भागीरथीबाईनीं प्राणारक्षणार्थ यमसदनीं पाठविलें होतें, त्याच्या नातेवाईकाना व मित्राना माधवरावाचाच वहीम आला. एक य कश्चित् स्त्री तीन पठाणाना मारूं शकणारच नाहीं अशी त्याची खात्री होती. मारलेले पठाण व हे मित्र पठाण पूर्वी माधवरावाच्या हाताखालीं खुद्द बार्डोलींत होते. त्याना त्याची शक्ति व पराक्रम पूर्णपणें माहीत होता. एकदा माधवरावानीं रानातल्या एका पटाईत वाघाला ठोकरेसरशीं जमिनदोस्त केलेलें त्यानीं स्वनेत्रानीं पाहिलें होतें वाराशें फूट उंचीवरचें वन्य जनावर त्याच्या गोळीला बळि पडल्याचेंही त्याच्या अवलोकनात आलें होतें. तेव्हा त्यानीं सत्याग्रहाची संधी साधून माधवरावावर अपरात्रीं हल्ला केला. पण तो महाराष्ट्रीय स्वयंसेवकाना कळला. त्यांत मोहन होता त्यानें धावत जाऊन माधवरावाना जागें केलें, व आपण आपल्या तुकडीकडे प्रयाण केलें. दरम्यान सॉल्ट्

पॅन्सच्या पोलिसाना वाटलें कीं स्वयंसेवकांनीं ठरल्यावेळेच्या अगोदरच हल्ला केला, म्हणून ते सज्ज झाले; व त्यांनीं रात्रीं अंधारांत पठाणावरच लाठींचा हल्ला चढविला. पठाणाना वाटलें स्वयंसेवकच आपणांवर चालून आले. म्हणून त्यांनींही आपले सुरे चालविले. ही चूक माधवरावांच्या लक्षांत येतांच त्यांनीं दोघांच्यामध्यें शिरण्याचा प्रयत्न केला. त्याच्याबरोबर मोहन होता, व त्यांच्याभोंवतीं स्वयंसेवकांचें कडें होतें. पण दरम्यान पोलिसांनीं स्वसंरक्षणार्थ तुफान बारबार केला. तेव्हां माधवरावसुद्धां सर्व स्वयंसेवक ओरडले " थांबा ! थांबा ! चूक होत आहे ! थांबाऽ " परंतु त्या धादलींत कडें मोडून पठाण व पोलीस असे दोघेही माधवरावांपर्यंत पोंचले. माधवराव व स्वयंसेवक यांत फारच अंतर पडलें. एकटा मोहन मात्र त्याच्याबरोबर होता. दोघेही "चूक ! चूक ! थांबा थांबा ! !" असें ओरडत होते. पण मोहनचा तो चीत्कारी आवाज आज कांहींच काम करूं शकला नाहीं. आणि माधवरावांचा तो जात्याच " कमांडिंग व्हॉईस् " ऐकून तर पठाणपोलिसांना वाटलें कीं हा कोणीतरी विरुद्ध टोळीचा मुख्य आहे. म्हणून एका पठाणानें एक सुरा त्याच्या अंगावर फेंकिला, व एका पोलिसानें त्याच्यावर गोळी झाडली. त्या सरशीं त्या चिमुरड्या पोरानें प्रसंग पाहून पटकन् माधवरावांच्या तोंडासमोर उडी मारली; व त्यांच्या डोक्यांत गोळी व पोटांत सुरा जाऊन तें पोर एकाच किंकाळीनें गतप्राण होऊन, खालीं पडलें !!!

एक प्राण बळी पडताच दोन्ही पक्ष भानावर आले. पोलिसांनीं चटकन् मागें मोर्चा फिरविला; व पठाण पळून गेले, सकाळीं माधवरावांना अटक झाली !

६४ पण गांधींनीं त्या मोहनच्या प्रेताची जंगी मिरवणूक काढिली. त्यावेळीं ते उद्गारले, " ह्या युद्धांतला पहिला बळी पडला ! भाऊसाहेबांना कैद झालीच आहे. संध्याकाळपर्यंत कदाचित् जनकोजी व समशेरबहादूर अटकेंत जातील. पण आतां मात्र या चवथ्या शांततेच्या सोनपतपानपतांत या मराठ्यांचा खास विजय होणार !

महात्माजींनीं झालेल्या प्रकारची मुंबईला तार करून त्यास बोलाविलें.

६५ पुढें रात्रीं १२ वाजतां छावणींत आला, पण मराठ्यांचा कोणाला पत्ता लागेना. पण ते त्वरित आपल्या पेंढारीवर रात्रीं निघाले आढळले. तें पाहून सर्व छावणीला आनंद झाला. मुंबईमुद्दां तडक रात्रीं ११.

§ ६ रात्रीं १ च्या सुमाराला महात्माजींच्या खाटेभोंवतीं पोलिसांचा पहारा पडला, व त्याच्यावर वॉरंट बजावण्यात आलें तें त्यानीं वाचून पाहिलें, व नित्य विधि आटोपून सुरेंद्रादि शिष्यासह ईश्वरभजन केलें, व नुकताच हिमालयातला प्रसंग त्याना निवेदन केला; व म्हटलें, " सुरेंद्रा ! असले योगिराजसुद्धा जर हिंदुस्थानचे पाठीराखे आहेत तर आपणाला आता भय कोणाच ? "

" आता आपण निर्भयच आहोंत ! " सुरेंद्रासह सर्व शिष्य म्हणाले.

" मग मी आता कुठं जाऊं सांगा ? हिमाल्यात ? किंवा विश्वमंदिरात ? " " महात्माजींनीं विचारिलें.

विश्वमंदिराच्या देहलीवर. " सुरेंद्रानें सुचविलें.

" ठीक आहे ! ( शिपायास व अधिकाऱ्यास ) चलावें," मी तयार आहें.

महात्माजी आज येरवड्याच्या तुरुंगात आहेत.

कोण म्हणतो ?

सारें जग म्हणतें—

महात्मा गांधी, विश्वमंदिराच्या देहलीवर गौतमबुद्धाप्रमाणें लोककल्याणाकरता उभे आहेत ! म्हणून

महात्मा गांधी साधु आहेत ! साधु आहेत ! ! साधु आहेत !!!






empty show—*Hamlet* without the Prince of Denmark. It was felt that somehow Gandhi had to be made to participate in it. Hence the Gandhi-Irwin pact. The change in the Viceroyalty poisoned the truce; the civil servant betrayed the statesman. After much hesitation Gandhi went to London. As he had anticipated, the Round Table Conference did not satisfy him. Having, as they fancied, "exposed" Gandhi to the world, Government launched upon naked repression with re-doubled vigour.

As had happened in the previous decade, Gandhi's incarceration led in the latter years of this period to the revival of swarajism At the end Gandhi once again shrank into his shell, even resigning his membership of the Congress in 1934, and confined himself to constructive work which now included the establishment of the All-India Village Industries Association.

### SALT SATYAGRAHA

Close on the heels of the proclamation of independence by the Lahore Congress, Gandhi wished to test the people's temper. He asked the Working Committee to fix the 26th January 1930 as "Independence Day" and himself drew up a pledge to be taken by the people on that day. (Nearly three decades later the Constitution of India was adopted on the 26th January, which has since been regularly celebrated as "Republic Day".) Gandhi gave strict instructions how the "day" should be observed, which were strictly followed in Bombay and elsewhere. Gandhi was satisfied with the "test" and began to think of mass civil disobedience and gave a hint that the breach of the salt law would be significant as well as symbolic—which, as already pointed out, was thought of by him eleven years earlier. Of the eleven things he demanded as the substance of self-government which would satisfy him, one was the abolition of the salt tax which affected the poorest of the poor, "which cost him five annas per year or nearly

प्रचलित राजकारणावर कादंबरी

# महात्मा गांधी—
# सैतान कीं साधु?

लेखक

श्री० एकनाथ यादव निफाडकर

प्रकाशक

अधिकारी आणि मंडळी

नं. २.